# १

शुभं करोति कल्याणं आरोग्यं धनसंपदां
शत्रुबुद्धि-विनाशाय दीपोज्योति नमोऽस्तु ते. ।

देवापुढे निरजन लावून तिने वरील श्लोक म्हणून नमस्कार केला. देवा-वर कुंकू वाहून कुंकवाचें बोट कपाळावर टेकलें.

तिचें देवघर सुधारलेले होते. भिंतीमधील देव्हाऱ्यात काचेच्या हंडीखाली झाकलेली एक सुदर हस्तिदती राधाकृष्णाची मूर्ति व पुढे ठेविलेली वडिलाची गीतेची पोथी. देवास वहावयाचे उपचार पोथीच्या वेष्टनावर.

उठतां उठता तिच्या मनात विचार आला– 'किती सुखी मी!' तत्क्षणीच दुसरे मन म्हणालें–– 'असच राहील का पण हे सुख?'

दमयंतीने उठून विजेचे बटन दाबलें. खोलीत चोहोकडे लख्ख झालें. देवापुढे निरजन लावल्याविना दमयती विजेचे दिवे लावीत नसे.

प्रकाश पडल्याबरोबर तिने देवाच्यावरच टांगलेल्या आपल्या वडिलांच्या तैलचित्रास नमस्कार केला. तिचें लक्ष समोरच्या आरशाकडे गेलें. तिचे ओंठ विरल झाले. आरशात पाहून तिने कबरेखाली लुगड्यावरून हात झटकला आणि एका पायावर किंचित गिरकी घेऊन डोक्यावरला पदर सावरला. ती खिडकीशीं जाऊन उभी राहिली.

'असच राहील का हें सुख?' असा विचार करू लागली म्हणजे दमयंती-च्या कपाळावर लहानशी आठी पडत असे. बायकांच्या बहुधा अशी पडते विचार करताना. अशा रीतीने एकाद्या विचाराचा त्या छडा लावतातसें दिसतें. हा छडा कधी लागत नाही ही गोष्ट निराळी.

वय जवळ जवळ पचवीस. वर्ण गोऱ्यात जमा डोळे किंचित् टपोरे, ओंठ चवल व नेहमी विरल होणारे, दात पांढरे स्वच्छ, बांधा नीटस असे एखाद्या कादंबरीकाराने तिचें वर्णन केले असते. दहा जणींत उठून दिसण्यासारखा असा एकही अवयव नव्हता. पण डोक्यावरून पदर घेऊन उभे राहण्याची तिची अशी एक ऐटदार लकब होती की, तिला तशी पाहिली व तिच्या दृष्टीशीं दृष्टि मिळाल्यावर तिचे ओंठ अलग झाले की त्या साऱ्या गोष्टींचा ठसा, पाहणाऱ्याच्या मनावर बिंबल्याशिवाय राहात नसे.

आनंद हे दमयंतीचे वैशिष्ट्य. जिथे जिथे ती जाई तिथे तिथे लोक तिला आनंदित करीत व ती लोकांस. प्रसन्नता तिच्या चेहऱ्यावर नेहमी खेळत असे. तिच्या डोळ्यांत अश्रू यावयाचे म्हणजे दुसऱ्या माणसाचे दुःख पाहून. आजपर्यंतच्या आयुष्यात स्वतःचे आठवणारे दुःख म्हणजे तिचे वडील धर्माजीराव ऊर्फ बाबासाहेब मोहिते वारले तेव्हाच. आईचे सुख व म्हणूनच ती गेल्याचे दुःख दमयंतीला लहानपणापासूनच माहीत नव्हते. वडीलहि बरीच वर्षे अर्धांगवायूमुळे अंथरुणावर खितपत पडलेले. त्यामुळे ते गेल्यावर 'सुटले बिचारे त्रासातून' म्हणून एक प्रकारचे समाधानहि दमयंतीला वाटल्यावाचून राहिले नाही.

मरताना म्हाताऱ्याने मुलीस जवळ बोलावून पाठीवरून हात फिरवून म्हटले— 'बाळ चाललों मी. तुला काही कमी नाही. नाना व तू दोघंहि सुखानं संसार करा.' या गोष्टीस बरेच दिवस लोटले होते आणि अजूनहि त्यांचा संसार थाटला गेला नव्हता.

एक दिवस त्यांचे व आपले लग्न होईल हे दमयंतीस वाटे. कारण तिच्या आतापर्यंतच्या जीवनात नानासाहेब बरेच मोठे भागीदार होते. लहानपणापासून ओळख, खेळांत, अभ्यासांत, साऱ्याच गोष्टींत त्यांची झालेली मदत आणि वडिलांनंतर तर हिचा सारा कारभार त्यांच्याच हातात. पण वडिलांच्या मृत्यूनंतर इतक्या लवकर लग्न करणे बरे दिसेल का असे तिला वाटे आणि खरें सांगावयाचें म्हणजे नानासाहेबांबद्दल तिला 'तसे' वाटत नव्हते. नानासाहेबांनीहि या उघड उघड दिसणाऱ्या मूक ममत संबंधाबद्दल कधी चकार शब्दहि काढिला नव्हता. तेहि ही गोष्ट गृहीतच धरून चालले होते.

नानासाहेबाचे खरे व पुरे नाव-- सरदार वीरसिंह जगताप, रत्नपूरकर. रत्नपूरची सरदारी फार मोठी नव्हती पण वीरसिंह म्हणजे मोठ्या उमद्या दिलाचे होते. सरदार घराण्यात जन्म, शिक्षण पुरे झालेले, कलाचा नाद, आपल्याच ऐटींत कोणापुढे न वाकता राहणे, या साऱ्यामुळे नानासाहेबाचा चेहरा मोठा रुबाबदार दिसे. परतु त्यावर एका दुःखाची गभीर छाया पडल्यामुळे तो किंचित् विषण्णहि दिसे.

नानासाहेबाची एक पोरकी व क्षयी पुतणी होती. काही वर्षापूर्वी मोटार चालवावयास शिकत असता ती याच्या मोटारीखाली सापडून अधू झाली. ही मनाची टोचणी हेच नानासाहेबाचे दुःख. ती त्यातून बरी कशी होईल ही काळजी. दमयतीच्या आनदातहि याचे थोडे विरजण पडले होते तिचे नाव दया, व तिचे वय या वेळी सरासरी सोळा-सतरा वर्षाचे. दयेवर आधी दया, मग सहानुभूति व पुढे लोभ या क्रमाने दमयतीचा लोभ जडला होता. तिला वाटे, या मुलीपासून नानासाहेब स हिरावून घेणे निर्दयपणाचे आहे ती आपल्या मनाची अशी समजूत घाली की, या कारणामुळेहि नानासाहेबाशी इतक्यात विवाह करण्याचे आपल्या मनास पटत नसावे आपल्या लग्नापूर्वी दया बरी झाली पाहिजे.

दयेच्या बऱ्या होण्याच्या गोष्टी नेहमीच चालत. आज हा उपचार, उद्या तो, थोडे दिवस एकाचे औषध मग दुसऱ्याचे, असे चालतच असे. आशा कधी सुटली आहे ? आणि ती अजून सुटली नव्हती--

दमयतीची विचारमालिका चालूच होती. जो श्लोक म्हटल्यावर तिच्या मनात आज हा विचार आला तोच लहानपणापासूनचा पाठ केलेला श्लोक तिच्या अतःकरणात पुन्हा उच्चारला गेला. शुभ, कल्याण, चागले आरोग्य व बेताची धनसपदा तर आपल्याजवळ आहेच. शत्रुबुद्धि-विनाशाविषयी तर बोलावयासच नको. कारण, आपणास कोणी शत्रूच नाही. तिच्या कपाळावरील आठी अधिकाधिक वाढू लागली. विचाराची खळबळ झाली व तिच्या तोंडून स्पष्टपणे प्रश्नोद्गार बाहेर पडला, "आहे का शत्रू ?"

"आहे एक-- " या शब्दानी खोलींतील निःशब्दता भग पावली.

दमयती केवढ्याने तरी दचकली व झटदिशी मागे वळून पाहाते तो नानासाहेब दारातून आत येताना म्हणत आहेत, " आहे एक. "

" काय ? "

" पत्र. "

दमयती खुर्चीवर बसली. नानासाहेब बसत असताना ती म्हणाली, " केवढ्यान तरी मी दचकले इतक्यात. ठाऊक आहे का तुम्हाला माझ्या मनात या कातर वेळेला कसला विचार चालला होता तो ? "

" नाही बुवा. मी बगल्यात शिरताना माझी दृष्टि तुझ्या टपालाच्या पेटीकडे गेली. त्यात एक पत्र होत. मी आत शिरताना जे शब्द माझ्या कानावर आले त्यावरून मला वाटल तू विचारलस, ' आहे का पत्र ? ' आणि म्हणून मी उत्तर दिल, आहे एक. "

" पत्र नव्हे. माझ्या मनात चालला होता विचार मला, कोणी शत्रु आहे का याचा, आणि त्यातच तोडातून मोठ्यान शब्द बाहेर पडले, ' आहे का शत्रु ' म्हणून. "

" मग त्याच उत्तर आता देतो, 'नाही'. मग तर झाल ना ? " असें म्हणून नानासाहेब हसू लागले.

खरें म्हणजे नानासाहेबाच्या हसण्याने दमयतीचा उदासपणा केव्हाच मावळावयाचा. पण आज तिला वाटले की, या वाक्याने आपणास उत्तरच मिळाले आहे. ती थोडावेळ त्यामुळे उदासच होती.

नानासाहेबाच्या मनात विचार आला— किती हळव्या मनाच्या असतात बायका ! पण या हळवेपणात त्याच सामर्थ्य असत, नाही ?— यामुळे त्यानी दमयतीची चेष्टा न करता आपले तोड मिटून घेतले आणि दुसरीकडेच पाहात तेहि एका खुर्चीवर शात बसले.

दमयतीचा उदासपणा थोड्या वेळातच ओसरला. तिला आपल्यासमोर बसलेले नानासाहेब दिसले. त्याचे तें किंचित् वर आलेले अणुणचीदार नाक, भव्य कमाळ, तीक्ष्ण, माजरासारखे घारे डोळे, आणि अबोल स्वभाव यामुळे ते लोकास आढ्यताखोर वाटत. स्वभावतः ते आळशी नव्हते. पण एकाद्या मोठ्या आकाक्षेनेहि ते प्रेरित नव्हते. आपलें सुखवस्तु जीवन,

कोणत्याहि कार्यात विशेष लक्ष्य नाही, यामुळे व विशेषतः अजून लग्न न केल्यामुळे लोक त्यास म्हणत ' वाट न सापडलेला तरुण. '

त्याच्याकडे पाहात असता त्याच्या चेहऱ्यावरील विषण्णतेची झाक दमयंतीच्या नजरेस आली. आधीच बिचारे दयेमुळे दु:खी, त्यास आपल्या उदासपणाने आणखी उदास का करावे ? या कल्पनेने दमयंतीने लगेच विचारले,—" मग चलायच आहे ना आजच्या ' शो 'ला ? "

" हे पाहा, खर म्हणशील तर आज मुळीच जावस वाटत नाही. त्या थिएटरात लोकांच्या गर्दीत तासन्तास बसण्यापेक्षा इथच बसायला आवडेल मला. पण तुझा तर हिरमोड नाही ना होणार ? "

" इश्श ! हिरमोड कसला त्यात ? आपण इथच बसू. इथ तुम्ही आज जेवणार आहात हे ठाऊकच आहे जनाबाईला. जेऊ, मग [illegible]स फिरायला जाऊ, म्हणजे झाल. "

" तुझा हिरमोड कशानच होत नाही का ग ? "

उत्तर देण्यापूर्वी थोडा विचार करून दमयंती म्हणाली—" आहे खर तस ! "

" पण काय ग, जर हिरमोड कधी होत नाही, किंवा वाईटहि वाटत नाही, तर मला वाटत, तुला विशेष सुखहि कशान वाटत नसेल. "

" हो, असेल तस. अजून तरी मला कधी अगदी खूप आनद झाला आहे अस आठवत नाही. "

" ह ! दिवसभर घरातच बसून राहाणाऱ्याला बाहेरच्या उन्हाच दु:ख आणि त्याबरोबरच सावलीच सुख, दोन्हीहि कळत नाहीत. "

" आणि म्हणूनच आज कदाचित् हे माझ सुख असच टिकेल का, म्हणून कल्पना आली असावी. "

" या बोलण्याचा त्याच्याशी काही सबध नाही. ज्याला शत्रूच नाही, त्याला दुःख कोण देणार ? "

" हो. पण नाना, जस मला कोणी शत्रु नाही, तस पण मला माझ्या नात्याच असहि कोणी नाही. मी अगदी एकाकीच आहे. "

दमयतीच्या-- नेहमी प्रसन्न दिसणाऱ्या दमयतीच्या-- अंत:करणात हा एकाकीपणा सलतो, हे ऐकून नानासाहेबास थोडे आश्चर्यच वाटले या गोष्टीचा आजपावेतो त्यानी कधी विचारच केला नव्हता.

" पण तुझे एक काका होते ना ? मला अगदी लहानपणची अशी एक पुसट आठवण आहे की, ते कधी कधी बाबासाहबाकडे येत. एकदा तर त्याचं खूप कडाक्याच भाडणहि झाल्याच मला आठवत. पण तेव्हा तुझा कदाचित जन्महि नसेल "

" हो. तुम्हाला माहीतच आहे की, ते अगदी वहावलेले होते. बाबा त्याच कधी नावहि काढीत नसत, इतकी त्याची त्याना लाज वाटे. गेले होते तिकडे कुठे दूर ब्रह्मदेशात निघून. बाबानीच त्याना तिकडे जायलाहि मदत केली होती म्हणे. पण आता त्याच काय ? ते वारले. त्याची एक मुलगी आहे म्हणून ऐकल होत, पण ती मुलगी किंवा तिची आई सध्या कुठ आहेत, किंवा काय करताहेत याची मला काही म्हणता काही माहिती नाही."

इतक्यात घरात पाने वाढल्याचे जनाबाईनी सांगितले व दोघेहि घरात पाय धुण्यास गेली.

जेवण झाल्यावर दोघेहि फिरावयास गेली. येताना नानासाहेबाच्या बगल्यावर जाऊन दयेची विचारपूस करून दमयती घरी आली. घरात शिरताना नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे तिने पेटीतले पत्र काढले व ती आत गेली. पत्र हातात घेऊन आत जाताना ' आहे एक ' ही गोष्ट तिच्या मनाला चाटून गेलीच.

---

दिवा घासल्याबरोबर राक्षसास पुढे उभा पाहून अल्लादिनला देखील एवढे आश्चर्य वाटले नसेल. चार ओळींच्या पत्रात या तरुणीला इथे ओढून आणण्याचे सामर्थ्य असेल असे मदयंतीस स्वप्नातहि वाटलें नव्हते.

मदयंतीस कसेसेच वाटल्यासारखे दिसलें. तिने आपले ओलसर हात ओच्यास पुसले व दार उघडून तिने दमयंतीस आत घेतले. दमयंतीने चपला काढून ठेवल्या व ती मदयंतीपाठोपाठ मागच्या पडवींत गेली.

पडवीत डाव्या बाजूस एक कूड. कुडापलीकडे 'यत्र धूमस्तत्र वह्निः' या न्यायाने ओळखलें जाणारें स्वयपाकघर. खालची जमीन दमटच. एका मोठ्याशा पाटास दोऱ्या बांधून केलेला ल्हानसा झोंपाळा.

उजव्या बाजूच्या खोलीस मदयंतीने कडी घातली व तिकडूनच 'बसा की झोंपाळ्याव' असे म्हटले. हेतु हा की, मदयंतीचे तोंड आपल्याकडे झालें की स्वयपाकघराकडे पाठ होईल. आपले दैन्य कोणीं पाहावे असे कधी कुणाला वाटते का ?

आपल्या तीक्ष्ण नजरेने दमयंतीच्या प्रत्येक बाबीकडे व हालचालीकडे मदयंतीचे लक्ष्य होतें. उलट दमयंतीच्या पुढे दिसणाऱ्या प्रत्येक गोष्टींतलें दैन्य तिला डोळा वर करू देत नव्हते. तिला दिसत होते काळे पटकूर, घाणेरडे हात व थोडी भीतीच वाटेल अशी मदयंतीची 'काय पर्वा' ही वृत्ति.

शेवटीं दमयंतीच म्हणाली— "यापूर्वी आपली कधी गाठ पडू नये हे थोड अजबच नाही का ?"

"हंऽ"

"आपली गाठ पडावी अशी तुमची इच्छा तुमच्या पत्रावरून दिसली आणि म्हणून मी आले."

"तुम्ही याल अस मला वाटलच नव्हत." मदयंती आभार बिभार न मानता रोकठोकपणे म्हणाली.

"का बर अस वाटल तुम्हाला ?"

"का बर ! आमच्याकडे पाहा म्हणजे झाल."

हें तिचें म्हणणें खोडून काढण्यासारखे दमयंतीजवळ बोलावयासच नव्हतें.

मदयंती पुढे म्हणाली—" आपले दोघींचे वडील सख्खे भाऊ भाऊ होते, असं कोणाला सांगितलं तर खरं तरी वाटेल का ? " आणि असे म्हणून तिने आपली दृष्टी दमयंतीवर रोखली.

दमयंतीस तिच्या दृष्टीत काही निराळाच भास झाला. पत्रावरून आपली जी कल्पना झाली तिनकी साधी ही नव्हे. आपली कल्पना चुकली, नानासाहेबांचेंच म्हणणे बरोबर होते, आपण यावयासच नको होते असे क्षणभर तिला वाटले. पण लगेच विचार आला, आपली कल्पना चुकली नसेल कशावरून ? आणि म्हणून ती पुढे म्हणाली—" आपली भेट व्हावी अशी पत्रावरून तुमची इच्छा दिसली म्हणून मी आले. दोघीच बहिणी पण एकमेकींना पारख्या. दुर्दैव ! काही जुन्या गोष्टी असल्या तर त्या मला तरी माहीत नाहीत."

" खरं का ? " मदयंती म्हणाली. तिच्या स्वरात अविश्वास उघड दिसत होता.

दमयंती थोडी लाल झाली. पण तरी सौम्यपणे म्हणाली, " अगदी खरं. आणि मला वाटतं त्या जुन्या गोष्टी, त्या दुःखदायक गोष्टी उगाळीत बसणं म्हणजे वेडेपणाच नाही का ? "

" पण " मदयंती रुक्षपणेच म्हणाली— " उगाळीत बसण्यासारख्या दुःखाच्या गोष्टी तुमच्याजवळ नाहीतच मुळी आहेत का ? सांगा पाहू. '

दमयंतीस वाटले— ' आपलं मनच या रूपानं आपणास टोमणे मारीत आहे.' ती काही बोलली नाही.

या संधीचा फायदा घेऊन मदयंतीने पुन्हा मारा सुरू केला, " नाही ना ? मला वाटलंच होतं. तुमचे दिवस कसे गेले असतील याची मी कल्पना करू शकते. पण आमचे दिवस कसे गेले व जात आहेत याची काही कल्पना तुम्हाला आहे का ? "

दमयंतीने निषेधदर्शक नुसती मान हलविली

मदयंतीने पुन्हा हल्ला चढविला— " नाही. आणि येणार तरी कशी ! सांगू तुम्हाला आमचे दिवस कसे गेले ते ? असली तयारी ऐकण्याची तर ऐका. पण सांगण्यासारखं विशेष असं त्यात आहेच काय मुळी ? वडिलानंतर

थोडे दिवस गेले कसे तरी फिडुक मिडुक मोडून. पुढे काय, आईचे डोळे गेले. तिला काही रक्कम दर महिन्याला मिळते पण तेवढ्यावर चालत कुठे? उघड उघड मोलमजुरीहि करता येत नाही. कारण घराण मोठ! मग काय, चोरून मारून कुठ दळण, कुठ काडण, कुठ शिवण अस कस तरी करून चालल आहे गाड झाल." एवढे म्हणून मदयती रुक्षपणे हसली.

"पण-- मग यापूर्वीच मला कळवायला नको होत का?" दमयती कळवळ्याने म्हणाली.

"हो. पण आई ऐकेल तेव्हा ना? तुमच्या वडिलाच नुसत नाव काढल की आई नुसती वेडी होते सतापान."

"सतापान? मला तर काही कारण दिसत नाही." दमयती हळूच म्हणाली पण पुढे काय बोलावे हे न सुचल्याने ती थाबली. बाबानी तर भावासाठी करावयाचे ते सारें केले होतें, असे काही तरी म्हणण्याचे तिच्या मनात आले. पण त्याबरोबरच हे सागण्याची ती वेळ नाही, असे तिला वाटलें. शिवाय इतक्या जवळ या असता बाबानी याना मदत का केली नाही, या बुचकळ्यातहि ती पडली होती.

"नसेलहि." दमयतीस विचारमग्न पाहून मदयती म्हणाली. "पण येतो खरा तिला सताप. मीं पत्र लिहिल हे तरी तिला अजून कुठ ठाऊक आहे? तिला कळताच उपयोगी नाही. आणि या घरात तुम्ही पाऊल टाकल हे कळल की मग काय? आकाशपाताळ एक झालच म्हणून समजा."

दमयती उठली व म्हणाली--"मग मला आता गेलच पाहिजे. पण मग मला हे आधीच का नाही कळवल? मी आलेच नसते मुळीं."

"पण भेटायच होत मला. पूर्वीच्या गोष्टी जशा तुम्हाला माहीत नाहीत तशा मलाही नाहीत. आईमाग काय? हा विचार मला सारखा सतावतो. अगदी कुण्णी नाही. एकटी." मदयतीचा स्वर गद्गद झाला. ती पुढे म्हणाली—"तेव्हा आला एकदा विचार की, पाहाव पत्र लिहून तुम्ही कशा आहात त्या—" पुढचा अस्पष्ट उद्गार 'आणि काही करता का?' असा असावा, पण तो व्यक्त झाला नाही. मदयतीचे डोळे डबडबले. पदराचें टोंक डोळ्यावरून फिरवीत ती म्हणाली--"कोण आहे मला मग?

माझी कोणाशीं ओळखहि नाही आणि या लोकात ? नको ग बाई. पण म्हटल तुम्ही आहात नात्याच्या—"

दमयंती विचार करू लागली. "खरच, आपण बहिणी-बहिणी. एकाच कुळात जन्मलेल्या दोन सख्ख्या भावाच्या मुली. फरक काय तो पैशाचा दुसरा काय ? पण त्यामुळे मी अशी अन् ही अशी." तिच्या अगावर काटा उभा राहिला. ती अगदी मनापासून कळवळली व म्हणाली, "मला जें काय करता येण्यासारख आहे ते करायची माझी तयारी आहे. तू मुळीच काळजी करू नकोस आता." पैसा, मदत इत्यादि मदयंतीला वाईट वाटतील असे शब्द टाळून बोलण्याची ती खटपट करीत होती. "तू माझ्याकडेच येऊन राहा. मला वाटत, तिथ तुला बर वाटेल म्हणून. भेट झाल्यावर आता तरी आपण एकमेकींपासून दूर का राहाव ?"

"हू. पण आई ?"

दमयंतीला आपले म्हणणे फुकट जाऊ देण्याची कधी सवय नव्हती. ती म्हणाली– "मग मी भेटू का त्याना ? मला त्यानी अजून पाहिलही नसेल. तेव्हा माझ्यावर त्याचा राग का असेल ? चल ना. आपण दोघीहि जाऊ आणि त्याची समजूत पाडून त्यानाहि कुठ तरी चागल्या ठिकाणी घेऊन जाऊ." हे बोलत असता दमयंती जरी वरून मोठी शिक्षित, सपन्न असली तरी मनाने ती अगदी लहान मुलासारखीच मोकळी आणि भोळी आहे हे सहजच दिसत होते.

पण या चागलेपणाचा मदयंतीवर अनुकूल परिणाम झाला नाही धूर्तपणा व भोळेपणा याची गाठ पडावी, भोळेपणाने फसावे व धूर्तपणाच्या डोळ्यात विजयसूचक झाक दिसावी, तसे एक क्षणभरच झाले. पुन्हा मदयंतीचे डोळे पूर्ववत् झाले. ती म्हणाली, "छे ! तुम्ही तिला न भेटणच बर. माझ्यासाठी जे काय करायच तें तिला न कळत झाल तरच हव. आईला मला नेताहि येत नाही आणि सोडताहि येत नाही."

"ते तर खर. पण मी भेटले तर त्या ऐकणारच नाहीत का ? जे काय झाल असेल ते माझ्या जन्माच्याहि पूर्वी झाल असेल."

" असेल ते कदाचित् आपल्या दोघींच्याहि जन्मापूर्वीच, पण परिणाम तर भोगावा लागतो आहे ना जन्मभर ! कल्पना करा की, जे बक्षीस तुमच्या वडिलाना मिळाल ते जर माझ्या बाबाना मिळाल असत तर-? "

दमयतीला ही बोलण्याची तऱ्हा थोडी उध्दटपणाची वाटली. पण तरी ती म्हणाली--" अग हा दैवाचा खेळ आहे बाबाच सुदैव की त्याना ते बक्षीस मिळाल. "

" माझ तरी तेच म्हणण. सुदैव, नुसत सुदैव."

दमयती थोडी रागानेच बोलली- " सुदैव माझ की, मी धर्माजीरावाची मुलगी झाले, मी सुखी राहिले इतकी की, कधी कधी माझ सुखच दुखू लागत अन एवढ्या सुखाचा मला एकटीलाच काय अधिकार असहि वाटू लागत. आतापर्यंत मी एकटीच होते, पण आता आपण दोघींनी मिळून जर त्या सुखात भाग घेतला तर—"

पण मदयतीचे लक्ष होतेंच कुठे ठिकाणावर दमयतीचे बोलणे ऐकून घ्यायला? ती कसला तरी कानोसा घेत होती.

" आईचीच चाहूल ही. " ती एकदम म्हणाली व पडवीचे दार लावावयास धावलीही. पण व्यर्थ. काठी टेकीत, चाचपडत पावले टाकल्याचा ध्वनि ऐकू आला. दाराला एक धक्का बसला आणि शरीराला ओढीत व काठीच्या साह्याने मार्ग काढीत म्हातारी पडवीत येऊन पोंचलीच.

" आई, आलीस ना एकटी चाचपडत इकडे ? " मदयती रागानेच म्हणाली. आणि दमयती ! डोळे गेलेल्या, तारुण्य ओसरलेल्या, गबाळ पोपाक केलेल्या म्हातारीची कीव आणि तिची वेडी, कष्टी पण खुनशी मुद्रा पाहून भय यामुळे थिजूनच गेली.

" कोण ग आल आहे ? कुणाशीं बोलते आहेस ! शब्द ऐकून दाराशीं आलें तो दार तू बाहेरून लावलेल. शब्द तर कुणा तरी मुलीचा आणि स्वर अगदी धर्माजींच्या शब्दासारखा वाटला म्हणून आलें. कोण आल आहे तें ! " म्हातारीने सरबत्ती केली.

वाडिलाचे नाव ऐकताच दमयतीला अवसान चढले. ती म्हणाली, " मी आहे दमयती, धर्माजीरावाची मुलगी. "

" काय ? धर्माजी मोहित्याची मुलगी दमयती ? आणि माझ्या घरात ? " म्हातारी कडाडली.

या साऱ्याचा अर्थ दमयतीस एकच वाटला, की आपण आता येथून लवकर काढता पाय घेतला पाहिजे. पण म्हातारीचा स्वर, तिचे शब्द, तिचे हातवारे या साऱ्याचा तिला अर्थच कळेना. दमयतीने आतापर्यंत ओरडणे कधी ऐकलेच असेल, तर ते रस्त्यातील पोराचे. स्वत. तिजवर ओरडून घेण्याचा प्रसग कधीच आला नव्हता. मदयतीस काय वाटत असेल म्हणून तिच्याकडे पाहिले तो ती निव्वळ जिज्ञासेने आपणाकडे पाहात आहे असे तिला दिसले.

एक आवढा गिळून दमयती म्हणाली--" जाते बाई मी आता. तुझ्या आईची प्रकृति नीट दिसत नाही. "

पण जायचे कसे ? एका हातात ओपाळ्याची दोरी व दुसऱ्या हाताने दारात अडसरासारखी तिरकी धरलेली काठी, अशी म्हातारी वाट अडवून उभी.

" थाब. आधी मला दोन शब्द तुला बोलून घेऊ दे आणि मग जा. " म्हातारीच्या तोडावाटे अक्षरे बाहेर पडली

" आई, दमयतीबाई इथ आपल बर करण्याकरिता आल्या आहेत " मदयती मध्येच म्हणाली.

व्रणावर तेलाचा हात फिरविण्याऐवजी मीठ चोळावे, तसा म्हतारीवर मदयतीच्या बोलण्याचा परिणाम झाला.

" बर ! धर्माजीनी आमचं काय बर करायच ठेवल आहे की ते आता त्याच्या मुलीन पुर कराव ? "

तिरस्कार, भीति, करुणा, अशा परस्पर विरोधी भावनानी दमयतीच्या मनात कल्लोळ माजविला होता. ती म्हणाली, " आईसाहेब, तुम्ही काय म्हणता यातल मला काही माहित नाही. हे जे काय तुम्ही म्हणता हे मदयतीच्या जन्माच्या पूर्वीच--कदाचित् माझ्याहि जन्मापूर्वीच असेल. "

" होय. मदयती होण्याच्या पूर्वीचीच काही महिन्याची गोष्ट. " म्हातारी बोलू लागली. हृदयात साखळ्या सलणाऱ्या शब्दानी कोरल्याप्रमाणे तिचे शब्द स्पष्ट व ठासून येत होते. अगदी त्या वेळचाच जोर म्हातारींत आलेला

दिसत होता. " त्या दिवशीं मी धर्माजीकडे–तुझ्या वडिलांकडे–– पैशाची याचना करायला गेले होते. याचना, समजलीस ना? याचना. पण त्यांनी 'खबरदार पुन्हा आलीस तर! जळू कोठली' असं म्हणून घराबाहेर हाकलून दिलं." म्हातारी दम लागल्यामुळे थांबली.

'अशक्य!' दमयंतीच्या तोंडून उद्गार बाहेर पडला पण तो म्हातारीला ऐकू गेलाच नाही. ती पुढे बोलू लागली–– मदयंती निर्विकारपणे दोघींकडेहि आळी–पाळीने पाहात होती– " आणि आज मी तुला–धर्माजीच्या मुलीला " म्हातारीचे शब्द एक–एक करून स्पष्ट व तसेच ठासून येत होते, " 'तू चोर, तुझा बाप चोर' असं म्हणून माझ्या घराबाहेर धक्के मारून घालवणार आहे."

वडिलांचे नाव ऐकताच दमयंती स्वतःला विसरली. वडिलांचा कड घेऊन ती म्हणाली–– " तुम्ही काय म्हणतां तें कदाचित् तुम्हाला माहीत असेल. पण कृपा करून जरा समजावून सांगाल का मला?"

संतापाने म्हातारीचे पाय लटलट कापत होते. काठी अलीकडे ओढून ती झोपाळ्यावर बसली व म्हणाली–– " समजावून काय सांगू कपाळ? चोराची मुलगी, तू देखील चोरच. तुझ्याजवळची पैन–पै मदयंतीची आहे ज्या कागदाच्या जोरावर धर्माजीनं एवढं प्रचंड बक्षिसाचं घबाड मिळवलं ते त्यानं आमच्याच घरून चोरून नेलं होतं" म्हातारीचा स्वर आता खाली खाली चालला होता मधले वारे ओसरले होते. बसल्याबरोबर तिच्यातली शक्ति जणू काय तिला सोडून चालली होती. तिचे डोळे मिटले गेले व झोपाळ्यावर तिची जुडी कलांडली गेली. पण तरी तोंडातून शब्द निघतच होते " धर्माजीच्या मुलीला हाकून लावल्याचं थोडं तरी समाधान आज मला मिळेल"

दारातली आडकाठी दूर झाल्यामुळे दमयंती जाण्यास निघाली.

पाठमोऱ्या दमयंतीस मदयंती म्हणाली––" मला फार वाईट वाटतं दमयंतीबाई. पण मी तरी काय करू? तिला अगदी खरं वाटतं. आज वरसच्या वरस सारखं हेच बडबडत असते– कागद चोरले म्हणून."

दमयंतीचे सारे अंग शहारलें होते. काही न बोलता ती आल्या वाटेने बाहेर दाराशीं गेली. चपला घातल्या व दार उघडलें. पाहते तो बाहेर नानासाहेब उभे. डोळ्यासमोर नानासाहेब आहेत व कानात घुमताहेत शब्द– 'तू चोराची मुलगी'

---

# ३

ग्रीष्म ऋतु. तिन्हीसांजची वेळ. नजरबागेचे स्थळ. मध्ये कारंजे उडत आहे. सभोवतीं बाकें मांडली आहेत. संध्याकाळ होत असल्यामुळे पुष्कळ लोक हळूहळू उठून जात आहेत. चंद्र आकाशमध्याचे किंचित् पूर्वभागी दिसत आहे. दिवसाचा प्रकाश कमी होत आहे. अशा वेळी एका बाकावर दमयंती आपल्याच तंद्रीत मग्न अशी बसली आहे.

आजपर्यंत सदोदित प्रसन्न असणारी दमयंती त्या दिवशी आपले वडील चोर, आपण चोराची मुलगी हे ऐकल्यापासून पार बदलून गेली होती. त्या घरातून बाहेर पडल्याबरोबर बाहेर नानासाहेब दाराशी उभे असलेले पाहून तिला नानासाहेबांबद्दल जी आत्मीयता, जो आदर, जो विश्वास वाटला तो अपूर्वच होता. आपण सांगितले नसताहि शोध काढीत ते आले होते. झालेली हकीकत आपण त्यांना थोडक्यात कशी सांगितली, तें ऐकताच त्यांनी पुन्हा दार कसे ठोठावले, मदयंती बाहेर येताच किती कठोरपणे 'या सान्याचा अर्थ काय?' असें कसे विचारले, आपल्यासमोर रूक्षपणे वागणारी मदयंती नानासाहेबास पाहून कशी मऊ झाली, आणि "आईच्या डोक्यात ही कल्पना कशी आली आहे, हे मी काय सांगू? तिला अलीकडे असे वेडाचे झटके येतात आणि ती हवं ते बडबडते. तिला हे सारं खरंच वाटतं." असे प्रथम, व 'पण तुला काय वाटतं?' असे दरडावून विचारल्यावर मग "हे खरं असणं अशक्यच दिसतं. पण आई – बिचारी दुर्दैवी आणि आजारी – नेहमी मागच्याच गोष्टी आठवीत बसते. मला विचारलं, तर यातलं काही म्हणता काही माहीत नाही." असे म्हणाली हें सारे दमयंतीला आठवलें.

पण त्या दोघीहि लबाड असाव्यात हे नानासाहेबाचे म्हणणे मात्र तिला पटले नाही. तिचे म्हणणे असे की त्याच्याकडे कोणी लक्ष दिले नाही म्हणून त्या तशा झाल्या. दुर्दैवाने पछाडलेली व दारिद्र्याने गांजलेली माणसे सुखसंपत्तीत लोळणाऱ्या माणसाचा हेवा करणारी होणारच. तीं तशी न झाली तर आश्चर्य. मदयती व तिची आई तशी होण्यास परिस्थिति हेच एक कारण.

दिवे लागले. दमयंतीचे दोन्ही हात रोजच्या सवयीप्रमाणे एकदम जुळले गेले व वर पाहून तिने नमस्कार केला. तिने दूरवर बागेच्या दरवाज्याकडे न्याहाळून पाहिले, व आपणास हवी ती व्यक्ति दिसत नसलेली पाहून ती पुन्हा विचारमग्न झाली.

नागावहून परत आल्यावर नानासाहेबानी खरे काय याबद्दल शक्य तितकी माहिती मिळविली. धर्माजीरावाचे मित्र व ट्रस्टी रावसाहेब घोरपडे याजकडून जो शोध लागला तो असा: यमाजीराव अत्यंत व्यसनी व बदमाष होते. बाबासाहेबानी त्याना कितीतरी मदत केली होती. पण ती त्यास आपल्या हक्काचीच वाटे. पैसे उकळण्याच्या कामात यमाजीची बायकोहि त्यास मदत करी. वेळीं अवेळीं बाबासाहेबाकडे यावे. ओरडा-आरडा करून त्यास सतावून त्याजवळून पैसे न्यावे हे काम तीहि मधून मधून करीत असे. एक सटरफटर कागदाचे पुडके यमाजीचे म्हणून बाबासाहेबाजवळ पडलेले होते. बाबासाहेबास ते मोठे बक्षीस मिळून जेव्हा ते संपन्न झाले तेव्हा त्या पुडक्यात असलेल्या कागदावरच डल्ला मारून बाबासाहेबानी बक्षीस मिळविले, असा आरोप करण्यास यमाजीरावानी सुरवात केली. अशाच एका प्रसंगी यमाजीची बायको काही पत्राचे पुडके घेऊन आली व बाबासाहेबावर हवे तसे आरोप करू लागली. तेव्हा नाइलाज म्हणून त्रासाने 'जळू कुठली! जा, हव ते कर.' असे म्हणून बाबासाहेबानी तिला हाकलून दिली होती.

सारे ऐकून दमयंतीस आश्चर्य वाटले होते पुरुषाच्या आतल्या गाठीच्या स्वभावाचे. आपल्या बाबानी इतक्या दिवसात या गोष्टी एकदाहि आपणाजवळ बोलून दाखवू नयेत, रावसाहेबानीहि या गोष्टीचा आपणास थांग लागू देऊ नये, हे तिला चमत्कारिक वाटे. ती नानासाहेबास तसे म्हणालीहि—

"तुम्हा पुरुषाच्या हृदयात कप्पे असतात का हो? हवा तो कप्पा हवा तेव्हा उघडावा, पण एका कप्प्यातली गोष्ट दुसऱ्या कप्प्यात येऊ देऊ नये." ती स्वतः जरी रावसाहेबास या गोष्टी विचारती तरी इतक्या साऱ्या गोष्टी त्यानी तिला सांगितल्या असत्या की नाही, देव जाणे. तिला वाटले — बायकाच्या मनमोकळ्या स्वभावाचा आणि भावनाशील हृदयाचा पुरुषाना अविश्वास वाटतो. आणि म्हणूनच ते बायकाच्या जीविताशी अत्यंत निगडित असलेल्या गोष्टीहि त्याजपासून लपवून ठेवितात.

तिला सारखे वाटे की त्या मायलेकीसाठी आपण काही तरी करावे. पण नानासाहेब म्हणत— 'पैशाची मदत करायची असल्यास खुशाल कर, पण रावसाहेबामार्फत.' ती म्हणे— 'अशी मदत म्हणजे नुसती भीक घालण्यासारखी. मदयंतींत काही तरी विशेष आहे. सौंदर्य तर आहेच, पण त्याशिवाय काहीतरी अधिक आहे. नुसत्या पैशाचीच उणीव तिला दिसत नाही.' ती सुंदर आहे ही गोष्ट नानासाहेबहि नाकबूल करीत नव्हते, पण ती त्याना खुनशी व कपटी दिसली ते म्हणत, 'खाणीतल्या मातींत खाणीतले अवगुण असणारच.' शेवटी बऱ्याच वादविवादानंतर 'म्हातारी असेतोपर्यंत तरी तिच्याशीं दमयंतीने कोणताच संबंध ठेवू नये' असे तिजकडून नानासाहेबानी कबूल करवून घेतले होते.

तिने पुन्हा एकदा दूर नजर टाकली. आपणास इनी ती व्यक्ति येत आहे असे तिला वाटले आपले विचार व पदर ती सावरू लागली

समोरून नानासाहेबच येत होते. नागावच्या हवेने दयेला चांगलेच बरे वाटले होते व हा बरेपणा टिकलाहि होता दया अशीच बरी राहिली तर ती पूर्णपणे बरी होण्याचीहि आशा डाक्टरानी प्रदर्शित केली होती. ही संधि साधून नानासाहेबानी लग्नाची गोष्ट दमयंतीजवळ काढून येत्या माघात बार उडवून टाकण्याविषयी दमयंतीचा रुकारहि मिळविला होता. लग्न झाले म्हणजे मदयंतीसाठी किंवा तिच्या आईसाठी आपणास हक्काने काही करिता येईल ही गोष्टही नानासाहेबानी तिच्यापुढे मांडली होती व तिचाही उपयोग दमयंतीचा रुकार मिळविण्याकडे झाला होता. आता दोघें वचनबद्ध झालीं होतीं.

या रुकाराने या वाट न सापडलेल्या तरुणास चांगलीच वाट सापडली होती. लग्नाच्या आनंदाने त्याच्यामध्ये एक नवचैतन्य ओतले होते. दया बरी झाल्यानेहि या चैतन्यास जोर मिळाला होता. दयेस या पावसाळ्यात कुठे तरी कोरड्या हवेच्या रुग्ण-चिकित्सालयात ठेवावे, दमयंतीने पावसाळा भर तिच्याजवळ राहावे व नानासाहेबानी कोकणात राहून जहागिरीची सारी व्यवस्था नीट लावावी, जागाची डागडुजी, कलमे लावणे वगैरे कामे करावीं असे ठरले होते व त्यासाठी नानासाहेब दुसऱ्या दिवशीं संध्याकाळींच कोकणात जाणार होते.

यावेळीहि नानासाहेब जवळच्याच एका गावाहून परत येणार होते बाबासाहेबांच्या वेळी त्याचे घरी काम करणारा एक म्हातारा कारकून होता हा जवळच्याच एका गावी आता राहात असे. त्याला भेटून काही माहिती मिळाली तर काढावी, यासाठीच आज नानासाहेब तिकडे गेले होते व स्टेशनवरून उतरताच त्यानी नजरबागेत दमयंतीस भेटावे असा संकेत होता.

नानासाहेबास त्या म्हाताऱ्याकडून नवीन कळलेली गोष्ट अशी. यमाजीशी लग्न होण्यापूर्वी मदयंतीच्या आईचे बाबासाहेबाशीं लग्न होणार होते त्यावेळीं बाबासाहेबानी तिला काही प्रेमपत्रेंहि लिहिली होतीं. या पत्रांतलीच काही पानें घेऊन, भावजयीशी लघळपणा करण्याचा आरोप ती बाबासाहेबावर करीत होती व यामुळेच बाबासाहेब फार चिडले होते. तरी-सुद्धा त्यानी त्यास मदत भरपूर केली होती. ब्रह्मदेशी त्याना पाठविण्याची व्यवस्था बाबासाहेबानीच केली होती. हाकलून दिल्यानंतर ती दोघे ब्रह्म-देशात गेलीं. मदयंतीचा जन्म तिकडचाच. यमाजीराव तिकडेच वारले नंतर त्या दोघी इकडे आल्यावर त्यास दरमहा काही मदत देण्याची बाबासाहेबानी व्यवस्था केली व वकिलामार्फत ती मदत तो म्हातारा अजूनही त्यास पाठवितो. यापैकी पहिली गोष्ट दमयंतीस सांगण्याचे कारण नाही, असे आपल्या मनाशी ठरवूनच नानासाहेब येत होते.

" किती वाट पाहायची माणसान ? " नानासाहेब जवळ येताच दमयंती म्हणाली. " हं. पण मग काय ! समजल का काही ? "

" विशेष काही नाही. यमाजीराव ब्रह्मदेशातच वारले. मदयंतीचा जन्म

तिथलाच. अन् त्याच्या मृत्यूनंतर काही दिवसानी या दोघी इकडे आल्या. हाकलून दिल होत ते ब्रह्मदेशात जाण्यापूर्वीच."

"हो. पण ती गोष्ट तिच्या मनाला इतकी लागलेली दिसते की इतकी वर्षे झाली तरी ती अजून विसरली नाही. नाही का?"

"हू. पण तोच कारकून सागत होता की, बाबासाहेबाकडून त्याच्या मार्फतच तिला पैशाची मदत होत होती, अजूनहि त्यानी केलेल्या व्यवस्थे-प्रमाणे दर महिन्यास तिला काही मदत दिलीच जाते, म्हणून"

"पैशान सारा अपमान धुतला जातो अस वाटल का तुम्हाला?"

"नाही. पण जिथ अपमान इतका तीव्र असतो तिथ त्याच अपमान करणाऱ्याजवळून पैसा कोणी घेत नाही, एवढ मात्र मला वाटत."

"नाना, दारिद्र्य माणसाला हव ते करायला लावील. पण बिचाऱ्या मदयतीकडे तर काही दोष नाहीना? ती त्या दिवशी म्हणाली नाही का की ते खर असण अशक्यच दिसत म्हणून?"

"पण त्याच कारण ती मला पाहून एकदम घाबरली असावी हेच वाटत. हो! पण काय ग दमयती, बाबासाहेबांना इतका त्रास देणाऱ्या व्यक्ती-बद्दल सहानुभूति वाटण म्हणजे त्याच्या स्मृतीला दूषित करण्यासारख नाही तुला वाटत?"

"मला त्या म्हातारीच नाही काही वाटत. मला वाटत ते फक्त त्या मुलीबद्दल— मदयतीबद्दल. तुम्हीच सागा बर नाना, माझ्यात नि तिच्यात जो काय फरक पडला आहे तो नुसत्या पैशामुळच ना?"

नानासाहेबाच्या चेहऱ्यावर समतिदर्शक स्मित झळकले. दमयती अशी कशामुळे झाली, पैशामुळे की आणखी कशामुळे हे सागता येणें खरेच कठीण होतें. पण नानासाहेबास वाटे, या गोष्टीशी काय करायचे? ती तशी आहे म्हणूनच आपणास आवडते. द्राक्षे खाणारा कोणत्या खतानें द्राक्षे चागलीं झालीं याचा विचार करीत नसतो.

नानासाहेब थोडे तिच्याजवळ सरकले. दमयतीच्या उदार हृदयाबद्दल त्याना कौतुक वाटले. आताच पाहा ना, आपण कोकणात गेलों म्हणजे

दमयंती सारा पावसाळा दयेजवळ काढणार आहे ना ? लग्न झालें की मान्यांनीच कोकणात जाऊन राहावयाचे.

या चार महिन्यांच्या वियोगापूर्वी ही आजचीच रात्र व उद्याचा दिवसच काय तो या दोघांस एकत्र घालविण्यासारखा होता. पण याबद्दल दमयंतीस काहीच वाटत नाही असे नानासाहेबांस दिसले. तिचे सारे लक्ष्य मदयंतीकडे ! यामुळे नानासाहेबांचे मन थोडे खट्टू झालें होते. त्यांना वाटले होते की, दमयंती आपल्या जाण्याच्या गोष्टी काढील. पुढे काय करावयाचे याचा आपण काही विचार करू. पण तसा काहीच रंग दिसेना. त्यांनी तिचा हात आपल्या एका हातात घेतला व दुसरा त्यावरून हळूच फिरवीत फिरवीत ते म्हणाले—" दमयंती, आपल्याबद्दल बोलायला तुला वेळच नाही का ? जेव्हा पाहावं तेव्हा दुसऱ्याच्याच गोष्टी. "

नानासाहेबांच्या या निकटतेमुळे दमयंतीस कसेसेच वाटले. तिला थोडी भीतीच वाटली. नानासाहेबांच्या उदास पण अधिकारात्मक दृष्टीशी तिला दृष्टि मिळविता आली नाही. ती थोडे हसत आणि वर तोंड करीत म्हणाली ' मला वाटत, तुम्ही मला भारीच लाडावून ठेवली आहे. तुम्ही माझेच आहात या खात्रीमुळं काय बोलायच राहिलं आहे, अस वाटत. "

" दमयंती, भलतीच खात्री बाळगू नकोस. " नानासाहेब हसत म्हणाले " इतका विश्वास ठेवण्यायोग्य मी नाही. " हे शब्द त्यांच्या तोंडून बाहेर पडले.

" म्हणजे ? " तिने त्यांच्याकडे न पाहताच विचारलें.

नानासाहेब उठता उठता म्हणाले— " म्हणजे काय ? भिकाऱ्यासारखं वाट पाहात उभ राहाण माझा स्वभाव नाही " ते हसत होते पण त्या हसण्यात थट्टा दिसत नव्हती. " चिमटी चिमटी मागत मी फार दिवस राहू शकत नाही "

दमयंतीला समजेना. आपणाजवळ जे काय आहे ते सारे देण्यास आपण तयार झाले नाही काय ? तिला कळेना त्यांना काय हवे होते ते. " तुम्ही याचक अन् मी चिमटी चिमटी घालणारी दाता अस मला कधीच वाटलं

नाही." तिने हळूच उत्तर दिले व गमतीने पुढे म्हटले, "माझ्यापेक्षा उदार दाता तुम्हाला भेटायचाहि एकाददिवशी."

"पण हो, भेटेलहि कदाचित्." या नानासाहेबांच्या उत्तराने तर तिला विस्मयाचा धक्का बसल्याशिवाय राहिला नाही.

अंधार असावा, रोजची सरावातली वाट असावी, कधी आपण अडखळू किंवा आपणास काही लागेल असं ध्यानीमनींहि नसावे आणि बिनधोक रीतीने जात असता एकदम डोक्याम लागन ठेचाळावे, तसे दमयंतीस झाले. आपणास हवा तो मनमोकळेपणा नानासाहेबांजवळ नाही असे तिला वाटले. ती म्हणाली, "मला वाटतं, मी तुमची निराशा तर करीत नाही ना? निदान जेवढ्या सुखाची अपेक्षा तुम्ही माझ्याजवळून करता, तेवढ मी तुम्हाला देऊ शकत नाहीस वाटत."

नानासाहेब उभ्या-उभ्याच तिच्या पाठीमागे दिसणाऱ्या, ग्रीष्माने करपलेल्या, हिरवळीकडे पाहात होते दमयंतीचा हात त्यांच्या हातातच होता व दमयंती दीनपणाने विचारीत होती- "सांगाना काय ते?"

"या गोष्टी फोडून सांगता येतात का कुठं?" नानासाहेब पोक्त्या घाईनेच म्हणाले.

"पण फोडून सांगण्यासारख आहेच काय यात? कोणती उणीव माझ्यात भासते, हे सांगायच नुसत."

"नाही ग सांगता येत ते." नानासाहेब स्मित करीत म्हणाले

"बर, पण विश्वासाबद्दल आणि खात्रीबद्दल काय म्हणालात ते तर सांगा." लाडिकपणे दमयंती म्हणाली. पण लाडिकपणाचा स्वर लगेच पुढे बोलताना गंभीर झाला, "माझ्या मनात नाही कधी विश्वासाची अन् खात्रीची शंका येत ती?"

"नाही. कारण तुला त्याच एवढंस महत्त्वच वाटत नाही तू स्वभावत विश्वासार्ह आहेस, नी तुझं मन कधी चलबिचलहि होत नाही-आणि होणारही नाही."

"आणि तुमच? त कोण करणार आहे चलबिचल?"

"मी जितक तुझ्यावर प्रेम करतो, तितक प्रेम माझ्यावर करणार कुणी

भेटलं तर—" किंचित् विनोदाने, किंचित् गंभीरपणे तिजकडे पाहात नानासाहेब म्हणाले.

"असं ? म्हणजे मी तुमच्यावर पुरेसं प्रेम करीत नाही म्हणायचं ?"

प्रश्नाचे उत्तर टाळीत नानासाहेब म्हणाले— "दमयंती, प्रेम करणं— विलक्षण प्रेम करणं ही एक अजब गोष्ट आहे. विलक्षण प्रेम क्वचित् सापडतं हे खरं. लोकांचा या विलक्षणपणावर विश्वासहि बसत नाही, हेहि खरं. कारण, साधारण लोकांत याचा अनुभव तरी नसतो हे एक, अन् तसं प्रेम करायला ते भितातहि, हे दुसरं. पण विलक्षण प्रेम अंतःकरणांत एक विलक्षण खळबळ उत्पन्न करतं, हे मात्र अगदी खरं."

दमयंती गप्प राहिली. नानासाहेबांवरील आपल्या प्रेमांत काही वैगुण्य आहे असे तिला वाटेना. पण त्या प्रेमाला तिने 'विलक्षण' हे विशेषण कधी लावलं नसते. नानासाहेबांशी तिची किती तरी दिवसांची ओळख होती. त्यांचा—तिचा दाट परिचय होता. त्यांजविषयी तिला आदर, श्रद्धा, प्रेम वाटत होतं. आपल्या जीवनांत नानासाहेब तिला अत्यंत आवश्यक भासत होते. अगदी शरीराला रोजच्या अन्नाइतके. पण तोंडाला पाणी सुटणाऱ्या व मिटक्या मारायला लावणाऱ्या पदार्थांसारखे ? ते तिला तसे कधी वाटलेच नाहीत. आणि खरे पाहिले तर रोजचेच जेवण हितकर नाही का ? विलक्षण प्रेम तिला माहीतच नव्हते. पूर्वी वडिलांचे व आता नानासाहेबांचे या साध्या प्रेमानेच ती सुखी नव्हती का ?

तिने दुसऱ्या हाताने नानासाहेबांचा हात धरला व ती म्हणाली— "मला वाटतं माझे लाड फार झाले. कधी कोणत्या गोष्टींची वाणच मला भासली नाही. हवी ती गोष्ट सहजच मिळत गेली अन् म्हणूनच मला वाटतं मी अशी राहिले."

आपल्या म्हणण्यातला आशय दमयंती समजू शकली नाही हे पाहून नानासाहेबांना मौज वाटली. त्यांचे लक्ष जवळच असलेल्या गुलाबाच्या फुलाकडे गेले. त्यांना वाटले, या कोमल जीवाला त्रास न देणेच बरे. बालकासारखें निष्पाप, फुलासारखें नाजुक व सुवासाप्रमाणेच हातीं न सापडणारें हे दमयंतीचे प्रेम आपलेच आहे. आपल्या अतृप्त मनाने असाच वीर

धरला पाहिजे. ते म्हणाले— " असंस ! म्हणून तुला सुखाची खंत वाटू लागली आहे वाटत ? "

" सुखाची नव्हे पण तुम्हाला मी सुखी करू शकत नाही, याची मात्र वाटते "

" माझ्या सुखाची नको काळजी करूस सध्या तरी ते दयेवर अवलंबून आहे "

दया शब्दातली खोच दमयंतीच्या ध्यानातहि आली नाही. ती म्हणाली— " हो, पण दयेवर तुम्ही इतकं अवलंबून असावं हे दयेलाहि आवडत नाही. जनाबाई परवाच म्हणत होत्या की या गोष्टीची जाणीव सुद्धा दयेला जड वाटते म्हणून. आणि मला वाटतं त्यांचं म्हणणं बरोबर आहे. "

" दमयंती, मनाची टोचणी कशी असते हे तुला ठाऊक नाही. "

" पण तो अपघात म्हणजे काही तुमची एकट्याचीच चूक नव्हती. शिवाय ती जन्माचीच क्षयी असं डॉ. महात्मेहि म्हणत नव्हते का ? अपघात झाला नसता तरी ती याहून चांगली नसती असं त्यांचं मत आहे. "

" हे डॉक्टर म्हणजे माझ्या पैशाचे चाकरच ना ? त्यांना तसं म्हटलंच पाहिजे. "

" पण कुणीहि सांगेल की, दया मूळचीच अशक्त. तुम्ही तिची इतकी काळजी घेतली नसती तर तिनं इतके दिवसहि काढले नसते. नाही का ? "

पण हे सारे मुद्दे नानासाहेबांनी दूर सारले. ते म्हणाले— " तें तुला कळायच नाही जाऊ दे आधी आपण त्या मदयंतीबद्दल बोलत होतो आता दयेबद्दल. जाऊ दे. "

" मनाची टोचणी मलाहि माहीत आहे अन् म्हणूनच मदयंतीबद्दल इतकं वाटतं. " हे शब्द तिच्या ओठावर आले होते पण ते तिने दाबले व ती उठली.

नानासाहेबांनी एकदम काही विचार मनात आल्यासारखे करून विचारले " बरं, पण आता तू आमच्याकडे येतेस का जेवायला ? जाऊ मग आपण एखाद्या शो'ला थोडी मजा करू "

" आज नको गडे. आज मला मदाबाईकडे जायचं आहे. बिचारी किती दिवसापासून बोलावते आहे. मागं दोन वेळा दिला मीं टाळा —"

" मग आज आणखी एकदा."

" नको, नको. ती नुकतीच आजारातून उठली आहे. बिचारीला अजून घरातच राहावं लागतं."

" अग, पण मी गेल्यावर तुला आहेतच की काही दिवस. जा मग केव्हा तरी त्या दिवसात."

" पण मीं आजच कबूल केलं आहे ना? तिची इच्छा तुम्हीसुद्धा यावं अशी आहे. चलता का? तिला किती तरी बरं वाटेल."

" छे बुवा. तुझी ती मदा नी ते तिचे यजमान काय पण माणसं आहेत! अगदी कंटाळवाणी."

" पण स्वभावानं तीं फार चांगलीं आहेत हां. मला वाटतं, लोक आपल्याला कंटाळतात हे कळणं म्हणजे किती तरी वाईट, नाही का? नाना, आज नका मला आग्रह करूं मी उद्या दुपारीं येईन तुमच्याकडे."

" दुराग्रही आहेस तू झालं! मला इथं आजचीच रात्र काढायची आहे मग कितीतरी दिवस आपली गाठहि पडणार नाही."

'पुढचे चार महिने आपण दयेबरोबर एकटीनें चालवायचें कबूल केलें आहे, मग मला नको का थोडे माझ्या मैत्रिणीकडे जायला?' असे दमयंती म्हणाली नाही, पण तिच्या मनांत ते आल्याविना राहिले नाही. ती कांही न बोलतां तशीच उभी होती.

" दे ग आज तिला टाळा घरीं गेल्याबरोबर निरोप पाठव आज चल माझ्याबरोबर?"

" नको नको. आज नको. दोनदा दिला तेवढा पुरे."

नानासाहेब थोड्या त्रासिक स्वरानें म्हणाले, " मग आज तू येणार की नाही माझ्या बरोबर."

दमयंतीला उत्तर देण्यास वेळ लागला नाही. नानासाहेब काय, हवे तिथे हवे त्याच्याबरोबर जाऊं शकतील. पण मदा? आपण न गेलो तर तिच्याकडे कोण जाणार? नानासाहेब तर नाहीतच पण आपणही न गेलों

तर तिला किती तरी वाईट वाटेल "आजचा दिवस माफ करा. आज मला तिकडेच गेलं पाहिजे."

नानासाहेब रागावतील हे तिला माहीत होते. त्यांच्या रागाची तिला भीति वाटे. ते आजपर्यंत कधी रागावले नव्हते तिच्यावर. पण त्यांच्यात क्रोधाची मात्रा आहे व एकादे वेळेस ती आग बाहेर पडायची असे तिला वाटे. दमयंतीला भांडणाची भीति वाटत असे. दमयंती आणि भांडण, ही कल्पनाच अशक्य होती. पण ते रागावले तर आपणास रडू येईल, अशी तिला भीति वाटे.

नानासाहेबांना काही वाटले असलें तरी त्यांनी आपले मन आवरलं व ते म्हणाले, "अच्छा. तर मग उद्या. कोंकणातील काही फोटो माझ्याकडे आज आले असतील ते तुला दाखवीन आणि आपल्या त्या नावेचं काम कोठवर आलं आहे तेहि सारं सांगेन."

या ममतेने दमयंती द्रवली. सरदार नानासाहेब जगताप यांनी दमयंती-पुढे वाकावे यात नानासाहेबांस केवढे आत्मसंयमन करावे लागले असेल, याची तिला कल्पना होती. नावेच्या नाजुक कल्पनेचा उच्चार करून नाना-साहेबांनी काय सुचविले ते तिला समजलं होते. नानासाहेबांच्या गळ्यात तेथेच हात घालावा अशी प्रबल इच्छा तिला उत्पन्न झाली पण तसे कर-ण्याचा धीर मात्र तिला झाला नाही. थोडी स्वतःची, थोडी नानासाहेबांची व थोडी कोणी पाहणार तर नाहीं ना, याची तिला भीति वाटली असावी.

हसत हसत आनंदाने ती म्हणाली— "हे पाहा, अशी तुम्ही मला लाडावता. गरीब बिचारी मंदा. मी गेल्यानं किती किती आनंद तिला होईल म्हणून सांगू!"

"मला आनंद होईल की नाही याचा विचार करण्याचं कारण नाहीच वाटत?"

"तुम्हाला आनंद आहेच. हवं ते सारं मिळतंच आहे."

"पण तू नाहीस ना मिळत."

तिने आपला हात सैल सोडला. नानासाहेबानी हळूच तो आपल्या ओठाशी नेला. ती म्हणाली, " मी तर तुमचीच आहे फक्त तुम्हाला हवी तशी नाही. "

तिचा हात हातात असतानाच नानासाहेब तिच्याकडे पाहात म्हणाले, " नाहीस ? नाहीस तू तशी ? "

त्यानी तिचा हात सोडला दोघेहि निःशब्द चालू लागली. नजरबागे-बाहेर पडल्यावर निरोप घेऊन दोघेहि दोन दिशाना वळली.

दमयंतीच्या मनात भय वाटू लागले, ' विलक्षण प्रेम मला ते करताच येत नाही. कुठ तरी चुकत आहे ग्वास '

---

# ४

## ( १ )

कु. दमयंतीबाईस—

सा. न. वि. वि. आई वारली. सुटली बिचारी एकदाची माझ्या डोक्यावरच छत्र व ओझ दोन्ही नाहीशी झाली.

तुम्हाला लिहावं अस किती तरी वेळा वाटल. पण आईला मी त्या दिवशी वचन दिल होत की तिच्या जिवात जीव असेतो मी तुमच्याशी संबध ठेवणार नाही पण आता मी मोकळी आहे. माझ मलाच सार पाहिल पाहिजे.

आईला दर महिन्यास जे पैसे मिळत ते तिच्याबरोबरच थाबले. म्हणून घर मोडल. सार विकून टिकून जे काय आल त्यातून डॉक्टराच बिल व शेवटल्या दिवसाचा खर्च भागविला लुगड्याची एक जोडी व पोल्क्यास थोड कापड घेतल. नागावच घर आता सोडणार आहे. उद्या महिना पुरा होईल व परवा नशीबाची परीक्षा पाहण्यास मी बाहेर पडेन.

पण जायच कुठे ? तुमच्याशिवाय मला कोण आहे ? काही काम मिळे-पावेतो तुमच्याकडे येईन म्हणते. चांगली धडधाकट आहे मी. थोड्याच दिवसात माझ्यायोग्य काही तरी काम मला मिळेलच फार दिवस माझा भार तुमच्यावर पडणार नाही. कळावे

आपली

कु. सौ. मदयंती मोहिते

( २ )

प्रिय नाना,

तुमच्या पत्राप्रमाणे दयेस मावशीबाईच्या गावी पाठविले आहे डॉ. महात्मे यांनी तेथील डॉक्टरास एक पत्र दिलें. दयेबरोबर एक बाई, एक परिचारिका व एक गडी अशीं तीन माणसे गेलीं आहेत. मावशीबाईनी तिजसाठी बंगला घेऊन ठेवलाच आहे. थोडे दिवस ती तेथे विश्रांति घेईल मी तेथेच तिला भेटावे व तेथून आम्ही बरोबरच कोरड्या हवेवर जावें, असे आपण लिहिलें. मी दयेची रवानगी केली त्याच दिवशी मदयंती येथे आली. तिचे पत्र सोबत पाठवीत आहे. ते मला आदल्याच दिवशी मिळाले. त्यावरून सारे कळेलच. तिला काय लिहावें या विचारात मी होते तोच ती आलीहि. तेव्हा तिला ठेवून घेण्याखेरीज दुसरा उपायच राहिला नाही.

नाना रागावू नका. खाल्ले तर बाधते व टाकले तर शापते, अशी माझी स्थिति झाली. नाही म्हणणे शक्यच नव्हते. बरे, ठेवून घ्यावयाचे, तरी सोपें नाही. एका बोचक्यानिशी ती माझ्या घरी आली. तेव्हा तिच्या कपड्या-लत्त्याची सारीच व्यवस्था मला करावी लागली. तिने बिचारीने एक शब्दा-नेहि मला अमुक हवे असे म्हटले नाही उलट एवढे कशाला ? हें मला शोभेल का ? इतकी कुठे आहे माझी योग्यता ? असेच म्हणत होती.

पण मलाच वाटले, तिचे आईबाप वाईट निघाले हा काय तिचा दोष ? त्या आईबापाच्या घरी तिचा जन्म झाला एवढाच बिचारीचा दोष. पण या

दोषामाठी तिने इतके दिवस जे दुःख भोगले ते पुरे नाही का झाले ? गरिबी-मुळे तेव्हा शिकावयास मिळाले नाही व आता शिकावयाचे वय राहिले नाही पण झाले ते गेले. आता जे काय करता येण्यासारखे आहे ते करावे.

आतापर्यंतचे तिचे आयुष्य फारच दुःखात गेले कोणाहि पुरुषास त्याची कल्पनाच करता येणार नाही. तिच्या मनात माझ्याविषयी राग मुळीच नाही. काही तरी शिकण्यासाठी ती अत्यंत उत्सुक आहे, पण तिला काय करावयास सांगावे हे मलाच कळत नाही. अगदी खालची कामें करण्या-पलीकडे तिला काहीच येत नाही.

पण तिची बुद्धि मात्र तल्लख आहे हो ! जे काय सांगावे ते अत्यंत लक्ष्य-पूर्वक ऐकते. दररोज काही ना काही शिकतेच. माझ्या मनात तिचे लवकर लग्न करून द्यावे असे आहे. आणि तिला चांगला नवरा मिळण्यास मुळीच अडचण पडणार नाही किती सुंदर दिसते म्हणून सांगू ? हसायला नको. चांगल्या कपड्यात तुम्हीं तिला अजून पाहिलेले नाही.

मी हें करू शकले यात मला केवढे समाधान वाटत आहे ! थोडे पैसे खर्च करण्यापलीकडे मला यात कोणताच त्रास सहन करावा लागत नाही. आणि तिच्यासाठी थोडा खर्च केला तर ' मी स्वार्थी आहे. ' ही अलीकडे मला त्रास देणारी भावनाहि थोडीफार दूर होईल.

हे सारे करताना मला तुमचे मत घेता आले नाही याबद्दल क्षमा करा. वेळच नव्हता मुळी तसे करायला. आता तिला घेऊनच मी मावशीबाईच्या गावी जाणार आहे. कारण, तिला एकटीला येथे कुठे ठेवावयाचे ? आम्ही दोघीहि मावशीबाईकडेच राहू. त्यांनी रुकार दिला आहे. आम्ही थोडे दिवस तेथे राहू व मग मी दयेबरोबर पुढे जाईन. तोपावेतो निघेलच काही तरी मार्ग.

तिच्या पूर्वीच्या गोष्टी तुम्ही विसरून जा. तुम्हीं तिला एकदाच पाहिली आहे, आणि तीहि अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत. तुमच्या मनातली तिज-बद्दलची अढी गेली तर मला किती तरी बरे वाटेल ! कळावे.

तुमचीच
' दमयंती. '

हीं दोन्ही पत्रे हातात घेऊन नानासाहेब मावशीबाईच्या बगल्याच्या व्हराड्यात फेऱ्या घालीत होते. दयेची प्रकृति पुष्कळच सुधारल्याचें डॉक्टराचे पत्र त्यास गेले होत ती आता दुसऱ्याचा हात धरून व क्वचित् एकटीहि थोडे चालू फिरू लागली होती. या आनदात असतानाच हीं पत्रे त्याचे हातात पडली व थोड्याच दिवसानी ते कोकणातून निघाले दमयती काही तरी घोटाळा करील अशी त्यास भीति वाटली व गोष्टी फार पुढे जाण्या-पूर्वीच काही व्यवस्था करावी म्हणून ते तातडीने येथे आले दमयती आजच येणार होती. थोड्या वेळाने मावशीबाई व त्याचे यजमान दादासाहेब बाहेरून आले व व्हराड्यात खुर्च्या टाकून तिघेहि गप्पा मारीत बसली

"मावशी, हे पाहा दमयती काय लिहिते ती. त्या पोरीला येथे आणायला म्हणे तुम्ही समति दिली " नानासाहेब म्हणाले

"पण नाना, मी काय करू? दमयतीच मला पत्र आल. तिला नाही म्हणण कस शक्य होत, आणि त्याचा उपयोग तरी काय होता? दमयती तिला घेऊन एखाद्या हॉटेलमध्ये उतरली असती तिचा स्वभाव तुला माहीतच आहे "

मावशीबाईचे यजमान दादासाहेब म्हणाले— " तरी पण मला वाटत तुमच थोड चुकलच. दमयतीला थोड अप्रिय पण स्पष्ट शब्दात सागा-यलाच हव होत की, त्या पोरीच इथ येण आम्हाला नी नानासाहेबाना पसत नाही, म्हणून. "

" पण तिच्यावर अजून कोणाची सत्ता का आहे ? नानाचा तरी इत-क्यात तिच्यावर अधिकार काय ? "

" हीच तर खरी अडचण आहे तिच्यावर अजून कोणी अधिकार चालवू शकत नाही. " नानासाहेब म्हणाले.

" अस असल्यामुळ युक्तीनच काम काढल पाहिजे. दमयतीला तिच्या-बद्दल दया येते ती त्या पोरीसाठी त्यामुळ हव ते करील. मग दमयती काय करते तें आपल्या दृष्टीच्या आड न होता समोरच झालेल बर नाही का ? "

दादासाहेब म्हणाले— " पण तुम्हाला खरच का अस वाटत की या काल सापडलेल्या पोरीसाठी दमयती आपणा सर्वांना सोडील म्हणून ? "

" सोडणार नाही. " मावशीबाई म्हणाल्या. " ती आपल्याला जशी सोडायला तयार नाही होणार तशी पण तिलाहि ती सोडणार नाही. शिवाय त्या पोरीबद्दल अजूनहि आपणाला काहीच सांगता येत नाही. आपणा साऱ्यांच्या डोळ्यात ती कदाचित् धूळ टाकायची तिच्या वृत्तीवरुन धूर्त दिसते ती. "

" ते तर दिसतच आहे. पाहा ना दमयंतीवर तिनं कसं जाळं टाकलं न! तिच्या पत्रावरून स्पष्टच दिसत आहे की त्या पोरीनं एकदम हल्ला केला आणि किल्ला सर केला. " नानासाहेब हसत म्हणाले. " दमयंतीच्या पहिल्याच भेटीच्या वेळी दमयंतीविषयी सर्व गोष्टी तिनं मनात साठवून ठेवल्या, अन् आई मरताच त्या साऱ्या पोतड्यातून काढल्या. "

" पण—" दादासाहेब म्हणाले, " आईला तर दमयंती डोळ्यासमोरही नको होती ना ? "

" अगदी ! " नानासाहेब म्हणाले, " त्या दिवशी दमयंती तिच्या घराबाहेर पडली ती शिव्या आणि जवळ जवळ धक्के खाऊनच."

" पण या पोरीपेक्षा ती लाखपटीने बरी तिचा राग तरी कशावर होता ? " दादासाहेबांनी विचारले.

" लबाड लोकांच्या नेहमीच्याच गोष्टी. मी यमाजीरावाबद्दल सारा शोध काढला. त्यानं असं समजलं की तो तर अट्टल होताच पण ही बाईहि त्याची पक्की साथीदार होती. अहो, एकाकाळी बाबासाहेबांचं लग्न तिच्याशी व्हायचं घाटत होतं. त्यावेळी लिहिली असतील त्यांनी तिला काही प्रेमपत्रं. पण ती लग्नानंतरची आहेत असं दाखवून ती बाबासाहेबांजवळून पैसे उपटण्याची खटपट करीत असे. पण या साऱ्या गोष्टी दमयंतीला सांगायच्या कशा ? " नानासाहेब त्रासिक स्वराने म्हणाले.

नानासाहेबांना शांत करण्याच्या इच्छेने मावशीबाई म्हणाल्या—" दमयंतीच्या भावनांचा प्रश्न आला की झालीच तिची बुद्धि मंद. पण नाना, तुला नाही असं वाटत की, आपणा सर्वांत तिनं त्या मुलीला आणलं तर आपणा सर्वांनाच तिच्यावर नजर ठेवता येईल ? मला वाटतं आपण सारे एका अशिक्षित गावढळ मुलीला पुरुन उरू. "

" पण तिचं करायचं काय ? " नानासाहेब त्रासून म्हणाले, " तिला कशी तरी करून दूर तर केलीच पाहिजे. दयेबरोबर कोरड्या हवेच्या ठिकाणी किंवा नंतर कोकणात मी तिला ठेवायला मुळीच तयार नाही. "

" पण दमयंती तरी कुठं तसं म्हणते आहे ? " मावशीबाईंनी विचारले.

" मावशी, आज न म्हणू दे. पण तिची तोपर्यंत काही सोय लागली नाही की उद्या म्हणणारच ती तसं. "

" ते माझ्यावर सोपव तू. मी त्या मुलीला पारखीन. दमयंतीशीं बोलेन अन् तिला काही तरी कामात कुठं तरी अडकावून टाकीन "

" पण दमयंतीनं जाहिराती लावल्या असतील आणि जिकडे तिकडे वाण वाटीत सुटेल, ही आपली बहीण म्हणून. " दादासाहेब म्हणाले.

सगळ्यात वाईट हेच होते. आणि दमयंतीला तें कळणें कठीण होते. सरदार नानासाहेब जगताप ची मेव्हणी आणि म्हणे कुठे तरी काही तरी काम करते. छे ! असे काम करून पोट भरणाऱ्या व घराबाहेर राहाणाऱ्या मदयंतीपेक्षा, नको असलेली पण घरात राहिलेली मदयंती बरी. सुटकेची आशा म्हणजे दमयंतीने लिहिल्याप्रमाणे तिचे लग्न होणे हीच होती. पण लग्न म्हणजे काय सोपी गोष्ट आहे ? किती कठीण व कितीतरी गोष्टींवर अवलंबून ! कोणत्याही दृष्टीने पाहिले तरी दमयंतीचे करणे वेडेपणाचेच होते.

बोलता बोलता नानासाहेब बरेच गरम झाले. दमयंतीचा असला हेका म्हणजे नुसता खुळेपणाच नसून हा एक मोठा स्वभावदोष आहे. इतका गोड स्वभाव कधी कधी वीट आणणारा ठरतो. साधे औचित्य— उघड शहाणपणाहि— यामुळे कधी कधी दूर फेकला जातो, असे म्हणण्यापर्यंत त्यांची मजल गेली.

" गरीब बिचारी दमयंती. मला तिची कींव येते. " मावशीबाई म्हणाल्या.

नानासाहेब उसळून म्हणाले, " तिची कींव ! खरोखर तिच्या वेडेपणानं त्रस्त होणाऱ्या आम्हा साऱ्यांची कींव करायला हवी."

आणि या मनःस्थितीतच त्यांनी आणखी एक बाजू पुढे मांडली. ते

म्हणाले—" आणि या सान्याचा दयेवर काय परिणाम होईल कोण जाणे? दमयंतीबद्दल तिला किती आपलेपणा वाटतो हे तुम्हाला माहीतच आहे, आणि आता या पोरीचा अडथळा मध्ये आला तर तिला किती तरी वाटेल त्याच "

मावशीबाई म्हणाल्या— " त्याची नको काळजी करूस. दयेपासून त्या मुलीला अगदी दूर ठेवीन. "

" पण ते दयेला कळल्याशिवाय का राह्यच आहे? दमयंतीचं लक्ष्य आपल्याखेरीज दुसरीकडे कुठे आहे, हे तिला खासच कळेल " नानासाहेब म्हणाले.

नानासाहेबाचे हे बोलणे मावशीबाईना स्वार्थीपणाचे वाटले. दमयंतीने दयेसाठी– नानासाहेबाच्या पुतणीसाठी– आपला सारा वेळ– अगदी चोवीसचे चोवीस तास— द्यावेत हे नानासाहेबाना पटावे, व आपल्याच वडिलाच्या पुतणीसाठी— आपल्या चुलत बहिणीसाठी– थोडा वेळहि देऊ नये असे वाटावे, यात मनुष्यस्वभाव किती स्वार्थी व त्यामुळेच आधळा कसा होतो, याची त्याना मौज वाटली. त्यानी तसे बोलून मात्र दाखविलें नाही.

या गोष्टी होत आहेत तोच गाडीचा आवाज ऐकू आला व थोड्याच वेळात बगल्याच्या पायऱ्याशीं गाडी येऊन उभी राहिली. तिघेहि पुढे गेली. गाडीचे दार उघडले गेले व आतून आनदी, हसतमुख व प्रेमळ दमयंती स्मित करीत उतरली आणि तिच्या मागून? दमयंतीपेक्षा थोडी उंच, काहीशी भव्य आणि किती तरी सुदर दिसणारी अशी एक तरुणी उतरली

तिला पाहाताच तिघाच्याहि मनात एकच विचार एकदम आला— आपण इतकावेळ पोर, पोरगी, मुलगी म्हणून तुच्छपणे जिचा उल्लेख करीत होतो तीच का ही मदयती?

---

# ५

रात्रीची जेवणे झाली. दमयंती दयेला भेटण्यासाठी गेली. थोडीशी शिक्षा म्हणून, किंवा थोडे या रागावलेल्या मनःस्थितीत एकट्या दमयंतीशी बोलणे टाळावे म्हणून, नानासाहेब तिजबरोबर गेले नाहीत.

उकडत असल्याने गच्चीवर चांदण्यात चौघेहि खुर्च्या टाकून बसली. मावशीबाई, दादासाहेब, मदयंती व नानासाहेब. दादासाहेब हवापाण्याच्या, इकडच्या प्रेक्षणीय स्थळांच्या वगैरे गोष्टींबद्दल बोलू लागले. मावशीबाईंची इच्छा नसतानाहि बरे दिसणार नाही म्हणून त्या बसल्या. या दोघांच्यामध्ये मदयंती बसली होती. चंद्राचा सौम्य प्रकाश तिच्या तोंडावर पडून तिचे सौंदर्य वाढवीत होता. आणि तिच्या समोरच नानासाहेब बसले होते.

दादासाहेबांच्या गोष्टी मदयंती मन लावून ऐकते आहे असे वाटेना. परमेश्वर तरी इतके सौन्दर्य अशा स्त्रियांना का देतो? दमयंतीपेक्षाहि ही इतकी सुंदर का, याबद्दलचे विचार नानासाहेबांच्या मनात चालले होते. मनातल्या मनात ते दमयंती व मदयंती यांची तुलना करीत होते. या त्यांच्या तंद्रींतून ते भानावर आले 'दमयंतीबाई कधी येतील?' या मदयंतीच्या प्रश्नाने. ते म्हणाले– "मला वाटतं त्यांना बराच उशीर होईल. दयेची आणि त्यांची भेट बऱ्याच दिवसानंतर होते आहे. तेव्हा सहजच त्या दोघी बराच वेळ बोलत बसतील. दमला असला तर तुम्ही झोपायला जा हव्या तर."

"पण तुला काय वाटतं?" या एकेरी संबोधनाने बोलणारे नानासाहेब आज 'तुम्ही' या बहुवचनी शब्दाने बोलत आहेत हे मदयंतीच्या लक्ष्यात आल्याखेरीज राहिले नाही. ती म्हणाली, "सरदारसाहेब, दमायला काय

झाले ? आगगाडीच्या किंवा मोटारीच्या प्रवासाने दमण्यासारखी मी नाजुक नाही मी आहे चांगली टणक. कष्ट अन् जागरण करण्याची मला हवी तेवढी सवय आहे "

" मग मला वाटतं, इथल्या निरुद्योगी वातावरणात तुम्हाला कंटाळा येत असेल, नाही ? "

" पण निरुद्योगी आहेच कोण ? मला तर तुमच्या किती तरी गोष्टी शिकायच्या आहेत "

दादासाहेब हळूच म्हणाले, " हो. हे तर खरंच. जन्मभर आपणाला शिकण्यासारख्या गोष्टी असतातच. "

मदयंती त्यांच्याकडे पाहून हसली व म्हणाली, " पण मला काय शिकायचं आहे, हे तुम्हा सर्वांना माहीतच आहे. "

या स्पष्ट बोलणाऱ्या बाईला उत्तर देणे सर्वांनाच कठिण वाटले. नानासाहेब काही तरी टाकून बोलण्याच्या विचारात दिसले. मावशीबाई किंचित् बावरल्यासारख्या झाल्या व ' हुश्श ' करीत हातातल्या पंख्याने वारा घेऊ लागल्या. दादासाहेब पुन्हा एकाद्या प्रेक्षणीय स्थळाची गोष्ट काढण्याच्या विचारास लागले.

पण सर्वांना दूर सारावं अशा मुद्रेने मदयंती खुर्चीच्या पाठीवर रेलली व धीटपणे म्हणाली— " तुम्हा साऱ्यानाच माझा राग येत असेल. पण मी स्पष्टपणे बोलणार आहे तुम्हा साऱ्याशी. " साऱ्याशी म्हणत असता मदयंतीची दृष्टि मात्र स्थिर होती एकट्या नानासाहेबावर.

मावशीबाईंना हा प्रसंग टाळावा असे वाटत होते. पण दादासाहेब शांतपणे म्हणाले— " हो. मदयंतीबाई जर स्पष्टपणे त्यांना जे सांगायचं आहे ते सांगतील, तर मला वाटतं, ते साऱ्यानाच बरं होईल. "

नानासाहेब एकदम सचेत झाले. ही आता काय बोलणार या उत्सुकतेने त्यांना एकदम जागृत केले. एकाद्या समाधानाच्या तंद्रीत असताना एकदम एकादा धक्का बसला म्हणजे माणूस जसा खडबडून भानावर येतो, तसे त्यांना झाले. मदयंतीचे शब्द साधेच होते. पण त्यांनी त्यांची दृष्टि मात्र विस्फारित झाली होती. समोर बसलेली ही सुंदर पण भयंकर तरुणी

पाहून त्याच्या मनात एकदम ‘ राग ’ आणि ‘ द्वेष ’ या दोन्ही भावनांचे क्वचित् होणारे मिश्रण झाले होते.

मदयंती शांतपणे व मोजून शब्द टाकून बोलू लागली, “ सरदार नानासाहेबांच लवकरच दमयंतीबाईशी लग्न व्हायच आहे. तुम्ही सारे त्यांचे मित्र. मी तुमची पाहुणी. गेल्या थोड्याच दिवसांत दमयंतीबाईंच्या ओळखीच्या काही लोकांशीं माझी ओळख झाली. पण मला अस आढळून आल की, ते सारे मनातून माझा द्वेष करतात. ”

मावशीबाई टेबलावरचा अडकित्ता घेउन सुपारी कातरू लागल्या त्या म्हणाल्या--“ मदयंतीबाई, तुम्ही चुकता आहात. आम्ही कोणी तुमचा द्वेष करीत नाही. ही द्वेषा-विषाची भाषा बोलण बरं नाही. ”

“ हो. ” मदयंती म्हणाली-- “ सभ्य आणि सुशिक्षित समाजात न वागल्यामुळ कोणते शब्द वापरावे हे मला समजत नाही. मी आहें गावढळ. पण तुम्ही शिकलेली माणस, माझ्या भाषेचा अर्थ काय आहे, हे बरोबर समजू शकत नाही अस मात्र मला वाटत नाही. ”

“ तरी पण मला वाटत, तुम्ही आपल म्हणण अधिक स्पष्ट कराव. ” दादासाहेब म्हणाले.

मदयंती नानासाहेबांकडे वळून म्हणाली-- “ पण सरदारसाहेब मुळीच बोलत नाहीत, आणि मुख्य प्रश्न आहे त्यांचाच. दमयंतीबाईशीं सर्वांत निकट संबंध त्यांचाच यायचा आहे. ”

नानासाहेब हसले. या संभाषणात त्यांना मौज वाटत असावी असें दिसल. ते म्हणाले, “ कुमारी मदयंतीबाईंनी आपली सारी बाजू पुढं मांडली म्हणजे मग मी निकाल देईन. ”

“ ठीक आहे. ” मदयंती म्हणाली, “ तर मग ऐका. पहिली गोष्ट अशी की, दमयंतीबाई आणि मी सारख्याच- एकाच सभ्य घराण्यातल्या- आहोत. त्यांची आई तर माझ्या आईच्या कुळापेक्षाहि थोड्या खालच्याच कुळातली होती, असं ऐकते. आमच्या दोघीपैकीहि सरदारी घराण्यातली कोणीहि नाही. ”

मावशीबाईचा उडाकित्ता एकदम थाबला. मदयतीला मध्येच थाबवून त्या म्हणाल्या— " शूशू. या असल्या गोष्टी बोलायच्या नसतात, मदयंतीबाई. "

" नसतील " मदयतीने पटदिशी उत्तर दिले— " पण त्या बोलल्या नाहीत म्हणून तुमच्या मनात का येत नाहीत ? सागा, नसल्या येत तर. तुम्ही आतापर्यंत माझ्यामागे माझ्याबद्दल किती तरी बोलला असाल. आणि एकाद्या जळूसारखी मी दमयतीबाईना चिकटले आहे, असहि तुम्हाला वाटत असेल "

" आणि समजा, आम्हाला असं वाटल तर " नानासाहेब मध्येच एकदम म्हणाले, " तुमच यावर काय म्हणण आहे ? "

न्यायाधीशाच्या आवाने बोलणारे नानासाहेब प्रतिस्पर्ध्याच्या नात्याने बोलू लागलेले पाहून मदयतीसहि चेव आल्यासारखे दिसले. ती म्हणाली, " मी तुम्हाला स्पष्टच सागणार आहे. पाठीमाग कुजबूज करण्यापेक्षा तोडावर सागण बर. नाही का ? ह, तर प्रथमच मला तुम्हाला अस सागायच आहे की, मला तुमची भीति वाटत नाही, तुमच्या मोठेपणान दिपून मी तुम्हाला भिईन अशी तुमची समजूत असली तर ती काढून टाका भिकाऱ्याना कश्शाची भीति वाटत नाही. तुमच्यात ज्या काय विशेष मोठेपणाच्या गोष्टी आहेत, त्या शिकायला मला वाटत, मला वेळ लागणार नाही वाटत त्यापेक्षा ते शिकण पुष्कळच सोप आहे. मी मूर्ख नाही आणि बायकात सौंदर्य म्हणन जी मोठी गोष्ट असायला पाहिजे ती माझ्यात नाहीस नाही. माझ्याजवळ आतापर्यंत जे काय नव्हत, ते म्हणजे पैसा. पण आता गोष्ट निराळी. "

" का ? दमयतीच्या पैशावर तुमचा हक्क आहे, तो तुमचाच आहे, अस तुम्हाला वाटत की काय ? " नानासाहेब उसळून म्हणाले.

" हा माझ्या वाटण्याचा प्रश्न नाही, सरदारसाहेब दमयतीबाईना तस वाटत. त्याना अस वाटत की त्या माझ्यासाठी जेवढा पैसा खर्च करतील तेवढा थोडाच. आता तुमच्याशीं जशी मी स्पष्ट बोलते आहे तशीच मी

त्याच्याशी बोलते आहे. आणि मला– त्याच्याच चुलतबहिणीला– लागेल तो पैसा देण्याची त्याची तयारी आहे. '' मदयंतीने शांतपणे उत्तर दिलं.

" दमयंती भलतीच उदार आहे. हें औदार्य वेडेपणाच आहे भावना-वश होऊन केलेलं आहे. ' मावशीबाई उद्गारल्या

" दमयंतीबाई तर अजून माझ्यासाठी कितीतरी करणार आहेत. आपल्या बरोबरची म्हणून वागवायच त्यानी मला कबूल केलं आहे. "

दादासाहेब म्हणाले--" दमयंती सुदैवी आहे पण तिचं असं करणं वेडेपणाच आहे, असं तुम्हालामुद्धा नाही वाटत ? "

मदयंतीने एकवार त्यांच्याकडे टक लावून पाहिलं व ती म्हणाली--" मग हें माझं सुदैव म्हणा हवं तर. "

बाजू बिनतोड अगावर आल्यामुळे मावशीबाई रागावल्यासारख्या दिसल्या. पण नानासाहेब उपरोधिकपणे म्हणाले-- " मदयंतीबाई इतकं स्पष्ट बोलल्या ही त्यांची मोठी मेहरबानी आहे. '

" सरदारसाहेब, ही मेहरबानी नव्हे. मला ठाऊक आहे की तुम्ही सारे मला इथं राहाणं कठीणच काय, अशक्यहि करू शकाल. म्हणून मी आपलं म्हणणं स्पष्टपणे मांडलं आहे. दमयंतीबाईत अन् माझ्यात फारसा फरक नाही आम्ही सारख्याच. फक्त तिच्या पाठीशी सुदैव आणि सुदैवी माणसानी दुर्दैवी बांधवावर कृपा करणं अयोग्य नाही दमयंतीबाई तशा स्वभावाच्या आहेत. " मदयंतीने दमयंतीच्या स्वभावातली मख्खी नेमकी ओळखली होती, आणि ती पुढे म्हणाली— " योग्यतेपेक्षा अधिक मिळणं हें सुदैव दमयंतीबाई मला भेटल्या हे माझं सुदैव. मला हवं ते त्या मला देऊ इच्छि-तात आणि त्या देतील ते मी घेऊ इच्छिते. "

या रोखठोक उत्तराने नानासाहेबांच्याहि तोंडाला कुलूप पडलं

मदयंती उठली. ती म्हणाली--' माझ्याजवळ काही नाही हे तुम्हाला ठाऊकच आहे. पण तो काही माझा दोष नाही. ''

नानासाहेबहि उठून उभे राहिले. दोघेहि सारख्याच उंचीची दिसत होती " कल्पना करा की, माझ्या वडलांना ते बक्षीस मिळालं असतं--'' ती थोड्या उद्धटपणे म्हणाली.

"मी तुमच्याजागी असतो तर असं मात्र बोलला नसतो." नाना-साहेब हळूच म्हणाले.

"हा सारा दैवाचा खेळ आहे. आणि सरदारसाहेब, दैवाबद्दल कधी कोणी खात्री देऊ नये." ती म्हणाली.

"दमयंतीवरील अधिकारावर तुम्ही थोडं अधिकच विसंबत नाही का?"

"नाही. मला वाटतं, दमयंतीबाई मला कधीच अंतर देणार नाहीत."

"हे खरं. तुमच्या बहिणीचं लग्न होईपर्यंत तिच्यावर माझा काही अधिकार नाही. पण हा प्रश्न थोड्याच दिवसांचा आहे असं नाही तुम्हाला वाटत?"

"हो. पण माझं लग्न त्याच्याहि आधी होणार नाही कशावरून?" मदयंती हसत म्हणाली.

मदयंतीच्या बोलण्याने सारीच थक्क झाली.

तिने पाहिले तो दादासाहेब उठून उभे राहिले होते व मावशीबाई पान-सुपारीचे तबक आवरू लागल्या होत्या.

मदयंती हळूच म्हणाली— "थोडक्यात म्हणजे माझं म्हणणं असं की, मी पूर्ण स्वार्थी आहे. तुम्ही कोणी माझ्या आड येऊ नये. मी तुमच्यात लुडबुड करणार नाही तुम्हाला त्रास देणार नाही. मला जे काय सांगायचं होतं ते सांगून झालं. मी जाते आता झोपायला. मी गेल्यावर माझ्याबद्दल तुम्हाला काय बोलायचं असेल ते बोला आणि ठरवा."

एवढे म्हणून तिने दादासाहेबास व मावशीबाईस नमस्कार केला व ती जाऊ लागली. दादासाहेब दाराशीच उभे होते. त्याच्याजवळ जाऊन आता-पर्यंतच्या उद्धटपणाशी विसंगत अशा नम्रतेने आपली मान वाकवून तिने नमस्कार केला व ती निघून गेली.

तिघांच्याहि तोंडून एकाच वेळीं उद्गार निघाले

दादासाहेब म्हणाले— 'नटी!'

मावशीबाई म्हणाल्या— 'कृत्या!'

नानासाहेब म्हणाले— 'रंभा!'

# ६

काही दिवस गेले दयेची व मदयंतीची अजून गाठ पडली नव्हती आरंभी आरंभी दमयंतीजवळ दयेच्या गोष्टी काढून तिला भेटण्याची मदयंतीने उत्सुकता दाखविली होती पण मावशीबाईकडे आल्यापासून तिने कधी तिला भेटण्याची इच्छा दर्शविलीच नाही.

दमयंतीलाहि या गोष्टीची जाणीव झाली होती की, या सार्‍या लोकांत मदयंतीला आणल्याने मोठा गोंधळ उडून गेला आहे मावशीबाईनी तर 'आम्हाला आता परगावी जावयाचं आहे' असे सांगून पर्यायाने दुसरीकडे राहाण्याविषयी स्पष्टच सुचविले होते मदयंतीस उगाच बेफाटपणे न बोलण्यास दमयंतीने सुचवून पाहिले. पण ती म्हणे-- 'झाल काय थोड स्पष्ट बोलल म्हणून ? मी खोट तर बोलत नाही ना ? याना उगाच थोबाळीत कशाला राहायच ? आपण काय याचे गुलाम आहोत ? आपण त्याच वाईट तर नाही ना करीत ?'

इकडे दमयंतीची एक बहीण तिच्याबरोबर आली आहे हे ऐकून दया सारखे प्रश्न विचारी व तिला भेटण्याविषयी आपली उत्सुकता दाखवी. पण दमयंती काही ना काही कारणाने तो प्रसंग टाळी कारण नानासाहेबांचे मन मदयंतीबद्दल कलुषित आहे व दयेजवळ तिला ते ठेवू इच्छित नाहीत, हे तिला माहीत होते. दमयंती यामुळे मोठ्या अडचणीत होती.

मदयंती शक्य तितके या लोकास टाळीतच असे. हे लोकहि कामापुरतेच तिच्याशी बोलत. ती सारा वेळ बहुधा आपल्याच खोलीत असे. बुद्धि चांगली तीव्र आणि या श्रीमंतीत वाढलेल्या बायकाना ज्या गोष्टी येतात त्या शिकण्याची इच्छा. त्यामुळे पुस्तकावरूनच किती तरी गोष्टी ती शिके.

तिची प्रगति पाहून दमयंतीस आश्चर्य वाटे. ती तिला हवी ती पुस्तकें आणवून देई व जेवढे शिकविता येईल तेवढे शिकवी. नानासाहेबाकडे पाहण्याची मदयंतीची दृष्टि इतर लोकांपेक्षा निराळी असली, तरी ती त्याच्याशी बोलणं होता होईतो टाळीतच असे. सध्याकाळी ती फिरावयास देखील एकटीच जाई.

अशाच एका ढगाळ सध्याकाळीं फिरत असता, दयेला ज्या बंगल्यात ठेविली होती, तिकडून मदयंती निघाली. एकदम दयेची भेट घ्यावी असे तिच्या मनात आले. ती आत शिरली. मावशीबाईच्या बंगल्यातील कडक शिस्त येथे नाही हे तिच्या लगेच ध्यानी आले. दाराशीं तिने चपला काढून ठेविल्या व थाप मारण्यासाठी दाराला हात लावला तोच दार उघडले गेले. ‘कोण? आत या.’ असा क्षीण शब्द तिच्या कानी पडला आणि आत शिरताच दयेची व तिची दृष्टादृष्ट झाली

दोघीनाहि एकमेकींकडे पाहून आश्चर्य वाटले. थोडा वेळ दोघीहि एकमेकींकडे पाहतच राहिल्या

आजारी, आजारी म्हणून ऐकत असलेल्या या मुलीचा सतेज चेहरा, लहानशी जिवणी, लुसलुशीत ओंठ, आजारपणातहि आगा-खाद्यावरील कपडे व अलंकार, गर्भश्रीमंताचे एक प्रकारचे तेज व लहान मुलासारखी हट्टी व हुकमी मुद्रा पाहून, ही मुलगी खरोखर आजारी नसून श्रीमंतीच्या चोचल्यातलाच हा प्रकार आहे, असे मदयंतीला वाटलें. तिकडे दयेला क्वचित् दिसून येणारे सौंदर्य, उंच व भव्य शरीर, नसानसातून खेळणारे चैतन्य आणि कशाचीहि पर्वा न करणारी बेफिकीर मुद्रा पाहून, एका प्रकारचा आदर वाटला. ती पडल्या पडल्याच म्हणाली—“या ना, उभ्या का? दमयंतीची बहीण ती तुम्हीच का? तुमच्यात आणि तिच्यात काहीच साम्य नाही.”

“असणार कुठून? आमचे दोघींचे वडीलहि सारखे नव्हते.” मदयंतीने उत्तर दिले.

“बसून बोला ना. म्हणजे मला मान वर करून बोलाव लागणार नाही.”

“माझ्यासारख्या अभागिनीजवळ तुमच्यासारख्या भाग्यवान् माणसाला

बोलण्यासारखं काय असणार ? " असं म्हणून मदयंती दयेच्या जवळ थेट तिच्या पलंगावरच जाऊन बसली.

" भाग्यवान्, आणि मी ?" दया आश्चर्याने उद्गारली. आजपर्यंत तिला भेटावयास येणारे सारे तिच्याकडे एक दुर्दैवी मुलगी म्हणूनच पाहात होते " मी भाग्यवान्, या तुमच्या बोलण्याचा अर्थ मला नाही समजला.

" मला तरी तसं वाटतं. तुम्हाला काय कमी आहे ?" मदयंती स्मित करीत म्हणाली व तिने दयेचा हात आपल्या हातात घेतला

" पण मी अशी अथरुणाला खिळलेली दिसते आहे ना ? आज कितीतरी दिवस मी अशी आहे "

" मी सांगू का तुम्हाला ' मदयंती म्हणाली— ' लोक समजतात इतक्या आजारी तुम्ही खास नाही मला वाटतं, तुमच्या आजाराचं स्तोमच फार केलं जातं. नाही का ? मी राहिले आहे गरिबीत, आणि कितीतरी आजारी बायका पाहिल्या आहेत. तुमच्यापेक्षा कितीतरी अधिक आजारी असलेल्या स्त्रिया चांगल्या समार करताना मी पाहिल्या आहेत."

मोठ्या ममतेने ती दयेच्या हातावरून आपला हात फिरवीत होती.

असे हे ऐकण्याचा अनुभव दयेला अगदी नवीनच होता. आतापर्यंत तिच्याकडे येणारे सारे लोक लांब चेहरे करून बसत व आजाराच्याच गोष्टी बोलत. ती थोडा वेळ विचार करून म्हणाली—" हो मला देखील कधी कधी असं वाटतं की, हे लोक माझ्या आजाराचं फार स्तोम करतात म्हणून. खरं सांगायचं म्हणजे मला या डॉक्टरांचा, परिचारिकांचा आणि औषधाचा अगदी कंटाळा आला आहे. सारखं हे करू नका, हे खाऊ नका, असंच चाललेलं असतं. आमच्या नानांना या माझ्या काळजीत उदास पाहिलं म्हणजे मला भारी वाईट वाटतं. पण आता मी कित्ती तरी बरी झाले आहे. मला वाटतं, मी लौकरच बरी होईन."

" तुमच्या आजाराचा एवढा बोजवारा न केला तर तुम्ही कितीतरी लवकर चांगल्या बऱ्या व्हाल. सरदारसाहेब जर इतके श्रीमंत नसते तर तुम्ही इतक्या आजारी राहताच ना. " मदयंतीचे बोलणे फार धिटाईचे होते. पण दयेला त्याबद्दल राग येण्याची गोष्ट तर दूरच, तिच्या ध्यानातही ही धिटाई आली नाही. आपल्यापुढे आज नवीनच मांडलेल्या या नव्या

बाजूचा विचार करण्यातच ती गुंग झाली होती. मदयंती पुढे म्हणाली—
" आजाराच्या या साऱ्या गोष्टी जर तुमच्यापासून दूर गेल्या तर तुम्ही एकदम बऱ्या व्हाल. तुमच्याशीं बोलताना प्रत्येकजण तुमच्या आजाराविषयीच बोलतो ना ? झाल तर मग. एकाद्याला रोगी म्हणून सारखच म्हणू लागल की तो नाही का आपल्याला रोगीच समजू लागायचा ? "

" म्हणजे मग, मी काही खरोखरच रोगी आहे अस नाही तर वाटत तुम्हाला. "

" नाही, मुळीच नाही. "

आणि आपल्या स्वतःच्या धडधाकट प्रकृतीवरून, जे काही साधारण रोग तिच्या पाहण्यात आले होते त्यावरून, आणि रोगाची पर्वा न करिता नेहमीचीं कामे करतानाच गरीब लोक बरे कसे होतात यावरून तिला खरेच तसे वाटले. शिवाय दमयंतीजवळच्या पुस्तकांत तिने एक मानसोपचाराचे पुस्तक वाचले होते. त्यात असे लिहिले होते की, रोग्याला बरे करावयाचे असेल तर त्याच्या मनात मी बरा आहे, मी बरा होत आहे, अशाच कल्पना भरविल्या पाहिजेत. या गोष्टीच ती दयेच्या मनावर ठसवीत होती इतक्यात परिचारिका तेथे आली.

तिच्या नजरेवरूनच मदयंतीने ताडले की, आपले येणे, दयेजवळ बसणे, बोलणे वगैरे तिला आवडले नसावे. ती लगेच उठून दयेच्या उशाशी ठेवलेल्या टेबलाजवळ गेली व त्यावरील वस्तू पाहू लागली.

" हे काय हो ? किती सुंदर आहे हे ! "

" हा आहे वाघनखाचा ताईत. आमच्या जोश्यानी सांगितल की सात रत्न जडवून सोन्याच्या गोफात गुंफून हा गळ्यात घातला की राहूच्या दशेत त्रास होत नाही. म्हणून नानानी रत्न जडवून हा आणला आहे. गोफ तयार करायला दिला आहे तो आला की मी हा गळ्यात घालणार आहे."

" हा राहु कोण ? आणि याची दशा म्हणजे काय ? "

" अहो, राहु हा एक नवग्रहातला क्रूर ग्रह आहे. आहे तो काल्पनिक. पण तो मनुष्याना फार पिडतो. त्याच्या पीडा देणाच्या कालाला दशा म्हणतात. " दया आपलें ज्ञान दाखवीत म्हणाली.

"ग्रह कल्पनेंत नी पीडा खरी. सारच चमत्कारिक! पाहिलत ना मी किती अडाणी आहे ती! तुम्ही मनात आणल तर तुम्ही मला किती तरी गोष्टी शिकवू शकाल."

"मला तरी फारस कुठ ज्ञान आहे?" दया जरा लाजून म्हणाली. "पण जे काय मला येत ते जर मला कुणाला शिकवता आल तर मला किती तरी बर वाटेल. माझ्या सारे उपयोगी पडतात. पण मी आजारी कुणाच्या उपयोगी पडणार?" आपण कुणाच्या तरी उपयोगी पडू शकतों या गोष्टीची तिला कधी जाणीवच झाली नव्हती. तिचा चेहरा या भावनेने अधिक सतेज दिसू लागला

मदयतीने ते वाघनख उचलले व ती ते निरखून पाहू लागली. "किती तरी चागल आहे हे वाघनख! सारख पाहातच राहावस वाटत याच्याकडे आमच्यासारख्या गरिबाना कुठून दिसायच्या अशा वस्तु?" ती म्हणाली.

आपणास आनद देण्यासाठी लोक अशा वस्तु आणून देतात. पण त्या पाहून लोकाना आनद होतो हीहि कल्पना दयेला नवीनच होती ती म्हणाली— "नानानी मला किती तरी अशा वस्तू दिल्या आहेत. पण त्या साऱ्या आहेत कोकणात, आमच्या रत्नपूर गावी." दया मोठ्या उत्साहाने बोलत होती.

दयेच्या चेहऱ्यावर दिसणारा तजेला, गालावर आलेली लाली, चमकणारे डोळे हे सारें पाहून परिचारिका म्हणाली—"ताईसाहेब, पुरे नाही का झाल इतक बोलण? फार बोलायच नाही म्हणून सागितल आहे ना डॉक्टरानी?"

मदयतीने वाघनख टेबलावर ठेविले व ती दाराकडे वळली. पण दयेने तिचा हात ओढला व ती म्हणाली— "थाबा ना थोड्या. मला तुम्हाला रत्नपूरच्या गोष्टी सागायच्या आहेत."

"तुम्ही रत्नपूरला राहात नाही वाटत?"

"आम्ही कोरड्या हवेवर गेलो म्हणजे नाना तिकडे जाणार आहेत काही सुधारणा करायला. पावसाळा सपला की आम्हीहि तिकडे जाऊ."

"मी जर तुमच्या जागीं असतें तर रत्नपूरलाच गेले असतें—" पण

परिचारिका मध्येच म्हणाली, " ताईसाहेबाना ओली सर्द हवा मानवत नाही. आणि कोकणात पावसाळी हवा तर फारच वाईट असते "

दयेला परिचारिकेचा हा चोंबडेपणा फारसा आवडला नाही तिने डोळे वटारून परिचारिकेकडे पाहिले व ती मदयंतीस म्हणाली, " नानाबरोबर तिथ राहायला मलाहि आवडत. पण तुम्ही नाही का येणार आमच्याबरोबर कोरड्या हवेवर ? "

" नाही "

" का ? दमयंती नाही म्हणते ? "

" नाही. तस नाही पण माझीच जायची इच्छा नाही. "

दयेच्या चेहऱ्यावर निराशा पसरली तिच्या साऱ्याही भावना तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत.

" बर. पण मग आता तुम्ही केव्हा याल ? "

" म्हणाल तेव्हा. पण हे तुम्हीच ठरवल पाहिजे. तुमच्याकडे काय, कितीतरी लोक येणार मी कुठ जाणार ? माझ्या ओळखीच इथ कुणीच नाही "

" का ? जीजी आहे ना ! मी दमयंतीला जीजी म्हणते."

" ह."

" आणि तिच्या ओळखीची इतर माणस ? "

" त्या कोणालाच मी आवडत नाही आणि का मी त्याना आवडावी ! तुम्हाला माहीतच आहे की मी आहे बोलून चालून गरीब. "

दया विचार व परिचारिका चुळबुळ करू लागली.

मदयंतीमुळे आपली कितीतरी करमणूक, आणि अगदी निराळ्या तऱ्हेची करमणूक झाली. पण ही परिचारिका आता तिला अधिक वेळ राहू देणार नाही, असे वाटून दया तिच्याकडे त्रासिकपणे पाहू लागली.

" दमयंतीन तुम्हाला आपल्याबरोबर का आणल नाही ? " दयेने विचारलेच

" मीच आले नाही त्याच्याबरोबर. मला वाटल की, प्रथम मी तुम्हाला एकटीनच भेटाव. "

-- बाहेर वादळी हवा पडली होती दयेने खिडकीतून बाहेर पाहात म्हटले, " किती घाणेरडी हवा पडली आहे आज "

" म्हणूनच तर कोरड्या हवेवर जायच तिथे अशी हवा नसते पाऊस थोडा, अन् गेला की लगेच ऊन्ह. "

" पण दिवस घालवायचे सगळे आजाऱ्यातच ना ? तिथ कितीतरी आजारी असणार. जिकडे पाहाव तिकडे आजारी, डॉक्टर आणि परिचारिका. चागला माणूससुद्धा आजारी पडायचा तिथ राहून." मदयती म्हणाली.

" मला तरी मनापासून कुठ तिथ जावस वाटत ? आम्ही रत्नपूरला गेलों तर तुम्ही याल आमच्याबरोबर ? " दयेने नव्याच उत्सुकतेने विचारले

" हो. रत्नपूरला यायच कुणी म्हटल तर अवश्य येईन. मला तुमच ते रत्नपूर पाहायला आणि तुमच्याजवळ राहायला कितीतरी आवडेल. "

" खर ? " दयेने विचारले. आनद औत्सुक्य, समाधान तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होते.

" हो " मदयती म्हणाली. " पण आता मला गेलच पाहिजे. या बाई माझ्याकडे डोळे वटारून वटारून पाहात आहेत आणखी थोडा वेळ राहिले तर मला वाटत या मला धक्के देऊन बाहेर घालवतील."

असे म्हणून मदयतीने दयेला नम्रपणे व परिचारिकेस ऐटीत नमस्कार केला व ती निघून गेली

---

# ७

" ओहो ! या डॉक्टर महात्मे. इकडे कुणीकडे आज एकदम ? "

" अहो, तुम्हाला पत्र नव्हत का लिहिल त्या जगतापाच्या मुलीबद्दल ? नानासाहेबाच मला एकदम निघून येण्याविषयी पत्र आल म्हणून आलो. पण म्हटल, तिकडे जाण्यापूर्वी तुम्हाला भेटून विचारून घ्याव, काय कम-जास्त आहे ते "

" काही नाही. त्या मुलीच हृदय अगदी क्षीण आहे. त्याची क्रिया केव्हा थांबेल याचा नियम नाही. त्यामुळे तिच्या कलानच औषध द्यायच मी ठरवल होत. पण अलीकडे कोणी एक बाई तिच्याकडे आली आहे. तिची छाप अशी पडली आहे त्या मुलीवर की, काही विचारू नका ! "

" हं. नानासाहेबानी मला लिहिल आहे त्याबद्दल. ती आहे नाना-साहेबाची भावी मेहुणी. दमयंतीबाईची एकदमच उपटलेली नवी चुलत बहीण. "

" पण तिन दयेच्या मनात काय काय भरविल आहे, देव जाणे. डॉक्टर, नर्स, औषध याच नाव काढल की एकदम चिडते. ती म्हणते, मला आता काही होतच नाही. मी थोडी अशक्त असेन, पण तुम्ही सर्वांनी मला रोगी रोगी करून खरीच रोगी करून ठेवली आहे. त्या अपघाताचा आता काही परिणाम शिल्लक नाही. रोगहि असा काही म्हणण्यासारखा नाही. पण तिच्या हृदयाच काय करायच ? पुष्कळ वेळ तपासताना तर तिला हृदय आहे की नाही याचीच भ्रांति वाटते. "

" तिच्या हृदयाची क्रियाच नुसती मंद आहे अन् एकादे दिवशी ती कदाचित् थांबेलहि. पण परवा मला दादासाहेब भेटले होते, त्यांच्या बोलण्या-वरून या बाईला मात्र हृदयच नसावं असं वाटतं."

" काहो ? "

" ती म्हणे असं बेछूट बोलते की काही विचारू नका. आपलं बोलणं कुणाच्या वर्मी लागेल, किंवा त्याचा काय परिणाम होईल, याची तिला बिल्कुल पर्वा नसते."

" पण काही म्हणा डॉक्टर, त्या बाईंत दुसऱ्यावर छाप मारण्याची कला मात्र भयंकर आहे असं वाटतं. एवढे नानासाहेब ना ? पण त्यांच्यावर सुद्धा तिने छाप बसवली आहे."

" अहो, त्याचं कारण उघड आहे. नानासाहेबासारखा अविवाहित तरुण तिच्या सौंदर्याची छाप त्यांच्यावर बसायचीच. ती म्हणे फार सुंदर आहे."

" आहे खरी. आपण काही तिच्यापेक्षा सुंदर स्त्री अजून पाहिली नाही. आणि विशेष हे की, इतकी सुंदर असून कामाला मुळीच कंटाळत नाही. इतकी की, नर्ससुद्धा जे काम करणार नाही तेहि वेळ आली तर ती करायला तयार. काही दिवसापूर्वी त्या दोघीहि बहिणी तिथेच राहायला आल्या अन् तेव्हापासून त्या साऱ्या घराचा ताबा तिनंच घेतला आहे म्हणा ना ! दयेचं तर तिच्यावाचून पान हालत नाही."

" असं ऐकतो की, तिची आई आधळी अन् तशीच बरीच वर्षं आजारी होती. शिवाय घरात दारिद्र्य होतं अगदी अठरा विश्वे त्यामुळं हवं ते काम करण्याची नि आजाऱ्याची मर्जी सांभाळण्याची तिला सवय असेल. दुसरं काय ? तिनं म्हणे दयेचं मन असं वळविलं आहे की, ती आता कोरड्या हवेवर जायला मुळीच तयार नाही. कोकणात रत्नपूरलाच येणार असा हट्ट धरून बसली आहे, असं नानासाहेब आपल्या पत्रात लिहितात."

" हो. मला ते विचारीत होते, दयेला कोकणची पावसाळी हवा मानवेल का म्हणून."

"आणि तुम्ही तिच्या तिथे जाण्याला रुकार दिला आहे, असंहि नाना-साहेबांनी कळवलं. तेवढ्यासाठीच त्यांनी मला इथं बोलावलं आहे."

" हो. मी तसा रुकार दिला खरा. हे पाहा, खर सांगायच म्हणजे ती मुलगी आता काही महिन्याचीच सोबती आहे, अस तिच्याबद्दल माझ स्पष्ट मत झाल आहे मग तोवर तिला ज्यात सुख होईल ते करू द्याव अस मला वाटत."

एवढे बोलणे झाल्यावर डॉ महात्मे नानासाहेबाकडे गेले. नानासाहेबानी त्याना दोन दिवस ठेवून घेतले मदयती तेथे होती. डॉक्टराना पाहिल्याबरोबरच दयेची मर्जी गेली होती. निरनिराळ्या वेळीं त्यानी तिला तपासली. तिसऱ्या दिवशी डॉक्टराना पोचविण्यासाठी नानासाहेब त्याच्या बरोबर स्टेशनावर गेले.

" काय डॉक्टर, काय वाटत तुम्हाला मग ? " नानासाहेबानी प्रश्न केला.

" दया जितकी बरी होण्यासारखी होती तितकी ती आता झाली आहे. आता तिला औषध वगैरेची जरूर नाही हव तर एकाद टॉनिक चालू ठेवाव."

डॉक्टराच्या बोलण्यावरून नानासाहेबाना वाटले की, डॉक्टर काही तरी लपवून ठेवीत आहेत. पण त्यानी कसेहि विचारिले तरी डॉक्टराचे उत्तर एकच, ' जितकी बरी होण्यासारखी होती तितकी ती झाली आहे.' शेवटीं नानासाहेबानी स्पष्ट विचारले—" डॉक्टर, तुमच अस मत व्हायला मदयतीबाई तर कारण नाहीत ना ? "

डॉक्टराचे उत्तरहि तितकेच स्पष्ट होते. ते म्हणाले, " नानासाहेब, मदयतीबाईनी दयेची समजूत करून दिली आहे, त्यापुढ आता कोणत्याहि डॉक्टरचा काही उपयोग होईलस वाटत नाही. मी सांगितलच की ती जितकी बरी होण्यासारखी होती तितकी ती झाली आहे. मधून मधून आवश्यक वाटल तर डॉक्टरकडून तपासून घ्यावी फारच झाल तर एकादी नर्स असू द्यावी."

" पण मदयतीबाईचा काही अनिष्ट परिणाम तर दयेवर झाला नाही, किंवा होणार नाही ना ? "

" नाही. मुळीच नाही. अगदी उलट. दया किती तरी आनदी असते.

तिला शक्य तितकं आनंदीच ठेवलं पाहिजे. आणि ते काम मदयंतीबाई चांगलं करूं शकतात असं दिसतं "

" तुम्ही हरकत घेण्यासारखं तर त्या करीत नाहीत ना काही ? "

" बिलकुल नाही. उलट इथले डॉक्टर तर सांगत होते की, त्या फार शांत अन् कष्टाळू आहेत म्हणून. दोन दिवसांचा माझाहि तसाच अनुभव आहे. रुग्णशुश्रूषा करायची त्यांना सवय दिसते मला स्वतःलाच त्या आवडल्या नाहीत ही गोष्ट निराळी. पण असं असूनहि मी जेव्हा असं म्हणतो, तेव्हा हे माझं खरं मत आहे हे नकोच सांगायला "

" परिचारिकेलाहि त्या आवडत नाहीत असं दिसतं "

" ते स्वाभाविक आहे. पण आम्ही आमच्या दृष्टीनं विचार न करता दयेच्या दृष्टीनं या गोष्टीचा विचार केला पाहिजे. आणि आम्हा सर्वांपेक्षा जर दयेला त्या आवडत आहेत, तर दयेपासून त्यांना दूर करण्याचं काही कारणच दिसत नाही "

" बरोबर आलेल्या बाईनाहि त्या आवडत नाहीत. "

" नसतील. पण मुख्य प्रश्न आहे दयेचा. ती जितकी आनंदी राहील तितकं चांगलं. त्याकरिता तिला ज्याचा ज्याचा त्रास वाटेल त्यांनाच तिच्या-पासून दूर ठेवलं पाहिजे. "

" आणि अशा रीतीनं आपला रोगी त्यांच्या हातात द्यायला तुम्हाला कसलाहि धोका वाटत नाही ? "

" अगदी नाही. दयेची प्रकृति तुम्हाला नि दमयंती बाईना– दोघानाहि चांगली माहीत आहे. वाटलं तर मधून मधून डॉक्टरांना दाखवीत राहावं "

" आणि हा तिचा कोंकणात येण्याचा हट्ट ? "

" न्या तुम्ही तिला तिथे. कुठल्याहि जागेबद्दल जर रोग्याच्या मनात तिटकारा उत्पन्न झाला असेल तर तिथे त्याला ठेवण्याचा काही उपयोग नाही. "

डॉक्टर गेले. दयेला हवे तसे वागू देण्यास व तिला ज्यात सुख होईल ते करू देण्यास डॉक्टर सांगतात, तेव्हा ते तिच्या बाबतींत निराश तर झाले नाहीत ना, अशी एक शंका नानासाहेबांच्या मनास शिवल्याविना राहिली नाही.

पण त्याच्याच बोलण्यावरून आपल्या मनावरची मदयंतीची पकड मात्र थोडी घट्ट झाल्याचे नानासाहेबास वाटले, व त्यामुळे दमयंतीचा थोडा रागहि आला. तिने मदयंतीला बरोबर आणावयासच नको होते आणले नसते म्हणजे दयेची व तिची गाठ पडली नसती मग तिच्या मनावर मदयंतीची इतकी छापहि न बसती. पण आता मदयंतीला दूर करणे म्हणजे दयेला दुखविणे अशी स्थिति प्राप्त झाली दमयंतीने आपणास मोठ्या संकटात पाडले. आता मदयंतीस कोकणात नलेच पाहिजे आणि तेच तर नानासाहेबास नको होते

स्टेशनवरून परत आल्यावर नानासाहेबानी आपली नावेची कल्पना कुठपर्यंत अमलात आली ते दमयंतीला समजावून सांगितले. या नावेच्या बाबतीत थोडा नाजुक इतिहास होता काही वर्षांपूर्वी दमयंतीने एक नौकाविहार नावाचे चित्र पाहिले होते रात्री पिठासारखे चांदणे पडले आहे. समुद्र एकाद्या तळ्यासारखा शांत आहे. वल्ही टाकून दिली आहेत शीडहि गुडाळून ठेवले आहे नाव मंदपणे डौलाने डुलत आहे एक तरुण नावाडी व त्याची बायको नावेतच विस्तव पेटवून शिजविलेले अन्न मजेने खात बसली आहेत, असे ते चित्र होते दमयंतीला ते फार आवडले होते आणि त्यामुळेच लग्न ठरल्यावर, आपण कोकणात गेलो की एक सुंदर नाव बनवावयाची व लग्नानंतरच्या पहिल्याच रात्री ती दमयंतीस विवाहोपहार म्हणून देऊन तिच्यातून नौकाविहार करावयाचा असे नानासाहेबानी ठरविले होते त्या नावेत तोपर्यंत कोणी जाऊन बसावयाचे नाही, असा त्याचा दमयंतीशी संकेतहि ठरला होता

दमयंतीने नावेची सारी माहिती समजून घेतली. तिच्यावर कसकशी व्यवस्था केली आहे, ते सारे ऐकले. पूर्वी कोकणात नानासाहेब जाण्याचे दिवशी दुपारी जेव्हा नानासाहेब तिच्याशी या गोष्टी बोलले होते, तेव्हा आदल्या रात्री मदाबाईकडे गेल्याबद्दल रागावलेल्या नानासाहेबाना आपण खुश करण्याचा प्रयत्न केला होता. पण आज नानासाहेब आपणास खुश करण्याचा प्रयत्न करीत आहेत, हे दमयंतीच्या लक्ष्यात आले. तिच्या मनात असा अधुक विचार आला की, याप्रमाणे आपणास खुश करून

नानासाहेब मदयतीला दूर करण्याची गोष्ट काढण्याच्या विचारात तर नाहीत ना ?

अशी संधि त्याना न देण्याच्या विचाराने दमयती म्हणाली, "तुम्हाला किती तरी त्रास पडला असेल नाही हे सार मनाप्रमाणे करवून घ्यायला ?"

"सार तुझ्या मनाप्रमाणे व्हायच आहे."

"माझ्या मनासारख होतच आहे की सार !"

"मग तू माझ्या मनासारखी एक गोष्ट कर ना" असे म्हणत नानासाहेब तिच्याकडे अस चमत्कारिक नजरेने पाहू लागले की दमयतीला त्याच्या दृष्टीला दृष्टी देता येईना. ती खाली पाहू लागली थोड्या वेळाने नानासाहेब म्हणाले, "पाठवून दे ना मदयतीला कुठे तरी दूर ?"

दमयतीने या प्रश्नाचे उत्तर देण्याचे टाळले. ती म्हणाली— "मला वाटल की तुमच मन तिच्याविषयीं अनुकूल झाल आहे"

"हो. पण ते आणखी अनुकूल व्हाव अशी तुझी इच्छा आहे का ?"

"होयच !"

"बर तर मला ठाऊक आहे की ती जे काय करते ते अगदी मनापासून. दुसऱ्याच मन ओढून घेण्याचा असामान्य गुण आहे तिच्यात"

"पण त्यामुळ ती तुमच्या तर आड येत नाही ना ?"

"माझा प्रश्न नाही. पण तिन तुझ्या आड येऊ नये अस मला वाटत तिन कोकणात याव अस तुला खरच वाटत का ?"

"हो. ज्याअर्थी ती दयेला इतकी आवडते त्याअर्थी तिला तिकडे न्यायला काय हरकत आहे ? आता दयेला तिकडे नेण्यापूर्वी हवीतर पुनः एकदा डॉक्टराना दाखवून घ्यावी."

"पण लवकरच पुढे काय व्हायच आहे, हे विसरलीस वाटत तू ? मग तेव्हा तरी काय करणार आहेस ? हे लोढण कायमच आपल्या गळ्यात अडकावून घेणार आहेस कीं काय ?"

"इतक्या पुढच कुणी पाहिल आहे ? मला तरी काय कराव हे सुचत नाही. नी आता साऱ्या गोष्टी इतक्या पुढे गेल्या आहेत की माग कस फिराव हेच कळेनास झाल आहे आणि खर म्हणाल तर मला त्यात काही

हरकतहि दिसत नाही. राहील बिचारी आपल्याजवळ तिचं लग्न होईपर्यंत."

नानासाहेबाना तिला काय व कसं सांगावे हे समजेना. मनातल्या मनात ते रागावले व म्हणाले— "एकान करावं अन् दुसऱ्यान निस्तरावं. खासा न्याय "

थोड्या वेळाने मग नानासाहेब दयेकडे गेले. दया खोलीत एकटीच होती. अलीकडे मदयंती जवळ नाही असे क्वचितच होत असे ते हळूच तिच्याजवळ बसून म्हणाले, "दया, तुला तुझ्या मनाप्रमाणे वागू देण्यात मी फार मोठी जबाबदारी घेतो आहे. तुला बरं वाटतं हे अगदी खरं ना ? की पुन्हा थोडे दिवस थांबून डॉक्टराकडून तपासवून घेऊ आणि मग जायचं ठरवू ?"

दया एकदम चिडक्या स्वराने म्हणाली— "नाना, तुम्ही जर डॉक्टराच्या गोष्टी काढल्या तर मला वाटतं मी पुन्हा खरीच आजारी होईन "

"अग, पण तुला बरं वाटतं आहे ना ? अगदी खरोखर बरं ?"

दया त्रासून म्हणाली— "तुम्हाला नाही का दिसत मी बरी ?"

"दमयंती म्हणत होती पुन्हा एकदा डाक्टरला थोडे दिवसानी दाखवावं "

"डॉक्टराचा तर मला अगदी वीट आला आहे, आणि जीजीचाहि पण अलीकडे कंटाळा यायला लागला आहे. उगाचच काळजी आणि कटकट करीत असते ती तिचा तो स्वभावच आहे "

"दमयंतीचा आणि काळजी करण्याचा स्वभाव ?"

"नाही तर काय ? मी बरी होते आहे हे तिला खरंच वाटत नाही मदयंतीबाई तर म्हणतात की या दिवाळीत मी चांगली चालू फिरू लागेन नाटक, सिनेमा पाहू शकेन सांगा ना नाना, तुम्हाला काय वाटतं ते. नाही का जाणार आपण सारे हे पाहायला ?"

"हो. हो." नानासाहेब म्हणाले— "पण आता कुठं दुखणं खुपणं किंवा अशक्तता नाही ना वाटत ?"

"दुखणं खुपणं मुळीच नाही अशक्ततांहि फारशी वाटत नाही आणि सर्वांत अधिक म्हणजे मला आशा आणि उत्साह किती वाटतो म्हणून सांगू "

"आणि हा सारा बदल तुझ्यात मदयंतीबाईनी घडवून आणला "

लग्नानतर नानासाहेबानी कोकणातच राहावयाचें ठरविल्यामुळे ते तेथील सारी व्यवस्था पाहाण्यात व सुधारणा करण्यात गुग असत. आज इकडे जा, उद्या तिकडे जा, एक दिवस येथे दुरुस्ती कर, दुसरे दिवशी तेथे काही तरी सुधार, असा त्याचा साग दिवस जाई. रात्री दमून भागून आल्या-वर जेवणे झाली की जमाखर्च पाहा, इतर बेत कर, यात वेळ जाई. नानासाहेबाशीं बोलायला जावे तर मदयतीचा अप्रिय विषय निघावयाचा, म्हणून दमयती एकट्यात बोलावयास जात नसे. दयेलाहि ती नकोशी झाली होती. त्यामुळे तिला अगदी ५। महिना दीड महिन्यात कटाळवाणे झाले होते.

चारी बाजूस मिठाईची ताटे भरलेली असावीत त्यापैकी खाण्यास हवे तेवढे मिळत असावें, म्हणजे माणसास त्या गोड खाण्याचा वीट येतो, आणि जिभेला झोंबणारा, हाय-हाय करावयास लावणारा एखादा तिखट, चुरचुरीत पदार्थ मिळाला की तोंड थोडे भाजल तरी तोच खावासा वाटतो दयेची थोडीफार अशीच स्थिति झाली होती. सारीच माणसे तिच्याशी गोड व तिच्या कलाने वागणारीं. कोणी तिला विरोध करीत नसे की तिला वाईट वाटेल असे बोलत नसे या परिस्थितीत कोणाची पर्वा न करणारी, मनाला वाटेल ते स्पष्टपणे बोलणारी मदयती तिला सापडली व त्यामुळे ती तिच्या कल्पनाना धक्के बसतील्से बोलली तरी तीच तिला आवडू लागली.

कोकणात आल्यापासून दया सोडून मदयती कोणाशींहि फारशी बोलत नसे. घरातली सारीच व्यवस्था जणू काय तिच्याच हातात आली होती. मालकीण म्हणून व्हावयास आलेली दमयती राहिली बाजूला आणि व्यवस्था-पिका होऊन बसली मदयती सारी कामे करण्याची तिला सवय असल्यामुळे आपल्याविना हिचे अडणार नाही हे गडी, बाई वगैरे सर्वास समजे व त्यामुळे ती तिला वचकून वागत. घरातले काम सपले की ती आपला उरला वेळ वाचन, शिवण वगैरेत घालवी, किंवा दयजवळ काही बोलण्यात, काही शिकण्यात घालवी. दमयतीशी बोलावयाचे म्हणजे काही लागेल ते माग-विण्यासाठी. नानासाहेबाशी तर सर्वासमक्ष काय बोलणे होईल तेवढेच. तिने आता दयेजवळ इग्रजी शिकावयास आरभ केला होता.

एके दिवस अशीच ती व दया एकट्याच असताना दमयंती तेथे आली. दयेच्या चेहऱ्यावर त्रासाची आढी पडली.

" जीजी, " दया म्हणाली, " तूं अशी मधेच येऊन अडथळा आणतेस. मी जेव्हा मदयंतीबाईंना शिकवीत असतें, तेव्हा मला कुणी आलेलं आवडत नाही. "

" नानांनी तुझ्यासाठी आंबरसाचे डबे मागविले होते ते आले आहेत. ते आणूं का, असं विचारायला मी नुसती आले हो. " दमयंती तिची समजूत घालण्याच्या स्वरात म्हणाली.

दयेने आपली मान नकारार्थी हलविली.

" मला हा डब्यातला आमरस आता आवडेनासा झाला आहे. मदयंती-बाई म्हणतात, हा काही ताजा नसतो आणि तो खाण्याचा काही उपयोगहि नाही. "

" हो. पण तुला तर तो भारी आवडत असे. "

" पण सांगितलं ना, की आता आवडत नाही ? माझी आवड आजकाल बदलली आहे. "

" बरं, नानांना येऊं दे का वर ? "

" थोड्या वेळान. सध्या मी शिकवते आहे. "

दमयंतीने मदयंतीकडे पाहिले. ती आपले डोकें पुस्तकात खुपसून बस-लेली दिसली. लगेच दमयंती खोलीबाहेर पडली. नानासाहेबाजवळ येऊन ती म्हणाली--

" दयेला नको आहे तो आमरस. तिला आवडेनासा झाला आहे तो आता. "

तिला वाटलें होते नानासाहेबास वाईट वाटेल म्हणून. पण तसे काही दिसले नाही. उलट ते म्हणाले— " बरंच झाल. नाही तरी डब्यातला रस फारसा हितकर नाहीच. पण तशी तर ती बरी आहे ना ? "

" हो. पुष्कळच बरी दिसते. पण मला वाटतं एकदा डॉ. महात्मे येऊन पाहून जातील तर बरं. "

" का ? तुला काही कमजास्त वाटलं का ? "

दया चिडकी झाली आहे व इतका चिडखोरपणा यायला तिची प्रकृति तर कारण नाही ना, अशी शंका दमयंतीस आली होती पण दया आपल्या-वर चिडते हें सांगणें तिला आवडलें नाही ती म्हणाली, "कमजास्त काही नाही. पण एकदा कोणींतरी तिला तपासावं असं मात्र मला वाटतं "

" तिला जर कांहीं होत नसेल तर मला नाहीं वाटत एवढ्या गावंगात डॉक्टरना बोलावणं आवश्यक असं."

दमयंती किंचित् अस्थिर झाली. कांही तरी, कुठे तरी चुकले आहे, चुकत आहे, असे तिला वाटलें. आपल्या गोड व मोकळया स्वभावानें आपण जो आनंद या घरात निर्माण करू शकत होतो तो आता होत नाही, हे तिला पूर्णपणे समजलें.

ती म्हणाली—" नाना, मंत्र्याचा कार्यक्रम आवडतो का तुम्हाला? उदास, कंटाळवाणं नाहीं होत तुम्हाला ? "

" तुला तर होत नाही ना तसं काही? तुझी बहीण तुला हवी, ती आहेच इथं."

" इतकं टोचून बोलायला नको काही."

" टोचून? का, बहीण टोचायला लागली वाटतं?"

" तिनं सारं उलथंच पालथं करावं, हें नाहीं मला आवडत."

" मग दे पाठवून तिला "

" पण ती राहू इच्छिते आणि तिची इच्छा असेल तोपर्यंत तिला कशी पाठवायची?"

" पण ती राहू का इच्छिते? कंटाळा तिला नाही येत?"

" ती नाही म्हणते. नि दयेचं अन् तिचं तर आता खूपच जमलं आहे "

नानासाहेबांचा चेहरा थोडा कठोर दिसू लागला पुढे ती म्हणाली—" तुम्हाला तिचं इथं राहणं पसंत नसतं तर मला किती तरी बरं वाटलं असतं."

" मला नापसंत का असेल? तुझी बहीण कोणालाही पसंत होण्य-सारखी आहे. आणि तुला जर तिचं इथं राहणं पसंत आहे, तर मग मला काही बोलायचंच नाही."

बोलायचे नाही, असे नानासाहेब म्हणाले तरी त्याना पुष्कळच बोलायचे आहे, फक्त ते बोलत नाहीत, आणि बोलणारही नाहीत, असे मात्र दमयतीला वाटले हा परकीपणा अलीकडे नानासाहेबात वाढत होता व या वेळेस तर तो दमयतीला फारच असह्य झाला ती अगदी त्याच्याजवळ गेली व खाद्यावर हात ठेवून म्हणाली, " नाना, थोड तरी मोकळेपणान तुम्ही नाही का माझ्याशी वागणार ? माझ्याकडून थोड तरी सुख तुम्हाला नाही का मिळणार ? "

अगदी रडकुडीला आलेला तिचा प्रेमळ व मोहक चेहरा पाहून नानासाहेबाना वाईट वाटल लाज व दुःख याचे मिश्रण त्याच्या चेहऱ्यावर दिसू लागले.

त्यानी तिचा हात धरून तिला पुढे ओढली व ते म्हणाले, " मी एक मानी पशु आहे ग मला वाटत तुला माझ्याबद्दल फारस वाटतच नाही. "

" नाना, वाटण्याचा तुम्ही काय अर्थ करता ? कस मी तुमच समाधान करू ? माझ तुमच्यावर अगदी खर खर प्रेम आहे. "

तिच्या बोलण्यात गभीरपणा, खरेपणा व प्रेम हाते यात सशयच नव्हत। पण नानासाहेब ज्या अनुरागाची अपेक्षा करीत होते, जो अनुनय त्याना आवडला असता, तो नव्हता

त्याना वाटले—– हस्तस्पर्श न झालेला, हवेचा काही परिणाम न झालेला, मीठ, साखर, मिरपूड काहीहि न मिसळलेला शुद्ध आमरस जसा त्याच्यापुढील डब्यातून बद केलेला होता तसेच हे प्रेम आहे. यावरच आपणाला सतुष्ट राहिले पाहिजे ते म्हणाले—" दमयती, तुझा आनद आताशा पार निघून गेलेला दिसतो. काय केल्यान तो मला परत मिळवून देता येईल ? "

दमयतीला तर एकाद्या परक्या माणसाप्रमाणेच हे शब्द वाटले तिने आपला हात सोडवून घेतला व खाली पाहात ती उभी राहिली नानासाहेब आमरसाचा एक डबा हातात घेऊन त्याच्याशीच चाळा करीत होते इतक्यात दार उघडून मदाती आत आली. नानासाहेब जणू काय तेथे नाहीतच असे दाखवीत ती दमयतीला म्हणाली—" दादाबाई तिकडे बोलावताहेत तुम्हाला. "

एक शब्दहि न बोलता दमयंती निघून गेली.

मदयंती पुढे झाली तिच्यात किती तरी बदल झाला होता आता. दादासाहेबांच्या घरी नानासाहेबास ती पट्टराणी म्हणून सजविलेल्या दासीसारखी वाटली होती. पण आता तिचे ऐटदार वागणे स्वभाविक झाले होते. पोषाक, चालणं, बोलणं सान्यात ती अगदी दमयंतीसारखे करू लागली होती.

नानासाहेबांच्या अगदी समोर जाऊन ती उभी राहिली आणि एकदम म्हणाली— " कटाळा नाही येत तुम्हाला या सान्याचा ? नुसते डब्यात बद करून राखून ठेवलेले पदार्थ ! " तिच्या स्वरात संताप व रूक्षपणा भरलेला होता. नानासाहेबांना ही एक नवीनच गोष्ट होती.

दमयंतीशी बोलताना नानासाहेबात जो संभ्रम दिसत होता तो एकदम नाहीसा झाला व ते म्हणाले— ' दयेसाठी आणविले होते हे डबे तिला फार आवडत असे हा रस "

" पण आता तो आवडेनासा झाला आहे ना तिला ? आणि या कृत्रिम गोष्टी दूर केल्या । बरी होऊ लागली आहे ना ती ? तुमच्या लक्षात नाही आलं वाटत हे अजून, सरदारसाहेब ? "

" मग यासाठी तुमचे आभार मानायला हवेत की काय ? "

" दयाबाईना बाहेरच थोड वार हवत होत लागायला तुमच्या सान्यात त्याची कोंडल्यासारखी स्थिति झाली होती. आजारी, आजारी म्हणून तुम्ही तिला खरीच आजारी करून टाकली होती "

" हो. पण या सान्यात तुमच स्थान कोणत ? त्या दिवशी दादासाहेबांकडे तुम्ही जे स्पष्ट भाषण केल होत, त्यावरून मला वाटल होत की, तुम्ही पूर्ण स्वार्थी आहात, आणि तुमचा स्वार्थ साधत नसेल ते काम तुम्ही करणार नाही, म्हणून. "

मदयंती खिडकीशी गेली व थोडा वेळ बाहेर पाहात उभी राहिली. मग नानासाहेबांकडे वळून ती म्हणाली, " पण तुम्हाला काय वाटत ? माझ्यात काही सुधारणा होते आहे का ? तुमच्या सभ्यपणाच्या गोष्टी

शिकून मीहि सभ्य होत चालले आहे की नाही? तुमच्या श्रीमत लोकाप्रमाण मीहि वागायला शिकत आहे ना?"

नानासाहेब हसले व म्हणाले, "या गोष्टी शिकून येत नसतात मदयंती-बाई. तेथे पाहिजे जातीचे आणि मी जर तुमच्या जागीं असतो तर अशी दुसऱ्याची नक्कल करण्याच्या भरीला पडलो नसतो."

"नक्कल नव्हे. पण अक्षर सुधारायच म्हणजे कित्ता वळवावाच लागतो ना? तसाच तुमच्या शिष्टाचाराचा कित्ता वळवत आहे मी. हवा ना मला शिकायला शिष्टाचार?"

"हो. पण हे सार तुम्ही पुढे काय करणार आहात यावर अवलंबून आहे तुम्ही अशाच तर नाही ना रहाणार जन्मभर?"

"दमयंतीच रक्त शोषीत--" तिने वाक्य पुरे केले. तिने एकदा हात झाडले. जणू काय तो विषयच फेकून दिला, व पुन्हा टेबलाजवळ येऊन म्हणाली— "करणार काय आहात या साऱ्या डब्याच? मला तर या डबाबंद वस्तूची अशी चीड येते की काही विचारू नका."

"मग टाका अडगळीच्या खोलीत नेऊन हवे तर."

मदयंती टेबलावरील डबे गोळा करून पुन्हा त्या भुसा भरलेल्या खोक्यात भरू लागली नानासाहेबाना क्षणभर वाटले, हिलाहि उचलावे व एखाद्या खोक्यात बंद करून द्यावे टाकून कुठे तरी दूर.

खोक्याचे झाकण मदयंती लावीत असताच नानासाहेबानी तिच्यापुढे प्रश्न टाकला-- "मदयंतीबाई, हे सार करण्यात तुमचा काही तरी हेतु असलाच पाहिजे. तो काय आहे, हे स्पष्टपणे सांगाल तर बर."

मदयंतीने नानासाहेबाकडे तोंड केले. डोक्यातली गुलाबाची ताजी, उमलावयास आलेली कळी हातात घेतली, तिच्या पाकळ्या फुलवीत नाकाशी नेली व एकदा हृदयापर्यंत जोराने हुंगून समाधानाचा सुस्कारा सोडला. मग ती म्हणाली— "तुम्हीच नाही का मला म्हणाला मी स्वार्थी आहे म्हणून? मी ही गोष्ट तुमच्यापासून लपवून ठेवली नाही."

"पण नुसत्या सामान्य स्वार्थापेक्षा काहीतरी विशिष्ट स्वार्थ असला पाहिजे

तुमच्यापुढ. नाही तर तुमच्यासारखी सुदर तरुण स्त्री आपले आयुष्याचे दिवस इथ फुकट घालवायला तयार नसती झाली."

"नाही. फुकट नाहीच"

"मग मला सांगितलेला बरा तो विशिष्ट स्वार्थ. तुम्ही न सांगितला तरी मला तो कळेलच. नाही का?"

"हो तुम्हाला कळलाच पाहिजे." मदयती चेष्टेच्या स्वराने म्हणाली. 'तुम्ही अडाणी का आहात? नाही ना?"

नानासाहेबाच्या स्वरात कंप उत्पन्न झाला ते म्हणाले, "मदयतीबाई, तुम्ही अगदीच असंस्कृत आहात" 'राजाणी,' हा शब्द त्याच्या तोंडावर आला असावा पण तो त्यानी दाबला

"तुम्ही संस्कृति की काय म्हणता तिच्यात मी वाढलेच नाही. माझ आयुष्य म्हणजे जीव जाईतो काम, चार घास खाण्यापुरती व झोपेपुरती विश्राति आणि वेळी अवेळी कानावर सारख पडणार एका म्हातारीच तिच्यावर झालेल्या अन्यायाच पुराण. यात तुमच्या संस्कृतीला जागाच कुठ होती?"

"पण तुमचा तर त्या अन्यायाशी काही संबंध नव्हता. तुम्ही स्वत-बद्दल निराळा असा कधी विचारच केला नाही की करीत नाही का?"

"करते पण ते विचार तुम्हाला ऐकवणारहि नाहीत."

"का? त्यात सुखदायक असा एकहि विचार नाही का?"

"सुखदायक? मला तर आठवत नाही"

"बर, पण ईश्वरावर निष्ठा, नीतिनियमावर श्रद्धा, याविषयी विचार कधी तुम्हाला शिवलेहि नाहीत?"

"माझी श्रद्धा, माझा विश्वास, माझी भक्ति, माझी नीति सारी एकच. आणि ती म्हणजे, माझ्याशी लोक जसे वागले तसच त्याच्याशी वागण ही."

"ही निर्दय नीति झाली. पण कर्तव्य, कृतज्ञता, प्रामाणिकपणा याबद्दलहि कधी तुम्हाला काही वाटल नाही?"

मदयतीने हातातले फूल कुस्करून फेकून दिले व ती म्हणाली— 'या सार्‍या गोष्टी श्रीमंतासाठी आहेत, सरदारसाहेब."

" पण लोकानी तुमच्यावर केलेले उपकार तर तुम्ही आठवाल ? निदान दमयंतीचे तरी ? "

" ते का बरं ? "

" का, असं विचारता ? ती तुमच्याशी कशी वागली याचा विचार करा, कशी वागते ते पाहा, आणि थोडातरी तिच्याजवळून धडा घ्या. "

मदयंती हसली व बेपर्वाईने म्हणाली, " मन्दारसाहेब, इतक्यातच तुम्ही मला सांगितलंत ना की, कोणाची नक्कल करू नये ? दमयंतीबाई त्या दमयंतीबाई आणि मी ती मी. जशा त्या स्वतःला बदलू शकत नाहीत तशीच मी. त्यांच्या सद्गुणाचा धाक तुम्ही मला दाखवू नका. "

" तरी पण, " अस्वस्थ चित्ताने नानासाहेब म्हणाले.— " तुम्ही दमयंतीशी तरी प्रामाणिक राहाव असं मला वाटतं. "

" मी ज्याच्याशी कृतज्ञ, प्रामाणिक राहू शकते असा एकच मनुष्य आहे. "

" आणि तो ? "

" ज्याच्यावर माझं प्रेम बसलं आहे तो "

" अच्छा ! " नानासाहेब हसत म्हणाले, " म्हणजे तुमचं कोणावर तरी प्रेम आहे म्हणायचं एवढ्या विचारापुरता तरी वेळ मिळाला म्हणायचा तुम्हाला ? "

" हो. स्वप्नासारखी काही चित्रं येतात कधी कधी डोळ्यासमोर पण प्रेम म्हणजे काय असतं याचा खरा अनुभव मात्र मला अजून नाही. "

नानासाहेबांना मौज वाटली. त्यांचे तीक्ष्ण, घारे डोळे अस्वस्थ उत्सुकतेने चमकू लागले. ते म्हणाले, " तुमची प्रेमाची कल्पना तरी काय आहे, मदयंतीबाई ? "

त्यांच्या उपरोधिक भाषणाकडे तितकाच तिरस्कार दर्शवीत ती म्हणाली, " तुम्हाला नाही त्याची कल्पना येत ? प्रेमासाठी मी हवं ते करीन, हवं ते सोशीन, हवा त्याचा त्याग करीन. कशाची, अगदी कशाची परवा करणार नाही. कशाचाही विचार करणार नाही. "

" अगदी कशाचा ? सामान्य पुरुष, सामान्य बायका ज्या गोष्टीचा सामान्यपणे विचार करतात, त्याचाहि ? "

" विचार ? " मदयंती म्हणाली, " विचार करीत बसत ते प्रेमच नव्हे, अस मला वाटत. लोक विचार करीत का बसतात ? कारण, त्याच प्रेम खर नसत म्हणून. खर प्रेम करण फारच थोड्याना माहीत असत. कारण, खर प्रेम म्हणजे फार भयकर आहे, सरदारसाहेब "

एवढे बोलून तिने नानासाहेबाकडे पाठ केली व तो भरलेला खोका उचलावयास गेली. दमयंतीशी नजरबागेत झालेले आपले भाषण नानासाहेबास आठवले, त्याचाच असस्कृत प्रतिध्वनि मदयंतीच्या तोडून ऐकावयास मिळाला, असे वाटल्याविना त्याना राहिले नाही.

इकडे मदयंती म्हणाली— " जरा इकडे या. थोडा हात लावा ना हा खोका उचलायला, म्हणजे बाजूला तरी ठेवता येईल. "

नानासाहेब पुढे झाले व त्यानी वाकून खोक्याखाली हात घातला. मदयंतीने आपले हात खाली घालून खोका आधीच वर केला होता. त्यान्या हाताचा परस्पर–स्पर्श झाला. नुसता हस्तस्पर्श व तोहि कामासाठी. पण नानासाहेबाना चमत्कारिक वाटले. मदयंतीचे हात कापत आहेत असे त्याना वाटले. त्याचा स्वतःचाहि हात कप पावतच होता. मदयंतीने त्याचा हात घट्ट धरला व दोघानी उचलून खोका पलीकडे नेऊन ठेविला

खोका ठेवून झाल्यावर नानासाहेब म्हणाले— " तुमच खर स्वरूप अजून दमयंतीला माहीत नाहीस दिसत. "

" मग सागा ना तिला. " मदयंती बेपर्वाईने म्हणाली—" तुम्ही दमयंतीला काही सागितल तरी तिच्यात बदल होणार नाही. ती माझा द्वेष करणार नाही. तिला येतच नाही करायला द्वेष –" एवढे बोलून ती जाऊ लागली व जाता जाता म्हणाली— " आणि तसच प्रेमहि. "

एवढे बोलून ती बाहेर पडली व तिने धाडदिशी दार लावून घेतले.

---

# ९

दिवसामागून दिवस चालले होते.

दमयंतीला कोकणची ही पावसाळी हवा अगदी नवी होती. आता-पर्यंत ती कोकणात आली होती उन्हाळ्यात. आंबे, फणस खावे, खूप हिंडावे, नावेतून फिरावे, पोहावे, मौज करावी, असे तिचे दिवस इकडे जात. पण आता सारीच स्थिति पालटलेली. ती राहाण्यास तयार झाली होती दयेची काळजी घेण्यासाठी. पण ते काम तिला उरलेच नव्हते. ते काम गेले होते मदयंतीकडे

दयेबद्दल तिला काळजी वाटे. औषधाशिवाय तिने राहावे हे तिला बरे वाटेना. वर दिसायला विशेष काही दयेला होत नव्हते. उलट ती आनंदीच दिसे. पण दमयंतीला वाटे, यात काही तरी चुकते आहे. पुन्हा तिच्या मनात येई— मदयंतीचा एवढा वरचष्मा झालेला पाहून असूयेने तर आपणास असे वाटत नाही ना? नानासाहेबास म्हणावे तर तेहि उघड उघड दयेची प्रकृति चांगली दिसत असता डॉक्टरला बोलावण्याचे मनावर घेत ना. इकडे दया रोज रोज पुढचे विचार व नवे नवे बेत करी. दिवाळींत असे करायचे, दोन चार महिने मुंबईत मौज करायची असे ती रोज म्हणत असे.

थोड्याच दिवसापूर्वीची गोष्ट दमयंतीला आठवली.

दया असेच बेत करीत असता दमयंती सहज म्हणाली, " दया, अजून तू इथल्या इथे सुद्धा चांगली चालू फिरू लागली नाहीस, आणि इतक्यात कसले एवढे पुढचे बेत करतेस? उगाच मनोराज्य करू नयेत माणसान. त्या योगान, पुढं तीं पुरी झाली नाहीत तर वाईट वाटत. "

" का ग जीजी, तुला तर माझ्या मनोराज्यात भाग घ्यायला आनद वाटला पाहिजे. मदयतीबाई मला किती तरी आग्रा दाखवितात आणि तू आपली जेव्हा तेव्हा माझा हिरमोड करतेस माझे पुटचे बेत ऐकून तुला तर बर वाटायला पाहिजे तुला नाही आनद होणार दिवाळीनतर नाना, मी नि मदयतीबाई मुबईला जाऊन राहिलो अन् मजा मजा केली तर ? "

" अग हो, तू जर खरीच चागली झालीस तर का नाही होणार आनद ? "

" पण नानाना फुरसत कशी होणार एवढी ? तुमच तर लवकर लग्न करायच ठरल आहे ना ?" दया म्हणाली. हे लग्न म्हणजे जणू काय तिला सकटच वाटत होते असा भाव तिच्या चेहऱ्यावर दमयतीला दिसला.

" कदाचित् आमच लग्न आता होणारहि नाही. " दमयती म्हणाली होती.

आणि तिला खरोखरच अलीकडे असे वाटू लागले होते. नानासाहेबाची परकेपणाची वागणूक तिला बोचत होतीच. त्यातच दयेलाहि जर असे वाटावयास लागले असले तर ? तर काय ? आपणच आपला पाय येथून हळूहळू काढता घेतला पाहिजे, असाहि विचार अलीकडे तिच्या मनात डोकावू लागला होता. पण नानासाहेब आपण नसताना मदयतीला ठेवून घेणार नाहीत आणि दया मदयतीला सोडायला तयार होणार नाही, अशा काही चमत्कारिक परिस्थितीत ती सापडली होती.

बाहेर पाऊस असला तरी आज थोडा होता. गेले आठ दिवस अगदी मुसळधार पाऊस पडल्याने बरीचशी साचलेली कामे करावयास नानासाहेब बाहेर गेले होते. अशा वेळी एक भेणकापडी छत्री घेऊन दमयती बाहेर पडली, व आमराईपलीकडे लाकडी चिरकाम चालले होते तिकडे वळली. हेतू हा की, नानासाहेब भेटले तर त्याच्याशी थोडे बोलावे.

हा तिचा हेतु पुरा झाला नानासाहेब समोरूनच येत होते. ते येताच ती म्हणाली, " दयेच सार अगदी ठीक चालल आहे, अस वाटत ना तुम्हाला ? "

" का ? "

" आजकाल जे काय चालल आहे ते बर नाही अस मला वाटत.

तिची प्रकृति बरेच दिवसात कुणी पाहिली नाही. एकादी परिचारिका, तीहि नाही. आतापर्यंत जे उपचार झाले त्याहून अगदीच निराळ असं हे सारं चाललं आहे."

"पण परिणाम तर चांगला होतो आहे ना? मला वाटत दया पुष्कळच बरी आहे."

"हे वाटण झाल. वाटण आणि असण यात फार अंतर आहे. ती खरी सुधारते आहे की नाही हे एक डॉक्टरच सांगू शकतात."

वारा व पाऊस जोराने सुरू झाला. नानासाहेब म्हणाले, "आपण चालू लागू. इथं भिजायला होईल."

दमयंती त्यांच्याबरोबर चालू लागली. आज कितीतरी दिवसांनी हा योग आला होता. चालता चालता ती म्हणाली, "मला वाटत दयेत दिसणारी सुधारणा दिखाऊ आहे. तिच्यात शक्ति काही आलेली दिसत नाही."

"तू तर नेहमीची आशावादी. तुझ्या मनात हे असले विचार केव्हा-पासून येऊ लागले?"

"हा मनाचा प्रश्न आहे. मला वाटतं की कोणातरी डॉक्टरला दयेला दाखवावी आणि निदान एक परिचारिका तरी इथे आणून ठेवावी. सध्या तिच्या चालतात नुसत्या गोष्टी नि मनोराज्यें."

बोलता बोलता ते बाड्याच्या गडग्याशी आले होते. तेथेच एका मोठ्या झाडाखाली एक लाकडाची फळी टाकून केलेले बाक होते त्यावर ते बसले, आणि म्हणाले, "पण त्याचाच तिच्या मनाला आधार वाटतो ना?"

"म्हणून इतकं अगदी दुसऱ्या टोकाला जाऊन कसं चालेल? एका वेळीं डॉक्टराशिवाय पानहि हालत नव्हतं, आणि आता अगदी डॉक्टरच वारंहि नाही."

"डॉक्टरांनी तरी तिला काय विशेष बरं केलं?"

"ते मला माहीत नाही. पण अगदी असं करण मला बरं वाटत नाही हे खर. आणि नाना, दयेच्या मागण्यावरून असं दिसत की तुम्हीहि तिच्या

मुंबईला जाण्याच्या आशा वाढविता. मृगजळासारख्या अशा आशा वाढविणं चांगलं का बरं?"

"मृगजळासारख्या?" नानासाहेब अस्वस्थ चित्ताने म्हणाले.

"नाही तर काय? डॉ. महात्मे यांच्या बोलण्यावरून तुम्हाला काय वाटलं? तुम्हीच नाही का मला सांगितलं की, त्यांच्या बोलण्यात निराशा दिसत होती म्हणून? आणि तुम्हीच ते विसरलां?"

काही तरी कल्पना मनात आल्यासारखे करून नानासाहेब म्हणाले, "पण मग मदयंतीबाईंना इथून दूर का पाठवून देत नाहीस तू?"

जे नाव घेण्याचे ती इतका वेळ टाळीत होती, ते ऐकल्याबरोबर दमयंतीचे अंग शहारले. ती म्हणाली, "तिनं इथून जावं असं अगदी मनापासून तुम्हाला वाटतं का?"

"हो. तिनं इथून गेलंच पाहिजे असं माझं अगदी ठाम मत झालं आहे."

"पण तुम्हाला माहीत आहे ना की, मी तिला तसं सांगू शकत नाही. इथं असं कोंडलेलं राहाणं आपल्यापैकी कुणालाच बरं नाही मी तिला अप्रत्यक्षपणे पुष्कळ विचारून पाहिलं. पण तिचं उत्तर एक, मला इथं राहायला आवडतं म्हणून."

"पण तू थोडा अधिकार चालवून तिला पाठवून का देत नाहीस?"

"कारण, तसा माझा अधिकार नाही. दयेचा विचारहि आहेच. आणि शिवाय बाबांनी तिच्याकडे जे दुर्लक्ष केलं त्याची थोडी तरी भरपाई करण्या साठीहि मला तसं करता येत नाही."

नानासाहेब थोडे त्रासून म्हणाले,—— "म्हणजे मग तुलाच तिला दूर करायला नको आहे. माझा अधिकार असता तर मी मुळी तिला तुझ्याजवळ राहूंच दिलं नसतं."

"पण आपण इथं येऊ, चौघच राहू, दया तिची इतकी भक्त होईल असं कुणाला तेव्हा स्वप्नात तरी वाटलं होतं का?"

"तिच्यामुळं दयेच्या प्रकृतीवर तर वाईट परिणाम झाला नाही ना?" पुनः पुन्हा खोदखोदून विचारून नानासाहेब जणू मदयंतीला घालविण्याला थोडी तरी सबब मिळते का, हे पाहात होते.

" नाही." दमयंती म्हणाली, " तस मला मुळीच वाटत नाही दुये-' साठी नव्हे-- पण-पण--"

" पण काय ? गोंधळलीस का ? सांग ना काय ते."

" नाना, तुम्ही सुद्धा नाही का-?" दमयंती अडखळत म्हणाली थोड्या वेळाने तिने सरळ प्रश्न केला-- " तिने इथून गेलंच पाहिजे, असं तुम्हाला का वाटतं, सांगाल का ?"

नानासाहेबांनी उत्तर दिले नाही. आपला डाव हुकला आणि आपण हरलो असे दमयंतीला वाटले. ती आता दुसरा पत्ता खेळली— " आणि तुम्हीच इथून गेला तर ? इथलं काम पाहायला दुसऱ्या कुणाला ठेवा नि तुम्हीच इथून थोडे दिवस जा ना ? तुम्ही तरी किती दिवस आपल्याला कोंडून घेणार ? इथं एवढं काय आता काम आहे ?"

"काही नाही." नानासाहेब थंडपणे म्हणाले. पण त्यांच्या स्वरावरून ते तिचे म्हणणे मान्य करीत होते, की उलट प्रश्न विचारीत होते, हे दमयंतीला कळेना.

ते उठले आणि म्हणाले, " बरं. मी थोडं काम पाहून येतो. पाऊसहि आता थांबला आहे. हो, पण बरी आठवण झाली ती नाव जवळजवळ पुरी झाली आहे. येतेस का पाहायला ?"

दमयंतीने मानेनेच नकार दर्शविला. आपणच ही आठवण त्यांना करून दिली. एरवी ते विसरलेच होतेसे दिसले. पण काही असले तरी आज ती नाव आपण पाहू नये असे दमयंतीला वाटले.

" मग नाही येत तू ?"

" नको. आज नको, या वादळी हवेत. तिचं पहिलं दर्शन घ्यायचं ते अशावेळी नको. दुसरा एखादा चांगला दिवस ठरवू."

तिचे ओठ विरल झाले व तिने अर्थपूर्ण, प्रेमभरित आणि याचनापर अशा कटाक्षाने नानासाहेबांकडे पाहिले. पण तिला त्यांच्या डोळ्यात जें काय दिसावयास पाहिजे होते ते दिसले नाही. तिला वाटले, आपण पुरे पुरे हरलो.

फाटक उघडून ती मागल्याच बाजूने आत शिरली. तितक्यात तिला त्या बाजूच्या खिडकींत कोणी असावेसे वाटले. तिने वर पाहिले तो मदयंती

खिडकी बंद करीत होती. खरें म्हणजे मंदयंतीची खोली या बाजूस नव्हती. इकडे अडगळीचें सामान ठेवलेलें असे व क्वचितच कोणी या बाजूस फिरकत असे.

दमयंतीचे मन म्हणजे अगदीं निष्पाप. संशयाचे ढग त्यात कधी येत नसत. पण यावेळीं एक क्षणभरच का होईना, तिला अशी शंका आली की मंदयंती वरून चोरून पाहात असावी. तिच्या दृष्टीत आतां तिच्या आईचा खुनशीपणा तर दिसला नाही? दमयंतीने पुन्हा वर तोंड करून पाहिले नाही. ती बाजूनेच पुढील दारी आली व सज्जाखाली मांडलेल्या बाकावर बसली.

या चक्रव्यूहाचा भेद कसा करावा, हा प्रश्न तिच्या मनापुढें सारखा नाचत होता. नुसता आपलाच जीव वाचवावयाचा इतका स्वार्थी माणूस असेल तर असे प्रश्न सोडविणे सोपे असते. पण जेव्हा दुसरे लोक त्यात गुरफटलेले असतात, आणि स्वसंरक्षण कीं स्वकर्तव्य याची झोंबी सुरू होते, आणि आपल्या नैतिक, धार्मिक कल्पनांनी सदसद्विवेक बुद्धि बद्ध असते, तेव्हा असले प्रश्न सोडविण्याचे काम फारच बिकट होते.

दमयंती हवा तो स्वार्थत्याग करावयास तयार होती. पण कशाचा त्याग केल्याने आपण इतरास अधिकांत अधिक सुख देऊ शकूं, याचा निर्णय तिच्या मनाशी होत नव्हता. तिच्या सभोंवतीं सारींच माणसे चांगलीं होतीं, तेव्हा तिने हवा तो त्याग त्यांच्यासाठी केला होता. आजहि तशीच परिस्थिती असती तर केवढाही मोठा त्याग करण्याला तिने कांकू केली नसती. पण आपल्या सभोंवती वावरणाऱ्या एका व्यक्तींत तरी दुष्टपणा वावरत आहे, अशी शंका तिला येऊं लागल्याने तिची सदसद्विवेकबुध्दी 'असेंच कर' अशी तिला आज्ञा करण्यास चाचरत होती.

एकादी व्यक्ति दुःखात आहे. तिच्यावर अन्याय होत आहे, तर त्यासाठी काही करणे निराळे. पण एकादी व्यक्ति चांगली नाही, सरळ नाही, अशी शंकाहि आली, तरी त्यासाठी त्याग करणें निराळे. आणि याचमुळे दमयंतीची मति कुंठित होई.

नानासाहेबांस सांगितल्याप्रमाणे तिला खरेच वाटे की, वाटणे वेगळे व असणे वेगळे. मदयंती वाईट असेल असे तिला वाटे. पण तिच्या वाईट-पणाचा पुरावा तिच्याजवळ काहीच नव्हता, आणि एकादी कल्पना किंवा शंका पुरी खात्री झाल्याशिवाय दृढ न करण्याचा तिचा स्वभावधर्म— याची तिला जाणीव मात्र नव्हती — असल्याने निश्चित पुरावा मिळाल्याशिवाय मदयंतीविषयी कुकल्पना करणे योग्य नव्हे असे तिला वाटले. आज आपल्या मनात अशा शंका आल्या यात आपलीच काही चूक असली पाहिजे अशी तिची भावना झाली

झाले. मन दुसऱ्या बाजून विचार करू लागले. छे ! मदयंती वाईट नाहीच. तिने वाईट का असावे ? आपण तिचे काहीच वाईट केले नाही. तिला काही गोष्टी समजत नाहीत विशेषतः वागावे कसे हे कळत नाही. शिष्टाचाराच्या काही बाबी तिच्या ध्यानात येत नाहीत एवढेच. तिच्या-बद्दल वाईट कल्पना मी का करावी ? करूच नये.

हा निश्चय झाल्याने दमयंतीला थोडे समाधान वाटले. भविष्यकालची आशापूर्ण चित्रे तिच्या डोळ्यापुढे दिसू लागली. प्राप्त परिस्थितीतहि ती चित्रे पुसला जाण्यासारखे काही झालेले नाही. थोड्याच दिवसांनी आपले नाना-साहेबांशी लग्न होईल दोघांचेहि गैरसमज दूर होतील. हे ढग गेले की, एकाद्या लख्ख दिवशी नानासाहेब ती नाव आपणास दाखवितील नुसती आपण दर्शविलेली इच्छा, पण ती पुरी करण्यासाठी त्यांनी किती श्रम घेतले आहेत व घेताहेत ! ते म्हणाले नव्हते का, 'दमयंती, त्या नावेत पहिले पाऊल तुझेच पडेल' म्हणून ? ती नाव जेथे नांगरून ठेवावयाची त्या धक्क्या-जवळच एक लहानशी बंगली बांधून घेण्याचेहि ते नव्हते का म्हणत ? नौका-विहारानंतर त्याच बंगलीत आपला प्रथम गृहप्रवेश व्हावयाचा आहे ना ? 'मन चिंती ते वैरी न चिंती' या न्यायाने आपल्या मनात उगाच वेड्यावाकड्या कल्पना येतात झाले ! भिण्यासारखे काही झाले नाही.

भीतीची कल्पना येताच तिची दृष्टि सहजच सभोवार फिरली. आणि पाहते तो अगदी जवळचेच दार उघडून मदयंती समोर येऊन उभी राहिली.

" नानासाहेब तुम्हाला काय दाखवीत होते? एखाद दिवशी मला दाखवायला सांगा ना त्यांना? दयाबाईजवळ बसून बसून मलाहि कंटाळा येतो कधी कधी त्या सांगत होत्या, नानासाहेबांनी तुमच्यासाठी काय काय केलं आहे म्हणून. आहात खऱ्या भाग्यवान तुम्ही दमयंतीबाई! अहो उपभोग नाही तर नाही, पण नुसता पाहण्याचा आनंद तर आम्हाला घेता येईल ना? मग सांगा ना एकदा नानासाहेबांना मला ते सारं दाखवायला सांगाल ना?" मदयंतीने मारा सुरू ठेविला.

दमयंतीने तिचा हात धरला व 'हो हो, न सांगायला काय झालं? सांगेन हो तुला दाखवायला मी त्यांना' असे म्हणून दोघीहि हातात हात घालून घरात गेल्या.

---

# १०

पुढची काही दिवस असेच गेले.

नानासाहेबांनी काही सामान आणण्यासाठी मुंबईस लवकरच जावयाचे जाहीर केले. दमयंतीला बरें वाटलें.

मदयंतीची इच्छा पुरी करण्याला तिने नानासाहेबांस सांगितलेच होतें. " दाखवा ना बिचारीला एकदा सारं केलेलं. पाहील तरी डोळे भरून. " हे दमयंतीचे म्हणणे ऐकून नानासाहेबांना तिच्या चांगुलपणाबद्दल आश्चर्य व भोळेपणाबद्दल कीवहि वाटली. पण त्यांना उघडपणे नाही म्हणता येईना. शेवटीं त्यांचा जाण्याचा दिवस अगदी जवळ आला तेव्हा एक दिवशी दयाहि म्हणाली— " नाना, बिचाऱ्या मदयंतीबाई माझ्याजवळ बसून बसून कंटाळतात हो. उद्या चहानंतर दुपारीं जीजी राहील माझ्याजवळ अन् तुम्ही मदयंतीला घेऊन, काय काय सुधारणा केल्या आहेत त्या दाखवा त्यांना. परवा मग तुम्ही जाणार आहात ना?"

आता नानासाहेबाचा उपायच राहिला नाही.

त्या दिवशी पाऊस पुन्हा अगदी खूप पडला होता नानासाहेबाना वाटले, या चिखलात व ओल्यात जाण्यास मदयती तयार होणार नाही. पण काय, पाच वाजता पाहातात तो दमयतीने आणवून दिलेला रेनकोट, छत्री, बूट इत्यादींनी सुसज्जित अशी मदयती समोरच हजर.

" दाखवणार आहात ना मला सार आज ? "

" आज ? या चिखलात ? आणि आहे काय अस पाहाण्यासारख य कोकणात ? तुम्हाला पाहण्यासारख खरोखरच काही नाही. "

" आपण दाखवाव, मी पाहाव, अशी इच्छा आहे, प्रार्थना आहे. मान्य करण आपल्य हातात आहे. मला दाखविण्यासारख नसेल तर नका दाखवू. "

इतक्या ताठरपणे वागणारी मदयती इतकी मऊ आलेली पाहून नानासाहेबाना आश्चर्य वाटले. ते म्हणाले, ' दाखवू नये असहि काही नाही. चला बापड्या. "

दोघेहि निघाली. मदयतीने केलेल्या थाटमाटाचा कोकणात काही उपयोगच नव्हता. ती मुबईची नुमती डोक्याला जेमतेम पुरेल एवढी छत्री वाऱ्यापुढे भिटाची लागली बूट खराब झाला. पावसाळी कोटामुळे आगावरचे वस्त्र तेवढे काय ते कोरडे राहिले. पाऊस कमी होत होता. दोघेहि बराच वेळ जपून जपून न बोलताच चालली होती. ' घसरला पाय तर– ' ही भीति वाटत असावी.

" मी उद्या मुबईला जाणार आहे. " नानासाहेब कटाळून हळूच म्हणाले.

" मग मला काय करायच त्याच्याशी ? " मदयती म्हणाली. खरेच, तिला काय करावयाचे होते, व नानासाहेबास तरी काय करावयाचे होते ! नानासाहेबाच्या मनात कल्पना आली की, जीवन ही एक युद्धपरपरा आहे. लढावयाचा कटाळा आला म्हणजेच काय शातता मिळेल तेवढीच.

ते नावेची बाजू टाळून निघाले.

" तुम्हाला इथ कटाळवाण नाही का वाटत ? " नानासाहेबानीच

पुन्हा बोलणे सुरू केले. ' दादासाहेबांच्या घरी जे बोलणं झालं त्यावरून मला असं वाटलं होतं की, जीवनाचा उपभोग घेण्यासाठी तुम्ही अधीर आहात आणि आमचं हे कोकण म्हणजे पावसाळ्यात अगदीच कंटाळवाणं. ”

“ कंटाळ्याचा प्रश्न जागेवर नसतो सरदारसाहेब. तो अवलंबून असतो माणसावर ”

“ मग तुम्हाला कोणत्या माणसामुळे कंटाळा येत नाही ? दयेमुळे की दमयंतीमुळे ? ”

“ दयाबाईबद्दल मला काय वाटतं हे तुम्हाला माहीतच आहे. ’

“ हो. पण माझी अपेक्षा मात्र नव्हती. मला जर हे आधी कळतं, तर मी तिच्यात तुम्हाला गुरफटूं दिलं नसतं. ”

“ का ? माझ्यामुळं तिचा काही तोटा तर झाला नाही ना ? माझा परिणाम तिच्यावर हितकरच होतो आहे ना ? ”

“ हो. तसं दिसतं खरं पण दयेचं मन म्हणजे अजून लहान मुलासारखं आहे. इतका ताण त्याला सहन होईल की नाही, कोण जाणे ? ”

“ मग तुमची इच्छा असली तर मी तिच्यापासून दूर राहीन

“ आता ती वेळ गेली. दयेच्या मनावर आज कुणाचा ताबा असेल तर तो तुमचाच, आणि हेच मी होऊं दिलं याबद्दल मला वाईट वाटतं. ”

“ पण मग तुम्हीं तसं होऊंच का दिलं ? ” मदयंतीने विचारले. खरेच, नानासाहेबांनी असे होऊ का दिले ? आपल्या घरात एवढा ताबा तिला घेऊंच का दिला !

माणसाचे मन म्हणजे एक चमत्कारिक जाळे आहे. त्यात हेतूंची इतकी गुंतागुंत झालेली असते की विचारू नये. कदाचित् दमयंतीच्या आलेल्या रागामुळे ‘ करीना का काय हवं असेल ते ? आपल्याला काय करायचं आहे ?’ असे वाटले असेल. कदाचित् ही अशिक्षित सुंदर तरुणी एकदम श्रीमंतीत पडली असता कशी वागते, हे पाहावेसे वाटले असेल. नानासाहेबांसारख्या सभ्य, सुशिक्षित व संपन्न समाजात सरावलेल्या माणसास हे नवें पात्र पाहाताच जिज्ञासा व कुतूहलहि वाटले असेल. काही असो. त्यांनी आरंभीं हरकत घेतली नाही व मग मात्र विद्युद्वेगाने साऱ्या गोष्टी घडल्या. दयेला मदयंती-

बद्दल वाटलेले कुतूहल पुढे आकर्षण व मग आवश्यकता. आणि शेवटी पूर्वीचा बेत बदलल्यामुळे येथे येऊन चौघाचेहि कोंडल्यामारखे राहणे.

नानासाहेबास यामुळे तिच्या प्रश्नाचे सरळ उत्तर देता आले नाही तरी पण बरेचसे खरे असलेले उत्तर त्याच्या तोंडून बाहेर पडले. ते म्हणाले— " तो दमयंतीचा प्रश्न होता. माझा नव्हता. "

" पण दमयंतीबाईंनी तर आपला सारा कारभार तुमच्याच हातात सोपवला होता ना ? "

' हो, बरबर तस होत खर. पण दमयंतीन या बाबतींत माझ ऐकल नाही. ती माझ्या मताविरुद्ध वागली. "

" कोणत्या ? मला बरोबर राहू देण्याच्या ? "

" होय. "

" पण माझा विचार केला, तर तुमच तस करण निर्दयपणाच नव्हत का ? "

" मदयंतीबाई हा व्यवहार आहे. मी दमयंतीचा कारभारी होतो. तुमचा नव्हे. "

" मग अजूनहि मी जाव अस तुम्हाला वाटत का ? "

" नाही म्हणून मी सांगितलच. दयेमुळ. "

बराच वेळ हिंडून नानासाहेबानी तिला जे काय दाखवायचे होतें ते सारे दाखविले. पूर्वी येथे काय होते, आपण डोंगर कसा फोडून काढविला, पाणी कसे खेळविले, विहिरी कशा खणविल्या, कलमे, इतर फुल-झाडे व फळझाडे कशी लाविलीं हे सारे नानासाहेब मोठ्या ऐटीच्या स्वरात सांगत होते. कर्त्या माणसाचा स्वाभिमान त्याच्या शब्दाशब्दातून बाहेर पडत होता. मदयंती सारे पाहून थक्क झाली होती. संध्याकाळहि होत आली होती. पाऊस अगदी थाबला होता पश्चिमेस सूर्य क्षितिजाजवळ जाऊन पोचला होता. वर एक मोठे इंद्रधनुष्य पडलें होते. त्याचे रंग आकाशात दूरवर पसरले होते.

" आणखी काही पाहाण्यासारख ? " मदयंतीने विचारले.

" आता एकच गोष्ट, आणि ती म्हणजे नाव. " ती दोघेहि नौका गृहाकडे वळली.

एक मोठे शाकारलेले घर. खाडीचा नदीला मिळणारा भाग आत आलेला व त्यात पेढ्याच्या छपराने झाकलेली एक सुंदर नाव बसावयाच्या जागेवर बारीक लाकडी रंगीत खांब व वर कौलाच्या आकाराच्या लाकडी तुकड्याचेच छत. खाली बसावयास दोन्हीकडे बाकामारख्या फळ्या घातलेल्या व मध्ये दोन खुर्चीमारख्या बैठकी धक्क्यावरून नावेत उतरण्यासाठी खांबले पुरून बांधलेला लहानसा पूल व त्यावरून लोंबती शिडी. नांगर, वल्ही, शिडाचा खांब सारे अगदी व्यवस्थित

" पाहू का मी खाली उतरून ? " नानासाहेबांच्या अपेक्षेप्रमाणे मदयंतीकडून आलाच प्रश्न.

' नाही ' कसे म्हणावे हे नानासाहेबांना कळेना.

' अजून काम सारे पुरे झाले नाही कामकरी नाही का उतरत काम करायला खाली ? ' अशी आपल्या मनाची समजूत करून ते हो किंवा नाही काहीच म्हणाले नाहीत. ' मौन समतिलक्षण ' असें समजून मदयंती पुलावर गेली. शिडीवर एक एक पाऊल हळू हळू टाकीत ती उतरत होती. जणू काय प्रत्येक पावलागणिक एका नवीन आनंदाचा ती उपभोग घेत होती. ती खाली उतरून नावेत उभी राहून म्हणाली—" सरदारसाहेब, हे सारं पाहून मला काय वाटत आहे, ते खरोखर सांगता येत नाही. मी तर चित्रात सुद्धा अशी सुंदर नाव कधी पाहिली नव्हती. मला सांगाना या सान्या व्यवस्था समजावून. "

आनंदाने उद्दीपित झालेल्या मदयंतीला पाहून नानासाहेबहि थोडे उद्दीपित झाले. अशिक्षित व अडाणी माणसाला साध्या गोष्टी पाहूनहि जे आश्चर्य वाटते त्याबद्दल त्या माणसाची नानासाहेबास कीव वाटे, व थोडा रागहि पण येई. परंतु आज या सुंदर, अशिक्षित व जिज्ञासु तरुणीची आपणाजवळून ज्ञानाचे कण वेचण्याची वृत्ति पाहून त्यांना थोडी आत्मविस्मृति पडली. अशा स्त्रीला ज्ञानदान करण्यात काय आनंद आहे, हे अजमावून पाहाण्याची इच्छा त्यांना झाली.

ते खाली उतरले. खाडीवरून आलेल्या वाऱ्याचा झोत अंगाला झोंबत, जणू त्यांची कानउघाडणी करीत होता. पण तिकडे लक्ष न देता ते नावेत गेले व त्यांनी तिला साऱ्या गोष्टी समजावून सांगितल्या.

मदयंती अगदी नम्रपणे म्हणाली—"सरदारसाहेब, तुम्ही मला इथं आणलं याबद्दल मी खरोखर तुमची फार फार आभारी आहे."

तिच्या नम्रतेने नानासाहेबांच्या स्वाभिमानाला गुदगुल्या झाल्या. पुरुषाचे मन प्रायः चाबुकस्वारासारखे असते. घोडा जितका नाठाळ, तितका त्यावर चढून, मांड जमवून, लगाम ओढून आपल्या ताब्यात आणण्याचा आनंद जास्त. दमयंती काय, सगळ्यापुढेच नम्र. त्यामुळे तिच्या नम्रपणा-पेक्षा मदयंतीच्या नम्रपणात त्यांना काही विशेष वाटले पण तिच्यासाठी आपण काही केले असे तिला वाटू नये, म्हणून ते म्हणाले—"आभार माझे कशासाठी? तुम्हाला इथे आणायला आणि हे सारं दाखवायला मला दमयंतीनं सांगितलं."

"काय येथे? या नावेत?"

नानासाहेबांच्या चेहऱ्यावर इच्छा नसतानाहि स्मित झळकू लागले. तिच्या धूर्तपणाची व लबाडीची त्यांना मौज वाटली. आपल्या सांगण्याचा अविश्वास तिच्या सुंदर चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता व तो झाकून ठेवण्याची लबाडीहि दिसत होती. पुरुषाच्या लबाडीपेक्षा बायकांची लबाडी काही न्यारी-च असते. एखाद्या नियमाचा भंग करून ते लपविण्याची लबाडी पुरुषाची पण बायकांना मुळी बंधनच नसते. आणि म्हणूनच नियमाचा, भंग केल्याचे सोंग जेव्हा त्या करितात तेव्हा ते सोंग अगदी निराळेच दिसते.

नानासाहेब जिज्ञासापूर्वक म्हणाले, "मला वाटतं, तुम्ही इथं येऊ नये अशी दमयंतीची इच्छा असती तरी तुम्ही इथं आलाच असता, नाही?"

"हो. असल्या कृत्रिम, नाजुक अन् काल्पनिक बंधनावर माझा विश्वास नाही. घेता येईल तेवढं घ्यावं हाच माझा नियम." असे म्हणून ती तेथेच थोड्या डुलणाऱ्या नावेत एका बाकावर बसली.

नानासाहेबास वाटले, 'ही भिकाऱ्याची नीति.' मदयंतीच्या बाबतीत ते

ही नीति समजू शकले नाही. कळले त्याना फक्त मदयंतीचे मन. ते मात्र भिकाऱ्याचे नव्हते. त्यापेक्षा ते कितीतरी निराळे होते

नानासाहेबाचा हसतमुख रुबाबदार चेहरा न्याहाळीत मदयंती थोड्या अड स्वराने म्हणाली, " या असल्या काल्पनिक बंधनावर तुमचा विश्वास कसा बसतो हेच मला समजत नाही माझ्यासारख्या परिस्थितीत तुम्ही वाढला असता, तर तुमची अशी मत झालीच नसती. भुकेने व्याकुळ झालेल्या माणसाला नीति समजत नाही खायला जर मिळालेच नाही. तर अन्न दिसल्याबरोबर तो झडप घालणारच

" चोरी करणारच. " नानासाहेबानी वाक्य पुरे केले. " मला वाटत मग चारित्र, पावित्र्य या सऱ्या गोष्टी सुखात लोळणाऱ्याचे चोजलेच म्हटल्य । पाहिजेत ? "

" मला मुळी त्या शब्दाचा अर्थच कळत नाही त्याविषयी बोलण नि विचार करण, मला नुसती मजा वाटते "

" हो मजा आहेच, मोटीच मजा. "

आणि विचार केला तर, ही सारी मोजच नव्हती का? या दोघानी येथे दमयंतीसाठी तयार केलेल्या नावेत एकत्र येणे मोठीच मौज होती मदयंतीची मतेहि नानासाहेबास मजेचीच वाटत

" मग तुमच्या मतान बोलायच तरी कशाबद्दल ? "

" बोलायला, वास्तविक खर खर बोलायला, किती तरी गोष्टी आहेत. मला मुळी बोलायलाच मिळतच नाही. दयाबाईशी फार बोलावस वाटत नाही. "

" आणि तिच्याशी बोलण्यासारख तुमच्याजवळ काही आहे अस मला वाटत नाही. अशा स्थितीत तुम्ही इथ राहताच का, हेच मला समजत नाही. "

ती का राहते हे नानासाहेबाना पूर्णपणे समजले होते पण आज अगदी छडाच लावावयाची त्याना लहर आलीसे दिसत होते. या स्त्रीचा आश्चर्य-जनक धीटपणा कुठल्या थरापर्यंत जातो हे पाहाण्यास आज त्याचे मन उद्दीपितच झाले होते.

मदयती किंचित् दूर सरली व नावेंतून दूरवर चोहीकडे न्याहाळ लागली. ती म्हणाली— "सरदारसाहेब, ही नाव तुम्ही कशासाटी बाधविली ?"

"दमयतीला लग्नाची प्रथम–भेट म्हणून देण्यासाठी"

मदयतीच्या चेहऱ्यावर असूयेची छटा आलेली नानासाहेबाना दिसली, त्याना दिसले नाही तिच्या हृदयात केवढा द्वेपाग्नि घुमसत होता, आणि त्यातून सूडाच्या केवढ्या ज्वाला बाहेर पडणार होत्या, ते.

"दमयतीबाईनी अजून ही नाव पाहिली नाही ?"

"नाही. आकाश स्वच्छ असताना ही तिला मी दाखवणार आहे आणि अजून थोड कामहि व्हायच आहे. या बाकावर आणि खुर्च्यांवर गाद्या लागायच्या आहेत."

मदयती स्वस्थ बसली होती. तिचे तोड प्रकाशाच्या विरुद्ध दिशेस होते. तिला जे वाईट वाटत होतें ते तिच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे प्रतिबिबित झालें होते

"तुम्हाला आवडली का ही ?" नानासाहेबानी जरा मृदुपणे विचारले.

"आवडली ? माझ्यासाठी नाही ना ही तयार झाली ? आहे का ?" ती एकदम तोड वळवून म्हणाली.

"प्रश्नच नाही तो !"

तिने आपले तोड पुन्हा फिरविले.

थोड्या उत्सुकतेने व थोड्या खवचटपणे या अजब अत.करणाचा आणखी थोडा ठाव घेण्याची नानासाहेबास इच्छा झाल्यासारखे दिसले.

"तुम्हाला वाईट का वाटाव ? दमयतीन इतक केल तरी तुम्ही दुःखीच."

ती एकदम सतापाने ओरडली, "पुरे करा हो दमयती दमयती ! जेव्हा तेव्हा दमयती !"

"पण तुम्ही सुखी नाही का ?"

मदयतीने तोड वळवून नानासाहेबाच्या दृष्टीला दृष्टि दिली व ती म्हणाली, "हे पाहा सरदारसाहेब, काल चहा घेत असताना पावसात चिंब

होऊन एक मांजर आलं. थंडीराच्यानं त्याचं सारं अंग कांपत होतं. आम्ही त्याला आपल्या गादीवर घेतलं, त्याला पांघरूण घातलं, याला तुम्ही त्या मांजराचं सुख का म्हणतां? थंडी घालविण्यासाठीं जरी तें आमच्या बाजूला गादीवर दबून बसलं होतं, तरी खरं खरं तें दूध पिण्यासाठींच टपलं असेल आणि आम्ही त्याला तसं करूं देणार नाहीं, म्हणून मनांतून कदाचित् आमचा द्वेषहि करीत असेल."

"तुमची उपमा मोठी मजेची आहे. मग तुम्ही आमचा द्वेष करतां असं समजायचं की काय?"

"तुम्हांला पुरं पुरं माहीत आहे कीं मी तुमच्यावर प्रेम करतें. माझं तुमच्यावर प्रेम आहे."

हो. नानासाहेबांना हे पूर्णपणे कळलेले होते. ही असें स्पष्ट बोलून दाखवील की काय हीच शंका त्यांना होती. त्यांनी तिला तसें बोलून दाखविण्याची संधि दिली होती. नव्हे, तिला उत्तेजित केलें होतें. तिचा धीटपणा कोठल्या कोटीपर्यंत जाऊं शकतो याबद्दल नानासाहेबांची खात्री झाली.

"तसं नसतं," मदयंती पुढें म्हणाली, "तर मी इथं आलेंच कशाला असतें? मी इथें आलें, तुमच्याजवळ राहायला सांपडावं म्हणून. प्रेमाची माझी काय कल्पना आहे, हे मी तुम्हांला सांगितलंच आहे."

इच्छा नसतानाहि नानासाहेब उत्तेजित झाले. पण तसें न दाखवितां ते म्हणाले— "हे तुम्हांला कां वाटतं सांगूं का? तुमचा अजून दुसऱ्या कोणाशीं परिचय झाला नाहीं म्हणून. थोडं बाहेर पडलां की हा भ्रम दूर होईल."

मदयंती रागानें म्हणाली— "मला तुम्ही मूर्ख का समजतां? तुमच्यावर माझं प्रेम आहे हें मी मनापासून सांगतें आहे."

नानासाहेबांना यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नव्हतें. मदयंतीसारख्या परिस्थितींत असलेल्या कोणाहि स्त्रीला यांच्यासारखा पुरुष आढळला तर त्यावर आपलें प्रेम बसलें आहे असें वाटणें अगदीं साहजिक होतें. नागावच्या त्या आळींत जीं माणसें तिला दिसलीं असतील त्यांच्या मानानें नानासाहेब तिला कितीतरी श्रेष्ठ वाटले असतील व त्यामुळें तिला त्यांच्या-

बद्दल काही विशेष वाटावयास लागले यात मुळीच आश्चर्य नव्हते. ज्या गोष्टीचे त्याना आश्चर्य वाटले व ज्यामुळे ते उत्तेजित झाले, तो होता तिचा प्रेमोन्माद. दमयंतींत हा उन्माद नाही, ही गोष्ट नानासाहेबास जाणवली. आपण ज्या गोष्टीची अपेक्षा दमयंतीजवळून करीत आलो, ती गोष्ट हिच्या जवळ आहे हे ध्यानी येऊन त्याना कसेंसेंच वाटू लागले

तिचा हा उन्माद कोठपर्यंत जातो हे पाहाण्याची पुन्हा नानासाहेबाना इच्छा झाली व ते म्हणाले, " आणि मग दमयंती ? "

" मला पर्वा नाही तिची, अगदी कुणाचीहि, हे तुम्हाला ठाऊक आहे फार काय, मला हे प्रेम मिळाल अन् मग माझ तुम्ही काही केल तरी मला त्याची पर्वा नाही "

तिने नानासाहेबाजवळ जाण्याचा प्रयत्न केला नाही. नानासाहेबाकडे तिने एकदा स्नेहपूर्ण दृष्टीने पाहिले व ती एक गुडघा वर घेऊन तो दोन्ही हातानी पोटाशीं आवळून बसली.

" माझ्याकडून तुम्हाला काय उत्तर मिळेल अशी अपेक्षा आहे ? "

" मला काय ठाऊक ? इतक बोलायला तरी तुम्हीच लावल ना मला ? "

आणि हे अगदी खरे होते. ही परिस्थिति नानासाहेबानीच उत्पन्न केली होती, आणि तिला तोंड देणे त्याचेच काम होते. ते जितका उदासीनपणा दाखवीत होते तितका त्याच्यात खराच असता तर हे काम अधिक सोपें झालें असते. पण तिने त्याच्या मनात चचलता उत्पन्न केली होती. एक प्रकारची उत्सुकता व भीति याचे त्याच्या मनात मिश्रण झाले होते, आणि त्यामुळेच काय उत्तर द्यावे हे त्याना सुचत नव्हते.

ते म्हणाले—" दमयंतीशीं तरी प्रामाणिक राहाण्याविषयी मीं तुम्हाला बजाविल होत. "

" आणि मीहि पण तुम्हाला सागितल होत, मी कुणाशी प्रामाणिक राहू शकते ते. "

नानासाहेब ताडकन् उभे राहिले आणि पलीकडील खिडीकडे पाहू लागले. मदयंती निश्चलपणे त्याच्याकडे टक लावून पाहात होती.

त्या क्षणीं चारित्र्य, पावित्र्य वगैरे सारीं नानासाहेबाना बंधनासारखी

वाटली. संध्याकाळच्या त्या शांत वेळीं या साऱ्या गोष्टी म्हणजे, पायात अडकविलेल्या बेड्या, त्रास देणाऱ्या-शृंखला वाटल्या त्याना असेहि वाटले की, दमयंतीला आपणाबद्दल काही वाटतच नसावे असते, तर या गोष्टींची तिला कल्पना आली असती. तिने खात्रीने तर्क केला असता. असूया मुळीच न वाटणारी दमयंती निष्प्रेमच असली पाहिजे. नाहीतर मदयंतीच्या तावडीत या प्रकारे तिने आपणास दिलेच नसते.

अशा या अनिश्चित मनःस्थितीतच त्यानी आपले तोंड मदयंतीकडे वळविले. मदयंती तशीच मादक दृष्टीने त्याच्याकडे टक लावून पाहात होती.

ते एकदम थोड्याशा तुसडेपणानेच म्हणाले— " बघता काय अशा माझ्याकडे ? दमयंतीशीं मी वचनबद्ध आहे, हे माहित आहे ना तुम्हाला ? "

मदयंतीची पूर्ण निराशा झाली. ती कपाळावर व तोंडावर हात घेऊन हुदके देऊ लागली.

" अरे बापरे ! " नानासाहेब म्हणाले, " यात रडण्यासारखं काय आहे ? "

" तुम्हाला नाही. " ती हुदके देतच म्हणाली.

नानासाहेब तिचे थोडे समाधान करावे म्हणून तिच्याजवळ बसले आणि तिच्या तोंडाकडे वाकून पाहू लागले.

मदयंतीच्या हाताचा विळखा त्याच्या गळ्याला पडला. एक क्षण, दोघेहि एकमेकाकडे रागाने पाहात राहिलीं —पण काय झाले कुणास ठाऊक, — ओष्ठद्वयाचे मीलन झाले.



# ११

दोन ओष्ठद्वयाचे एकच मीलन, पण त्याचे परिणाम किती भिन्न झाले !

मदयंतीबद्दलची उत्सुकता, जिज्ञासा, उन्मादावस्था या साऱ्याची परिसीमा झाली त्या चुंबनाने. मदयंती किती धीट होऊ शकते, तिचा उन्माद कोणत्या थराला जाऊ शकतो, आणि आपल्याविषयी तिची भावना कशा प्रकारची असू शकते, या साऱ्या बाबतींत नानासाहेबांची खात्री झाली. त्यांना कळून आले की, मदयंती म्हणजे एक बाजारी स्त्री होण्याच्याच लायकीची आहे. नागावसारख्या गावातील गरिबींत राहाणाऱ्या मुलीला नीति कसची आणि काय कसचे ? आजपर्यंत तिला असे कितीतरी प्रसंग आले असतील. मदयंती सुंदर असेल पण सुसंस्कृत नाही. तिला मन असेल, पण ते अत्यंत क्षुद्र आणि स्वार्थी. आपला किंवा दमयंतीचा वर्ग अगदी निराळा, ही अगदी निराळ्या वर्गातली. असल्या निकृष्ट वर्गाच्या खेळण्याशीं आपण थोडावेळ खेळलों, दमयंतीपासून ज्या उन्मादकारक सुखाची आपली अपेक्षा अतृप्त राहिली, ती थोडी तृप्त केली, तरी त्याला फारसे वावगें होणार नाही. त्यामुळे आपण दमयंतीशी बेइमान खात्रीने ठरत नाही. पण ही दमयंतीची बहीण व आपली पाहुणी, यामुळेच या पुढे जावयाचे नाही व हिच्याशी मुळीच संबंध येऊ द्यावयाचा नाही, असें नानासाहेबांच्या-- गरीबांच्या नीतीची मुळींच ओळख नसलेल्या व श्रीमंतीच्या नीतिकल्पनात मुरलेल्या नानासाहेबांच्या-- मनाने ठरविलें.

हे सारे विद्युद्वेगाने नानासाहेबांच्या मनात आले, आणि ते झट्दिशी मदयंतीपासून दूर होऊन नावेतून वर जमिनीवर येऊन उभे राहिले.

दुसऱ्या बाजूस मदयंतीला-- पुरुषास, वीरपुरुषास, अनायासे गळयात पडलेल्या वस्तूची किंमत वाटत नाही, हे माहित नसलेल्या मदयंतीला-- हें कळेना की, नानासाहेब एकदम दूर का झाले? दमयंतीशी आपला असलेला संबंध किंवा पाहुणेपणा त्यांच्या आड आला असेल हे तिला-कळलेंच नाही. तिला एकच वाटले, आणि ते हे की, नानासाहेबांचे दमयंतीवर दाट प्रेम आहे आणि त्यामुळेच ते आपल्याशी असे वागले. तिची खात्री झाली की, दमयंतीच्या भोळया, मूर्खपणाच्या किंवा दयेच्या आपल्यावर जडलेल्या भक्तीच्या योगानेहि आपण नानासाहेबास यापुढे नेऊ शकणार नाही. आणि त्यामुळे दमयंतीबद्दल शुद्ध द्वेषबुद्धि तिच्या मनात उत्पन्न झाली. थोड्याच वेळात कपडे सावरून तीहि वर आली व दोघेहि एकहि शब्द न बोलता वाड्यात आली.

दुसऱ्या दिवशी सकाळींच नानासाहेब मुंबईस निघून गेले.

एखाद्या धूम्रपान करणाऱ्याने फर्रदिशी काडी ओढावी, विडी पेटवावी व सहज जवळ असलेल्या भुशाच्या पोत्यात विझविण्यासाठी तिला टोचावी. त्याला वाटते काडी विझली, आणि बहुतेक वेळ ती विझतेहि. पण एखादे वेळेस काडीत ठिणगी जास्त असावी म्हणून म्हणा, किंवा भुशातल्या काही भागात अग्नि-ग्रहणशक्ति अधिक असावी म्हणून म्हणा, ती विझत नाही व ती आग आतल्या आत धुमसत राहाते. काडी विझविणाऱ्याची ती सहज लीला होते, पण भुसा आतल्या आत आगीने धुमसत असतो. त्याचप्रमाणे मदयंतीची स्थिती झाली. आजपर्यंत ज्या इच्छा तिच्या हृदयात सुप्त होत्या, त्या साऱ्या या एका प्रसंगाने जागृत झाल्या व ती बेचैन झाली. नानासाहेब निघून गेल्यावर तिला कोकणात राहण्यात आनंद वाटेनासा झाला. दयेशी बोलतानाही ती चिडू लागली

अशाच एका प्रसंगीं ती दयेजवळ, आपल्याच विचारात चूर असताना, दया म्हणाली- "मदयंतीबाई, मला कोकणचा कंटाळा येऊ लागला आहे. शिवाय तुम्ही म्हणता तशी अन् तितकी बरी मी होत नाहीं असाहि मला

वाटू लागलं आहे. दिवाळीला मी मुंबईस जाण्यासारखी बरी होईन असं मला वाटत नाही."

मदयन्तीने उत्तर दिलं नाही. तिला दयेचे बोलणे बहुधा ऐकूच गेले नसावे. दया पुढे म्हणाली— "आणि तुम्ही देखील आजकाल उदास. माझा कंटाळा घालविण्याला तुम्हीहि मदत करीत नाही."

मदयन्ती जणू काय जबरीने म्हणाली— "मला आजकाल जरा उदास उदास वाटतं."

"का? नाना इथे नाहीत म्हणून?" दया एकदम म्हणाली.

एखादा विद्यार्थी शाळेबाहेरच्या बागेत कसल्या तरी विचारात निमग्न असावा आणि एकदम शाळेची ठणाण् ठणाण् घंटा व्हावी, म्हणजे जशी त्याला तासातल्या विषयाची एकदम आठवण येते व अमुक प्रश्नाला काय उत्तर द्यावे हे मनात स्फुरू लागते, तसे दयेच्या प्रश्नाने मदयन्तीला झाले. तिच्या मनात एकदम एक विचार आला व ती दयेला म्हणाली, "सरदारसाहेबांच माझ्यावर प्रेम आहे पण दमयन्तीमुळे त्याना ते दाखवता येत नाही म्हणून त्यानाहि उदास वाटू लागलं, आणि ते तुम्हालाहि टाकून मुंबईला गेले हे ठाऊक आहे का?"

आपल्या स्वतःच्याच दुखण्याचा व त्यातून बरे होण्याचाच विचार करणाऱ्या दयेच्या मनावरहि हे ऐकून विलक्षण परिणाम झाला. ती थोडा वेळ बावरल्यासारखी झाली. ती म्हणाली— "मला समजलं नाही तुम्ही काय म्हणता ते."

मदयन्तीला दयेचे निरागस, या प्रेमाची माहिती नसलेले अजाण, शुद्ध, मन तिच्या दृष्टीत दिसले. या बालिकेचाहि आपण आपल्या स्वार्थाकडे उपयोग करावा की नाही, याचा क्षणभर मदयन्तीलाहि विचार पडला. पण ती लगेच म्हणाली— "मला याहून अधिक काही सांगता येत नाही. खरं म्हटलं म्हणजे, मी हें तुमच्याजवळ बोलायलाच नको होतं."

बाहेर वारा सों सों वाहात होता. पाऊस नव्हता, पण सूर्य मात्र ढगाआडच होता. दया व मदयन्ती एकमेकींकडे न पाहाताच थोडा वेळ बसल्या. काही वेळाने ढग दूर झाले व सूर्याचे किरण थोडेच बाहेर चमकू

लागले. मदयंतीची तंद्री दयेच्या बोलण्याने भंग पावली. दया म्हणत होती—
" पण मग जीजी इथून जात का नाही ? तिला काय कमी आहे ? तिला दुसरा कोणीहि पसंत करील. "

" मी दिखील तेच म्हणते. त्या जाऊ शकतात. मी नाही. कारण मी भिकारीण. "

दयेला तिची दया आली. ती म्हणाली— " पण तुम्ही जायचंच का ! मी तुम्हाला जाऊच देणार नाही. "

" पण माझं सारं दमयंतीबाईवर अवलंबून आहे. "

स्त्री पुरुष प्रेमाची दयेला बिचारीला कल्पनाहि नव्हती. ती म्हणाली— " जर नानाचं तुमच्यावर प्रेम असेल अन् हे जीजीला कळेल तर ती येथून निघून जाईल, ही माझी खात्री आहे. आमची जीजी स्वार्थी नाही, मदयंती-बाई. ती तुमच्या अन् नानाच्या सुखाच्या आड कधीच येणार नाही. "

मदयंती गप्प बसली होती. तिचे लक्ष्य बाहेर विरळ होणाऱ्या मेघाकडे व येऊ पहाणाऱ्या सूर्यप्रकाशाकडे होते.

" नानाचं आणि तुमचं लग्न झालं तर मलाहि बरंच वाटेल. कारण मग मला सोडून तुम्हाला जायचं कारणच पडणार नाही. "

" मग तुम्ही सांगाल त्यांना असं ? "

आपण शुद्ध, निर्मल व निरपराध जीवाचा आपल्या अशुद्ध व वाईट हेतूसाठी उपयोग करून घेत आहो याबद्दल मदयंतीस कदाचित् थोडें वाईट वाटले असेल, पण तिच्यापुढे दिसत असलेलें प्रलोभन फार मोठे होते व त्यासाठीच तिने तसे वाटणे दूर सारून त्या साधनाचा उपयोग करून घेण्याचे ठरविले

दया म्हणाली, " साऱ्यांनी दुःख करीत बसावं हे मला आवडत नाही नाना इथे नाहीतच. तुम्ही अशा सचिंत. आणि त्यात हा पावसाळा ! "

" पण मग तुम्ही त्यांना खरंच सांगाल का ? "

" निःसंशय ! नानाचं जर तुमच्यावर प्रेम आहेच, तर तसं सांगायला काय हरकत आहे ! मला तर वाटतं, सारं नीट जमू शकेल. "

मदयंतीने एकदा तिच्याकडे पाहिले व ती म्हणाली. " दयाबाई, अधार

पडायच्या आत मी थोड फिरून येते अ ?" असे म्हणून तिने निरोप घेतला व ती बाहेर पडली.

त्या दिवसापासून मदयती रोज नावेच्या बाजूस फिरावयास जात असे. पुन्हा नावेत उतरायला मात्र कधीच तिला मिळाले नाहीं. कारण, नानासाहेब जाताना कामगाराना काम सरले की नौकागृहास कुलूप लावण्यास सागून गेले होते. आत नाही तर नाही, पण एकदा त्या घराचे दुरून दर्शन तरी घेतल्याशिवाय मदयतीला चैन पडत नसे. आजहि ती त्या बाजूकडेच फिरायला गेली व थोडा वेळ बाहेर बसून परत आली.

तिन्हीसाजा झालेल्या होत्या. वर दयेच्या खोलीत प्रकाश दिसत होता, पण खाली अजून दिवे लावले नव्हते. मोठ्या दिवाणखान्यातून वर जात असताना मदयतीला असे वाटलें की कुणीतरी दिवाणखान्यात बसले आहे. दुसरे कोण, दमयतीच असणार. तिच्या मनात एकदम एक विचार आला व तिने विचारले, " कोण ते ? दमयतीबाई ? "

" हो, मीच आहे. "

" मग अधारात का ? दिवा लावू का मी ? "

" नको. मी वरच जाते आहे. "

" मला तुमच्याशीं थोड बोलायच आहे. "

काही तरी अप्रिय गोष्ट सागण्यापूर्वीची नेहमीचीच प्रस्तावना आहे ही. पण ती ऐकून दमयतीचे काळीज चर्र झालें. ती म्हणाली, " आता ? या-वेळेस ? उद्या-परवा बोलू आपण. "

पण मदयती अशी टाळल्याने टळणारी थोडीच होती ! ती दमयतीजवळ गेली व म्हणाली-- " नाही. मीं पुष्कळ विचार केला आणि मला वाटत तुम्हाला कळायलाच पाहिजे की--"

मदयती जवळ आलेली पाहाताच दमयतीला थोडें भयच वाटलें. ती ताडकन् उठली. दिव्याजवळ जाऊन तिने दिवा लावला. देवाला नमस्कार केला. प्रकाशाने व नमस्काराने जणू काय तिला धीर आला. ती मदयतीकडे तोंड करून उभी राहिली.

" दमयंतीबाई, आपणा दोघीत हे असं फार दिवस चालणं आता शक्य नाही. एकदा काय सोक्ष की मोक्ष करायलाच पाहिजे. नाही का ? "

मदयंती उभी होती त्यांच्या मागच्याच भिंतीवर नानासाहेबांचे एक मोठे उभे चित्र टांगलेले होते. त्या चित्राच्या खांद्यापर्यंतचा भाग मदयंतीच्या छायेने व्यापला होता. दमयंतीच्या मनात सहज विचार आला की, ज्या दोन व्यक्तींशी आपणाला वागावयाचे आहे त्या आपल्या सामन्यावर उभ्या आहेत व आपण एकट्याच दुसऱ्या बाजूला आहो. ती शांतपणे म्हणाली— " मदयंती, तुला काय सांगायचं आहे ते मला माहीत नाही. पण तू विचार केला आहेस का ? काही बोलण्याची, एक शब्द तरी उच्चारण्याची आवश्यकता आहे काय ? "

पण मदयंतीने या प्रश्नाकडे लक्ष्यच दिले नाही. ती म्हणाली— " नानासाहेब—" हे नाव तिने अशा सफाईने उच्चारिले की, जणू काय सरदारसाहेबांचे नानासाहेब कव्हाच झाले आहेत, असा भास व्हावा " नानासाहेब अनू मी दोघहि त्या नावेत गेलो होतो "

असें काही तरी झाले असावे, असें दमयंतीस वाटतच होते. त्या दिवशी बऱ्याच मध्यान्हकाळीं जेव्हा ती दोघे परत आली तेव्हा मदयंतीच्या चेहऱ्यावर दिसणारें सुख व संतापाचे मिश्रण आणि नानासाहेबांची आपणास टाळण्याची लजील वृत्ति पाहूनच तिने अशी काही तरी अटकळ केलीच होती पण ती गोष्ट अशा रीतीने आपल्या तोंडावर फेकली जाईल असे मात्र तिला वाटले नव्हते पण तरीहि या अनपेक्षित माऱ्याने ती गांगरली नाही ती शांतपणे म्हणाली—" तू होऊनच गेली असशील तिथ, अनू मग त्यांना नाही म्हणता आलं नसेल. "

दमयंतीच्या भोळेपणाची कीव करावी तेवढी थोडीच असें दाखविण्यासारखे मदयंती हसली आणि म्हणाली, " त्याविषयी फारसं बोलायची माझी इच्छा नाही. मला सांगावसहि वाटत नाही— खरोखर मला फार वाईट वाटतं, आणि मला वाटतं, नानासाहेबांनाहि वाईट वाटतं. "

दुसऱ्यांदा नानासाहेबांचे नाव आपल्यावर फेकले गेल्याचे पाहून दमयंतीला वाईट वाटले ती खुर्चीवर बसली मदयंतीस वाटले, आपल्या माऱ्याने

दमयन्ती चीत झाली. पण हे क्षणभरच कारण लगेच दमयन्ती म्हणाली, ' तुला कशाबद्दल वाईट वाटत ते साग ना. "

" तुम्ही कदाचित् तर्क केलाच असेल. तुम्हीच तो तर्क मला सागितला तर बर नाही का होणार ? "

" नाही. तर्क–कुतर्क करण्याचा माझा स्वभाव नाही. "

मदयती थोडा वेळ थाबली. आपल्या विजयाचा आस्वाद कमा दाखवावा किंवा घडलेली गोष्ट कशी समजावून सागावी याचा विचारच ती जणू करीत होती " बर तर मग ऐका. " एक एक शब्द मोजीत मदयती म्हणाली, " नानासाहेबाच माझ्यावर प्रम बसल आहे "

डोळ्यापुढे वीज लकाकावी तसे एकदम दमयतीला झाले पण तिला थोडयाच वेळाने थोडे स्पष्ट दिसू लागले ती म्हणाली,–– " मला नाही वाटत हे खर आहे म्हणून. अशी कल्पना करण्याचहि मला कारण वाटत नाही कारण, तस असत तर नानानी मला स्पष्ट सागितल असत. "

" ते तुम्हाला कधीच सागणार नाहीत. सागू शकणार नाहीत. त्याच्या त्या नैतिक कल्पना, त्याना तस करू देणार नाहीत. पण तुम्हाला ठाऊकच आहे की, मला असला हा दभ आवडत नाही. "

" तू काय करते आहेस, मला काय सागते आहेस, हे त्याना माहीत आहे काय ? "

" नाही. त्याना कस माहीत असणार ? त्याची कल्पना आहे की, मी सार शातपणे सहन करीन "

" तू ? मला नाही समजल तुझ म्हणण. "

" अहो, मीहि त्याच्यावर प्रेम करते. तुम्हाला दिसल नाही हे ? "

" प्रेम ? " दमयती गोंधळलेल्या स्वराने म्हणाली, " माझा नाही विश्वास बसत. तू ? छे ! प्रेम नव्हेच हे. प्रेमाच्या गोष्टी अशा सागत बसायच्या नसतात लोकाना. अशक्य. बर, नाना तुझ्यावर प्रेम करतात हे तरी तू कशावरून म्हणतेस ? ते काय म्हणाले तुला ? "

आता मात्र विजयी सत्याचे तेज मदयतीच्या डोळ्यात लकाकले. पण त्यातल्या त्यात थोडा विपर्यास करून ती म्हणाली— " त्यानी मला जवळ

घेतल– अगदी जवळ. आणि माझा मुकाहि घेतला. ते म्हणाले, ' मी वचन-बद्ध आहे. ' "

" काय ? त्यांनी अस केल ? ते अस म्हणाले ? "

" विचारा त्याना पत्र पाठवून हव तर, मी म्हणते हे खर की खोट ते."

दमयंती उठून उभी राहिली. " तू सागतेस यावर माझा विश्वास बसत नाही. तू खोल मनाची आहेस. चतुर आहेस. मला वाटत हे सार तू मनाशी ठरविल्यासारख बोलते आहेस. बर, पण पुन्हा कुठ हे तोंडाबाहेर काढू नकोस मात्र. नाना यावेळीं इथे नाहीत, तेव्हा काय करायच तें माझ मलाच ठरवल पाहिजे. "

" कशाबद्दल ? " मदयंती उत्सुकतेने म्हणाली– " मी जे काय तुम्हाला सांगितल त्याबद्दल ? "

" छे. नानाची गोष्ट विचाराबलीकडची आहे. आपण दोघींनी यापुढ कस राहायच याबद्दल. कारण, आता आपण दोघींनी जवळ जवळ राहाण अनिष्ट– अशक्य– आहे. "

एवढे बोलून दमयंती वर आपल्या खोलींत गेली व तिने आतून दार लावून घेतलें.



# १२

अशी एक म्हण आहे की, ' अशुभस्य कालहरणम्. '

वाईट गोष्ट करण्यास मनुष्य शक्य तितका वेळ लावीत असतो. जणूं काय तो वाटच पाहात असतो की, काळ आपल्याला मदत करील.

मधले काही दिवस असेच कालहरणात गेले

दमयंती रागाने काही तरी करील, संतापून नानासाहेबास पत्र लिहील. नानासाहेब इथ येतील किंवा ती तरी मुंबईला जाईल, नानासाहेबाना खरी गोष्ट नाकारता येणार नाही. साराश, काही तरी खळबळ माजेल आणि आपणास त्यातून काही तरी घाट काढता येईल, अशी मदयंती वाट पाहात होती.

नानासाहेब स्पष्टपणे आपणास काही तरी लिहितील, किंवा येथे येऊन आपणाशीं स्पष्टपणे बोलतील व मग आपण काय करायचे ते ठरवू, अशी दमयंती वाट पाहात होती.

दमयंती येथून कधी जाईल, नानासाहेब केव्हा येतील व मदयंतीबाई आणि नानासाहेब सुखी होऊन आपली प्रकृति सुधारण्याच्या मार्गास कधी लागेल, याची वाट दया पाहात होती. कारण, ती अलीकडे सुधारत नाही व त्याचे कारण मदयंतीबाई आपणांशी पूर्वीप्रमाणे बोलून उत्साह देत नाहीत–, असे दयेला वाटत होतें.

दया आपणाकडे तितक्याशा प्रेमाने पाहात नाही, आपण तिला आवडनासे झालों आहो, हें दमयंतीला कळून चुकलें होतें. पण मदयंतीने या

प्रेमाच्या त्रिकोणातील काही गोष्टी तिला सांगितल्या असतील अशी मात्र तिची कल्पना नव्हती.

आपण मदयंतीशीं कसे वागलो, हें कोणास कळावयाचें नाही. कारण जें काय झालें तें मदयंतीला कीं आपणासच माहीत, व त्यानंतर आपण मदयंतीशीं जसे वागलो, त्यावरून तिला आपलें मन खात्रीनें कळलें आहे, आणि म्हणून आपलाच अपमान आपल्याच तोंडानें कुणी सांगत सुटत नाही, अशी त्याची कल्पना असल्यामुळे दमयंतीला झाली गोष्ट माहीत असेल असें नानासाहेबास वाटलेंच नाही. त्यामुळे त्याची जी पत्रे दमयंतीस येत त्यांत ह्या गोष्टीचा उल्लेख कसा येणार? उलट, शब्दांत त्याची भाषा अधिकच प्रेमाची असे. पण शब्दांतील भाषा व मनांतील भाव यांतला भेद खऱ्या प्रेमिकेस उमगल्याशिवाय थोडाच राहातो? दमयंतीस तीं पत्रें कृत्रिम वाटत. पण आपण होऊन हा विरस कसा काढावा हें हि तिला समजत नव्हते. कारण मदयंतीच्या बोलण्यांत खरें किती व खोटें किती याचा तर्क तिला करतां येत नव्हता.

एक दिवस सकाळीं असेंच एक नानासाहेबांचे पत्र दाखविण्यासाठी म्हणून ती दयेकडे गेली. दयेची प्रकृति तिला चांगली दिसली नाही. तिनें दयेला म्हटलें, "दया, मला वाटतं तुला पुन्हा एकदा डॉक्टरांना दाखवावी म्हणून. लिहू का मी नानांना तसं?"

दयेनें त्रासानें आपली मान नकारार्थी हालविली. "डॉक्टर बिक्टर काही नकोत ग मला. मी बरी होतेंच आहे. कोणत्याहि डॉक्टरांना करतां आलं नसतं इतकं बरं मला मदयंतीबाईंनी केलं आहे."

दमयंतीला यावर काय उत्तर द्यावें हें सुचेना.

थोड्या वेळानें दयाच म्हणाली, "माझी प्रकृति अलीकडे थोडी वाईट दिसण्याचं कारण तुला माहीत आहे का जीजी? मदयंतीबाईंनी मला सांगितल्यापासून एकच गोष्ट माझ्या मनांत घोळते आहे, अन् त्याच काळजीमुळं थोडं बरं वाटत नाही एवढंच."

"पण अशी काळजी वाटण्यासारखी तरी कोणती गोष्ट मदयंतीनं तुला सांगितली? आणि ती कशासाठी?"

" गरीब बिचाऱ्या मदयंतीबाई ! त्या आपलं दुःख माझ्याजवळ नाही, तर कुणाजवळ सांगणार ? "

" पण तिला असं दुःख तरी काय आहे ? "

" तेच तर मी तुला आज सांगणार आहे. पण—अं , आज माझं डोकं इतकं दुखत नसतं तर बरं होतं. " असे म्हणून दयेने पडल्या पडल्याच डोळे मिटून घेतले.

आता दमयंतीला तिच्यात किती तरी बदल दिसला बऱ्याच दिवसांत तिला असे निवांतपणे दमयंतीने पाहिले नव्हते. तिला आज दयेचा चेहरा विलक्षणच वाटला. एखादे तोडलेले गुलाबाचे फूल, मीठ घातलेल्या पाण्याने भरलेल्या फुलदाणीत ठेवलेले असावे, तें वरवर जरी टवटवीत दिसले तरी देठापासून त्याच्या पाकळ्या सुटत असतात. देठातून रस ओढण्याची त्याची क्रिया बंद झालेली असते व या पाकळ्या लवकरच गळून पडणार असे दिसते. दयेकडे पाहून दमयंतीस तसेच वाटले.

मदयंतीचे वेड नानासाहेबांस इतके लागावे की दयेकडेहि त्यांचे लक्ष्य कमी व्हावे, याबद्दल तिला फार वाईट वाटले. आपल्याहि ध्यानात ही गोष्ट आतापर्यंत कशी आली नाही, याचेहि तिला आश्चर्य वाटले आपण नानासाहेबांस आता हें कळविलेच पाहिजे असा तिने निश्चय केला.

इतक्यात दयेने डोळे उघडले. ती म्हणाली—" जीजी, तुला कळत नाही का ग ? तू थोडा स्वार्थत्याग करू शकत नाहीस का ? "

दया अजून पोरच होती. आपले बोलणे किती निर्दयपणाचे आहे आणि त्याने दमयंतीच्या हृदयावर केवढा घाव आपण घालीत आहो याची तिला कल्पनाच नव्हती.

" दया, मला वाटतं मी थोडा तरी त्याग करतेच आहे. "

" हो. पण तेवढा पुरत नाही ना ! "

" म्हणजे ? " दमयंतीचे नेत्र विस्फारित झाले. " तुला माझा एवढाहि त्रास वाटतो का ? मी अजोबात इथून जावं असं तुला वाटतं का ? "

दयेने आपली मान बाजूस वळविली व ती म्हणाली, " नानाचं मदयंतीबाईवर प्रेम बसलं आहे आता. पण तुझ्यामुळे त्यांना ते दाखवता येत नाही.

तुला नानाना सोडता नाही का येणार ? मला वाटत, तू एवढा त्याग आणखी करावास. ”

बाहेर वारा सो सो वाहात होता. खिडक्या बंद होत्या. त्यातून आत शिरण्याची तो खटपट करीत होता, व त्या खटपटीत खिडक्याची तावदाने वाजवीत होता.

दमयंतीने दयेच्या अंगावरील पांघरूण नीट केले ती म्हणाली, “ दया, तुला हे कोणी सांगितल ? ”

“ मदयंतीबाईंनी. ”

“ नानांनी नाही ना ? ”

“ नाही. पण ते मुंबईला गेले ना ? ”

हो. नानासाहेब मुंबईला गेले होते दयेला अशीच इथे सोडून.

“ आणि नानांना ते कस सांगता येईल ? पण तुला हे कळायला पाहिजे. ”

“ मला वाटत, मला कळत. पण मदयंतीची कल्पना खरी कशावरून ? मी अर्थात् याबद्दल कांहीच बोलू शकत नाही ”

दया उठून बसली. “ पण शेवटीं तू करणार आहेस काय ? ” तिने विचारले.

“ बाळ, तू नकोस त्याची काळजी करू. काय करायच ते माझ्यावर आणि नानांवर सोडून दे. ’ दमयंती तिच्या अंथरुणावर बसून तिच्या अंगावर हात फिरवीत म्हणाली.

“ अग पण सोडू कशी ? हे अस किती दिवस चालणार ? ”

“ नाही चालायच फार दिवस. पण दया, तुला कळत नाही का की, नुसती मदयंती म्हणते म्हणून ते खर असलच पाहिजे अस कस समजाव ? एकमेकांवर प्रेम करणारी माणस अस सांगत फिरत नाहीत— मदयंती सांगते आहे तस. ”

दया लगेच म्हणाली. “ मदयंतीबाईंनी सांगण्यापूर्वीच मला तस वाटल होत. आणि तेहि नानांवरूनच. ”

“ नानांवरून ! ”

" हो, तुमच दोघाच वागण पूर्वीसारख राहिल नव्हत. होत का? आणि नाना मदयतीबाईशी कसे वागत हे मला दिसत का नव्हत?"

" अस्स तर!" दमयतीच्या मनात आले, 'म्हणजे आजपर्यंत आपण विश्वास ठेवला नाही ती गोष्ट खरीच होती म्हणायची?' पण ती हें मोठ्याने बोलली नाही

" मदयतीबाईनी सुखात राहाव अस मला वाटत." दया आपल्या क्षीण स्वराने म्हणाली. "त्यानी माझ्यासाठी इतक केल. जीजी, तू नेहमीच सुखात आहेस. तुला काय कमी आहे?"

थडीच्या दिवसात शेगडीजवळ ऊब येण्यासाठी जावे आणि एकदम तडकणाऱ्या कोळशाची ठिणगी अगावर उडून चटका बसावा, तसे दमयतीला झाले. ती ताडकन् उठून उभी राहिली.

दया पुढे म्हणाली—" आणि तुला नानाबद्दल इतक वाटत असहि दिसत नाही. मदयतीबाई म्हणत होत्या की, खर प्रेम करणारी माणस लग्नाशिवाय इतके दिवस राहूच शकत नाहीत. मोठ्या मडळीनी ठरवून ठेवलेल्या लग्नासारखच तुमच लग्न ठरल होत."

दमयतीला पुढे ऐकवेना. तिला एका जागीं उभे राहणेहि अशक्य झाले. ती इकडून तिकडे फेऱ्या घालू लागली. दया म्हणाली— " जीजी, तू रागावलीस होय? तू रागावलीस तर मला बर वाटणार नाही. मदयतीबाई म्हणत होत्या की, तू रागावशील म्हणून, पण मला तस वाटल नव्हत. तू स्वार्थी नाहीस अशी माझी खात्री होती."

दमयती दयेच्या बिछान्याजवळ आली.

" बाळ, मी मुळीच रागावले नाही. तू मुळीं काळजी करू नको आता. मी नानाना अशा-अशा वचनासाठी अडकवीन हे शक्यच नाही. मदयतीला तू खर साग. म्हणाव, मी तिच्या मार्गात काटा म्हणून राहाणार नाही."

साऱ्याच गोष्टी इतक्या करुण- करुण आणि त्याबरोबरच दयेला सागणे भाग पडावे या दृष्टीने हास्यास्पदहि-- होत्या.

आता मात्र दमयंतीचे सारे संशय दूर झाले. आपण व मदयंती दोघीहि जगतापांच्या घरात राहू शकत नाही, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली. दयेचें कसें होईल या प्रश्नाचाहि आता विचार करण्याचें कारण राहिलें नव्हते. तिला आता दमयंतीची जरूरच नव्हती. ती त्यावेळीं देखील मोठ्या चमत्कारिक नजरेने दमयंतीकडे पाहात होती.

दमयंतीच्या हृदयात झालेल्या जखमेवर मीठच पडावे असे दयेचे पुढील शब्द तिच्या कानी पडले. " जीजी, नानानी इथं असावं, असं मला वाटतं. पण ते येणारच नाहीत जोपर्यंत—"

दयेने ते वाक्य पुरे करावे असे दमयंतीला वाटले नाही. ती एकदम म्हणाली, " मी लवकरच मुंबईला जाते आहे. नानांशी याबद्दल मी बोलेन. मदयंतीनं इथं राहावं असं त्यांना खरोखरच वाटत असेल तर— पण मी आता अधिक बोलत नाही. दया, तुला आता फार दिवस वाट पाहावी लागणार नाही."

आपले मस्तक फिरते आहे असे दमयंतीस वाटले. ती जाऊ लागली. दार उघडताच तिला दिसले की, मदयंती बाहेरच उभी होती.

आपले बोलणे चोरून ऐकण्यासाठीच ती बाहेर उभी होती की काय, अशी शंका दमयंतीला आली, आणि " दमयंतीबाई, आमचं दोघांचं खरोखरच प्रेम आहे एकमेकावर " या वाक्याने तर ती दृढच झाली.

संध्याकाळीं दमयंतीने मदयंतीस आपल्या बसावयाच्या खोलींत बोलाविलें. तिने खोलींत पाय टाकताच दमयंतीने प्रश्न केला ? " दयेचं कसं काय आहे. "

मदयंतीच्या चेहऱ्यावर कोणत्याहि प्रकारच्या काळजीचे, अस्वस्थतेचे किंवा खेदाचे चिन्ह दिसत नव्हते. ती इतकी समाधानी दिसली की दमयंतीस तिच्याकडे पाहून एका प्रकारें बरे वाटलें. तिला वाटलें की, दया जर बरी नसती तर मदयंती इतकी समाधानी दिसली नसती. आपल्या सकाळच्या पाहाण्यात आपणास चुकीचा भास झाला असावा.

" मला वाटतं, एवढं विचारण्यासाठीच तुम्हीं मला खास बोलावलं नाही ! " मदयंतीने म्हटलें.

" नाही. पुढचा विचार करण्यासाठी— आपल्या एकत्र राहाण्याचा विचार करण्यासाठी– मीं तुला बोलावल. मी तुला इथ आणल तेव्हा माझी कल्पना नव्हती अस काही होईल, ही "

मदयन्ती गालातल्या गालात हसली. तिचे डोळे जणू काय, ' का बर ? ' असा प्रश्न विचारीत होते. तसे ती म्हणाली नाही.

" मी मुंबईला जाणार आहे. पाहाणार आहे नाना मला काही मदत करतात का. तू जे काय सांगितलस त्याची त्याना अर्थातच कल्पना नसणार. पण मला वाटत, त्याना सार समजलेल बर. "

याच गोष्टीची मदयंतीला भीति वाटत होती. पण ती घाबरली नाही. आहे या स्थितीपेक्षा दुसरी कोणतीहि पुरवली. दमयंती हडसून खडसून काही विचारणार नाही, आणि तिच्या गुळमुळीत बोलण्याने व नानासाहेबाना स्पष्ट नकार देता येणार नाही या योगाने दमयंतीचा डाव हुकण्याचा निला बराच संभवहि वाटत होता तिच्याजवळ असलेलें बिनशोक तेवढेच शस्त्र तिने दमयंतीवर उगारले. ती म्हणाली, " मला एवढच माहीत आहे की, मी जे तुम्हाला सांगितल ते सार अगदी खर खर घडलेल आहे. "

मदयंती ज्या तऱ्हेने ठासून बोलत होती, त्यावरून दमयंतीला त्या गोष्टीबद्दल शंका नव्हती. नानासाहेबांच्या तावडतोब निघून जाण्याने, इतके दिवस मुंबईसच राहाण्याने व नुसते शब्दजाल पसरणाऱ्या त्याच्या पत्रांनी ती दृढ झाल्यासारखीच होती.

" मुंबईहून आल्यावर मी तुझ्याशी पुन्हा बोलेन, तोपर्यंत दयेची मात्र काळजी घे. मी गेले तरी तुला इथ राहायला अवघड वाटणार नाही ना ? "

मदयंती हसली व म्हणाली–– " अवघड कशाच ? आणि दयाबाईची काळजी घ्यायला कुणी तरी हवच ना इथ ? "

" दयेबद्दल जर तुला प्रेम वाटत असल तर आपण अजूनहि मैत्रिणी म्हणून राहू शकू. "

" मग आपण सध्या शत्रू आहोत कीं काय ? "

" हो. मला तरी तस वाटत. तू मला शत्रूसारखीच वागवते आहेस. "

" मुळीच नाही. फक्त सध्या आपण दोघी एकमेकींच्या आड आलो

आहोत एवढच. मी स्पष्ट बोलणारी आहे. तुमच्या उपकारामुळे मी फुगून गेल्याच किंवा त्याखाली अगदी दडपून गेल्याच कोणतच सोंग मी कधी केल नाही हे तुम्हाला ठाऊकच आहे."

"तुलाहि माहीतच आहे की, मीं जे काय केल तें तू माझे उपकार मानावेस म्हणून नाही. तरी पण मला अस वाटत की, तुला माझ्याबद्दल थोड काही वाटत तर बर होत."

"कुणाविषयी अस काही वाटायला मला कुणी शिकवलच नाही."

"अस्स! या गोष्टी शिकवाव्या लागतात म्हणायच!"

"नाही तर काय? तुम्ही अगदी सुखात वाढला. त्यामुळे तुम्हाला लोकांबद्दल वाटू लागल. माझा सारा जन्म दुःखात गेला त्यामुळ लोकाबद्दल वाटायला मला वेळच मिळाला नाही, एवढच. आपणा दोघींत फरक काय तो एवढाच." मदयती स्पष्टपणे म्हणाली. मनात कदाचित् तिने आणखी असेहि म्हटले असेल की, 'दुसरा फरक म्हणजे तुम्ही मूर्ख आहात आणि मी नाहीं.'

दमयतीला तिचे म्हणणे खरे वाटले. तिला असे नेहमीच वाटे की, 'दमयती आणि मदयती यात फरक नुसता भाग्याचा. ती हिच्यासारखी वाढली असती आणि ही तिच्यासारखी– तर?'

मदयती पुढे म्हणाली—"ही विशेष गोष्ट घडून आली नसती तर आपण दोघी गुण्यागोविंदाने राहू शकलो असतो. पण झाल्या गोष्टीला इलाज नाही. मी यातून सुटण्याचा प्रयत्न करावा अस तर तुमच म्हणण नाही ना?"

"मुळीच नाही. तू म्हणतेस ते सार खर असल तर मुळीच नाही. पण माझी अजून पुरी खात्री झालेली नाही. आणि म्हणून मी मुंबईहून परत आल्याशिवाय मला काहीच बोलता येत नाही."

"मग आज माझ्याशीं तुम्हाला काय बोलायच होत?"

"आपणात शत्रुत्व असू नये एवढीच माझी इच्छा आहे. आपण बहिणी बहिणींनी मैत्रिणीसारख राहाव अस मला वाटत."

मदयतीला हिच्या उघड उघड दिसणाऱ्या मूर्खपणाची कींव आली.

" आपणाला अस राहाता येईल. नाही का ? " दमयती पुन्हा म्हणाली. " राहाता न येण्याला मला तर काही कारण दिसत नाही. "

" नाही ना दिसत तुम्हाला ? आपले दोघांचे वडील भाऊ भाऊ. ते तसे का राहात होते, याबद्दल आपण कधी बोललो का ? "

" नाही पण त्याच कारणच नाही. झाली ती गोष्ट होऊन गेली. "

" होऊन गेली नाही. अजून होते आहे. त्याचाच परिणाम आहे हा की, तुम्ही सुखात अन् मी दुःखात तुम्ही सुदैवी नि मी दुर्दैवी "

" पण आता तर नाहीस ना तू दुर्दैवी ? "

" तुम्ही याला सुदैव म्हणता ? भिक्षा, दान, उपकार या नावाच्या ओझ्याखाली जगायच आणि अज्ञान, दारिद्र्य आणि अपमान यात दिवस काढायचे. मला अस राहाण मुळीच आवडत नाही " मदयतीचा पारा चढत होता.

" पण मला जे काय करता येण्यासारख होत ते मीं केल नाही का ? "

" मी कधी नाही म्हणते ? पण तुमच्या या करण्याबद्दल लोकाना किंवा तुम्हाला स्वतःला काय वाटत तें मला ठाऊक नाही की काय ? आणि आता आणखी नानासाहेब मधे आले आहेत. तुम्हीं काय करायच ठरवलं आहे या बाबतीत ? "

" तो त्याचा प्रश्न आहे मी- मला- त्याबद्दल सध्या काहीच सागता येत नाही. "

" दमयंतीबाई, तुम्ही नुसत्या विचार करीत बसणाऱ्या आणि शिष्टाचार पाळणाऱ्या आहात पण तुम्हाला नानासाहेबांविषयी काही वाटत असाव अस मुळीच वाटत नाही "

" मला वाटत नाही, अस तुला वाटत ? होय ? "

" तर काय ? नाही तर तुम्ही इतके दिवस वाटच कशाला पाहिली असती ? असा नानासाहेबासारखा पुरुष. तुम्हाला जर खरच वाटत असत तर तुम्हाला अस राहाण अशक्यच होत. तुम्हाला विलक्षण अस काहीं वाटतच नाही. "

दमयतीला वाटले, ' हिच्या मुखाने नानासाहेबच आपणास दोष देत आहेत. ' ती विचारमग्न झाली.

मदयती अत्यंत संतापाने म्हणाली, "काय करू हो! देव मला तुमच्या-सारखी थंड करता तर किती बरं झालं असतं. या गोष्टीने इतका माझ्या मनावर ताबा मिळवावा अशी इच्छाही मी केली नव्हती. मी उलट निराळाच प्रयत्न करीत होते." मदयतीच्या शब्दाशब्दातून अंतःकरण पिळवटून बाहेर पडत होते.

बुडणारा माणूस गवताची काडीहि धरायला धावतो.

"तर मग तू माझ्याशी प्रामाणिक राहण्याचा प्रयत्न केलास म्हणा-यचं!" दमयंतीने विचारले.

मदयती तिरस्काराने हसली. ती म्हणाली, "तुमच्या नव्हे, मी माझ्या दृष्टीने बोलत होते. या गोष्टीचा मनावर इतका ताबा बसला आहे की, मला वाटतं, मी जे करायचं योजलं होतं त्यातहि अडथळा देतो आहे." असे म्हणून मदयतीने आपले ओठ घट्ट आवळून घेतले. तिची लवलव करणारी नागिणीसारखी जीभ तिने आत आवरून धरली. तिच्या चेहऱ्यावर क्रोध व तिरस्कार स्पष्ट दिसत होता.

दमयंतीचे लक्ष्य बाजूला टांगलेल्या मोठ्या आरशाकडे गेले. त्यात तिला दोघींचीहि प्रतिबिंबे दिसत होती. स्वार्थी मदयती इतकी तडफड करूनही दुःखी आणि ती स्वतः दुःखात चूर झालेली. दोन्ही दुःखी चित्रे पाहून मनुष्याचे विकार किती क्षुद्र आहेत याची तिला कल्पना आली. आपणहि क्षुद्रच आहोत. वडिलांबद्दल म्हणून जे काय आपण करतो आहोत त्यात आपण कशाचा त्याग केला आहे? नुसत्या पैशाचाच ना? आणि तो देखील स्वतःला फारसा चट्टा बसू न देता.

याहूनहि अधिक स्वार्थत्याग आपण केलाच पाहिजे. तिला आता पूर्ण-पणे वाटले की, नानासाहेबांचे मदयतीविषयी जे प्रेम आहे ते आपल्या प्रेमापेक्षा निराळ्या प्रकारचे आहे. आपण विलक्षण प्रेम करीत नाही हे ते बोलूनच दाखवीत असत. त्यामुळे ते असंतुष्ट आणि अस्वस्थ असतात. त्या रात्री नजरबागेत आपल्याविषयी खात्री न बाळगण्याची गोष्ट जी नानासाहेबांनी सांगितली तीहि तिला आठवली. तिला वाटले, शक्य आहे,

मदयंतीने तसें विलक्षण प्रेम करणं, आणि ते पाहून नानासाहेबाना तिच्या-बद्दल वाटणं.

दमयंतीने आणखी एक स्वार्थत्याग करावयाचा मनाशी निश्चय केला. या स्वार्थत्यागाच्या परिणामाची किंवा परिमाणाची कल्पना तिला आली नाही.

दमयंती पुढं काय बोलते इकडे मदयंतीचं लक्ष लागले होतें तिला विचारमग्न पाहून मदयंतीला तिच्या मूर्खपणाचा राग आला. अशा मूर्ख स्त्रीला फसविणे, गुबाडणे, तिचा अपमान करणे, तिरस्कार करणे यात काहीच चूक नाही असे तिला वाटलं आपण न केले तर दुसरे कोणी तसं करणारच आणि परमेश्वर तरी किती मूर्ख ! अशा मूर्खांना सारीं सुखें अनुकूल, आणि आपल्या कपाळीं दारिद्र्य, अपमान, तिरस्कार. आपण आपल्या पराक्रमाने परमेश्वराचा पागलपणा दूर करायच पाहिजे.

ती जाऊ लागली तरी दमयंती गप्पच

दारांशी जाऊन न उघडताना मदयंती कठोर स्वरानं म्हणाली, " सर्व आहे बाई तुमच्या थडपणाची ! नानासाहेबावर तुमचं प्रेम नाही याला दुसरा पुरावा कशाला पाहिजे ? इतकं समजूनहि असून तुम्ही इथेच राहू शकता ? मी तुमच्या जागी असते आणि माझ्या तोंडचा घास जातो असं वाटलं असत तर एक क्षणभर वाट पाहात राहिले नसते जणू काय पुरुषाचं मन म्हणजे— आणि जगात इतक्या स्त्रिया असताना!— त्यातून मुंबईसारख्या ठिकाणी ! छी. ! "

दार धाडदिशी लोटून मदयंती निघून गेली.

पेला वाहू लागण्यास आवश्यक असलेला शेवटला थेंब पडला. दुसऱ्या दिवशी पहाटेस उठून दमयंती मुंबईला निघून गेली.

# १३

" आमच दोघाच खरोखरच प्रेम आहे एकमेकावर " या मदयतीच्या शब्दावर दमयतीचा विश्वास पूर्णपणे बसला नव्हता. पण मुबईस पोंचेपर्यंत ते शब्द मात्र सारखे तिच्या कानात घुमत होते.

मदयतीच्या तसें वाटण्यात दमयतीला आश्चर्य मुळीच वाटले नाही जसे नानासाहेबास वाटले होते तसेच दमयतीसहि वाटलें की, यात नवल करण्या-सारखे काहीच नाही. मदयतीसारख्या परिस्थितीत वाढलेल्या कुणाहि तरुणीस नानासाहेबासारखा देखणा तरुण पाहिला असता, त्याच्याशीं अशा-प्रकारे निकट सहवास घडला असता, त्याबद्दल आकर्षण वाटणे ही गोष्ट अगदी स्वाभाविक होती. मदयतीच्या कपटीपणाचा जेव्हा तिला थोड थोडा संशय येऊ लागला, तेव्हा तर ही गोष्ट तिला अगदीच सामान्य वाटली. तिला आश्चर्यं एकाच गोष्टीचे वाटत होते की, मदयतींत इतका द्वेष, इतका कपटीपणा का असावा ? अगदी आरभापासूनच आपण तिच्यासाठी इतके केले असता तिने इतर कोठेहि न जाता, इतर काही न करिता दयेचे मन वळवून, मुद्दाम आपणास कोकणासारख्या ठिकाणीं कोंडून घेऊन, आप-ल्याच तोंडचा घास काढून घेण्याचा प्रयत्न का करावा ?

" आमच दोघाच खरोखरच परस्परावर प्रेम आहे. " या मदयतीच्या उद्गारात पूर्ण सत्य आहे, असें तिला वाटेना. मदयतीच्या एकदर वागण्या-वरून तिला कधी कधी असे वाटे की, या साऱ्या गोष्टी एकामागून एक मुद्दाम मदयतीने घडवून आणल्या असाव्यात, आणि या कपटनाटकाचे शेवटले भरतवाक्य " आमच दोघाच एकमेकावर खरच प्रेम आहे. " हे असावें.

असा विचार करीत असता 'मदयंतीच्या साऱ्या वागण्याच्या मुळाशी आपल्याबद्दल द्वेष, आपल्याविषयी शत्रुबुद्धि असावी,' या सत्याचा प्रकाश एक क्षणभरच तिच्या मनात पडल्यासारखा झाला. पण विजेच्या लकाकी-प्रमाणे तो लगेच लुप्त झाला. तिच्या सरळ, उदार व परच्छंदानुवर्ती—खऱ्याखऱ्या दक्षिण मनाला हे पटेना. कितीहि ताणताणून विचार केला असताहि मदयंतीने आपला एवढा दीर्घ द्वेष, आपणाविषयी या प्रकारची शत्रुबुद्धि का ठेवावी याचे कारण तिला उमगेना. आणि कोणतीहि स्त्री इतकी कपटनाटकी असू शकते, याची तिला कल्पनाहि करिता येईना. यामुळे इतके विचार मनात आले असताहि तिच्या मनाने असेच घेतले की, आपल्या-विषयी निष्कारण शत्रुबुद्धि ठेवून एवढे मोठे कपटनाटक करण्याजोगी मद-यंती नाही. ती मूर्ख, अशिक्षित, स्वार्थसाधु पण त्याचबरोबर प्रामाणिक, आणि आत एक, बाहेर एक असे न ठेवणारी स्त्री असावी.

दमयंती विचार करी– 'काही असल तरी आमच दोघाच परस्परावर खरच प्रेम आहे' असे तिने आपणास स्पष्टपणे सांगितले नाही का? ते सांगण्याची तिची तऱ्हा कदाचित निराळी असेल. पण तशी ती साऱ्याच बाबतींत निराळी आहे. पण तिने हे आपणास सांगून टाकावे यात कप-टाचा अंश कसा असेल?

तरीहि दयेसारख्या– या प्रेमाचे वारेहि नसलेल्या– मुलीला या गोष्टी तिने सांगाव्या, आपला स्वार्थ साधण्यास तिच्यासारख्या मुलीचा उपयोग करून घ्यावा आणि तिचे मनःस्वास्थ्य याप्रमाणे नाहीसे करावे, हें मात्र तिला अक्षम्य वाटत होते.

पण—– पण नानासाहेबास जर खरेच तिजबद्दल काही वाटत असले, त्यानी 'मी वचनबध्द आहे' म्हणून आपली असहाय्य स्थिति जर तिच्याजवळ व्यक्त केली असली, आपणास कसे टाळावे याबद्दलची नाना-साहेबाची असमर्थता जर तिला पटली असली, तर मात्र या साऱ्या गोष्टींचा उलगडा होण्यासारखा आहे. आपल्या प्रियकराला संकटातून सोड-विण्यासाठी कोणती तरुणी हवे ते साहस करण्यास तयार होणार नाही? तेव्हा या साऱ्याचे मूळ कारण हेच असलें पाहिजे.

पण नानासाहेबांनी अशी प्रतारणा आपल्याशी का करावी ? ते जाणून बुजून तसे करतील हे तिला शक्यच वाटत नव्हते. पण आपण त्यांचे समाधान करू शकत नाही, आपणास त्यांजबद्दल विलक्षण प्रेम वाटत नाही, असे त्यांना वाटत होते ना ? अनेक वेळ त्यांनी आपणाजवळ तसे ते व्यक्त नव्हते का केले ? मग आपल्यात जे त्यांना दिसले नाही, ते जर त्यांना मदयन्तीत सापडले असेल, निदान तिच्यात ते आहे, असे त्यांच्या मनाने घेतले असेल, तर मग त्यांचे आजकालचे औदासीन्य स्वाभाविक नाही का ? 'दमयंती, माझ्याबद्दल भलतीच खात्री बाळगू नकोस ' असे ते आपणास म्हणाले नव्हते का ? मग त्यांच्याकडे तरी काय दोष ?

नानासाहेब मदयन्तीशी विवाह करतील यावर तर दमयंतीचा विश्वासच बसत नव्हता. ते तिला उघड उघड असत्य दिसत होते. स्वतःच्या घराण्याच्या त्यांच्या उच्च कल्पना तिला चांगल्या माहीत होत्या. आपणाशी देखील ते लग्न करण्यास कसे तयार झाले, हे लोकांना व कधी कधी आपणासहि नवलच वाटे. तेव्हा ते मदयन्तीशी लग्न करतील ही गोष्ट अशक्यच होती. पण त्याचप्रमाणे मदयन्तीबद्दल इतके वाटत असता ते दुसऱ्या कोणाशी, निदान आपल्याशी तरी, लग्न करतील असेहि तिला वाटत नव्हते. आणि समजा, ते असे विवाहबद्ध होण्यास तयार झाले, तर त्यांचे मन आपणास ठाऊक असता आपण त्यांच्या गळ्यात लोढणे बनून राहावे, हे तरी योग्य आणि इष्ट आहे का ? अयोग्य, अनिष्ट आणि अशक्य. तेव्हा आपल्या विवाहाच्या मनच्या कल्पना मृगजळवत् ठरल्या, याबद्दल तिची खात्री झाली.

नानासाहेबांविषयी याप्रमाणे विचार करता करता ती स्वतःवर आली. तिला स्वतःला नानासाहेबांबद्दल काय वाटते हे तिला सांगता येत नव्हते. एखादा आघात, भयंकर आघात— व्हावा व त्यामुळे मन सुन्न होऊन जावे, अशी स्वतःविषयी विचार करताना तिची स्थिति होत असे. आपणास दुःख, फार मोठे दुःख झाले आहे, एवढी एकच जाणीव सामान्यतः तिला झाली होती.

आपल्या आयुष्यात नानासाहेब किती आवश्यक झाले होते ! त्यात नानासाहेब नाहीत ही कल्पनाहि कधी आपणास शिवली नव्हती. आपण

प्रसंगी त्यांच्या घराशी एकजीव झाले होते त्यांचे दुःख ते आपले दुःख, त्यांचे सुख ते आपले सुख अशी आपली समजूत होती. आणि आता ? नानासाहेबांपासून दूर राहून आयुष्य घालवायचे ? ही कल्पनाच असह्य होती.

या प्रकारच्या मनःस्थितीत दमयंती मुंबईस आली होती. नानासाहेब एकटे आले म्हणजे ताजमहाल हॉटेलात उतरत. तिने मॅनेजरला फोन करून विचारले. नानासाहेब खालीच होते. तिने त्यांना फोनशी बोलावले.

“हलो, नमस्कार. कोण नानासाहेब ?”

“होय. मी दमयंती.”

“का ? एवढं आश्चर्य ?”

“येऊ नये का मी मुंबईला ? त्या प्रकरणात रत्नपूरला आपणा साऱ्यानाच नव्हतं का कोंडल्या कोंडल्यासारखं झालं ? दयेची व्यवस्था झाली आहे. मागे मदयंती तिच्याजवळ आहे. आणि मला तुमच्याशी काही महत्त्वाचं बोलायचं आहे.”

“पण तुम्ही तसं कळविलं नव्हतं हे एक. आणि मला जे काय बोलायचं आहे ते रत्नपूरला जमलं नसतं हे दुसरं कारण. मग तुम्ही इकडे केव्हा येता ?”

“ठीक. मी वाटच पाहात आहे. नमस्कार.”

नानासाहेबांच्या स्वरात दमयंतीला आश्चर्य, राग, तुटकपणा वाटला. ती नानासाहेबांची वाट पाहात बसली. याच दिवाणखान्यात, आपले सुख प्रथम दुरावू लागल्याची रात्र तिला आठवली. नानासाहेबांचे येणं म्हणजे दमयंतीला काही नवी गोष्ट नव्हती. वर्षांच्या वर्षं ते जवळ जवळ रोज भेटत होते. नानासाहेब आपलेच आहेत हे तिने किती निश्चितपणे गृहीत धरले होते ! पण आज सारे बदललेले. आज नानासाहेबांची भेट म्हणजे तिला एक भयंकर दिव्य वाटत होते.

नानासाहेबांविषयी आपणास काय वाटते हे अजूनही ती आपल्या मनाशी निश्चित ठरवू शकली नव्हती. तिला कळत होतं ते एवढेच की, आज तिचे नानासाहेबांबद्दलचे विचार आजपर्यंतच्या विचारांपेक्षा निराळे होते. ते आनंदाचे नव्हते, सुखाचे नव्हते.

दमयंती या मनःस्थितींत असतानाच नानासाहेब तेथें आले.

"कस काय ? काय सांगायच आहे ?" ते येताच त्यानी सरळ प्रश्न केला.

तिला इतके वाईट वाटत होते की, ती गोष्ट टाळून ती दुसऱ्याच गोष्टी बोलू लागली. 'यावेळीं प्रवासात फारच त्रास झाला.' 'आज थोड डोक दुखत आहे.' 'बसा ना.' 'सांगते की तुम्हाला थोड्या वेळान' इत्यादि इत्यादि.

दमयंती अशा काही विलक्षण नजरेन नानासाहेबाकडे पाहात होती की, त्याना तिच्यासमोर बसवेना. ते समजले की, हे प्रकरण काही निराळे आहे ते दूर खिडकीशीं जाऊन उभे राहिले ते थोडे रागातच होते ते येताच ही गोष्ट दमयंतीच्या ध्यानात आली होती

थोड्या वेळाने पुन्हा तिच्याकडे पाहून ते म्हणाले-- "सांग ना मग, काय सांगायच ते."

जे काय सांगावयाचे आहे ते किती कठिण आहे हे सुचविण्यासारखी तिची मान हलली.

नेहमीचे नानासाहेब. पण आज दमयंती त्यांच्याकडे ज्या उत्सुकतेने पाहात होती ती नवीनच होती. आज तिच्या डोळ्यांस जे दिसत होत ते अननुभूत होते. नानासाहेब आज किती निराळे तिला दिसत होते ! त्याचे बोलणे, त्याचे पाहाणें, त्याचा चेहरा, त्याची दृष्टि, आज दमयंतीला त्याचे सारेंच नवीन दिसत होते. आणि त्याचबरोबर तिला हेहि कळत होते की, या साऱ्या गोष्टींचे कारण नानासाहेबात काही नावीन्य आल आहे, हे नसून आपणात आलेलें नावीन्यच याला कारण आहे.

नानासाहेब आजच्यासारखे तिला कधीच दिसले नाहीत. त्याचा रुबाबदार चेहरा, ते किंचित् अणकुचीदार नाक, तें भव्य कपाळ, ते तीक्ष्ण घारे डोळे-- सारेच आज दमयंतीला निराळे दिसत होते. एकी वेळी त्याच्या डोळ्यातून दिसणाऱ्या आढ्यतेचे तिला हसू येत होते. पण आज तीच त्याचा स्वाभिमान सूचित करतेसें तिला वाटलें. त्याचे घट्ट मिटलेले ओठ

त्याच्या खोल मनाचे सूचक तिला वाटत असत, पण आज त्याच्यात आणखी-हि काही जादू आहे असे तिला वाटले.

या निराळ्या दृष्टीने जेव्हा ती नानासाहेबाकडे पाहात होती त्याच वेळीं तिची अंतर्दृष्टि तिच्या स्वतःच्या हृदयाकडे पाहात होती. त्याना पाहून वाटणारा आनंद, ते आपले असावेत– अगदी आपले असावेत– अशी झालेली अनावर इच्छा, जेव्हा तिला आपल्या अंतःकरणात दिसून आली, तेव्हा ती क्षणभरच का होईना, दचकली. तिने आपली दृष्टि नानासाहेबावरून दूर केली मदयंतीला अशीच निराशा वाटली असेल हे आज तिला समजले. या तरुणावर प्रेम करणे किती विलक्षण आहे, आणि हा आपल्या हातून सुटून जाणे किती दुःखदायक आहे याची खरी जाणीव आता तिला झाली. ती निश्चल, निःस्तब्ध, मूक राहिली.

" दमयंती, सांग ना काय झालं ते. "

नानासाहेबाचा स्वर थोडा मृदु झाला आहे, असे दमयंतीस वाटले. तिने अस्वाभाविक शांततेने उत्तर दिले–– " नाना, आता मला कळलच पाहिजे सार. आता अशा स्थितींत एक दिवसहि जाण शक्य नाही. मदयंतीबद्दलच मला सार समजलच पाहिजे. "

नानासाहेबाना हे ऐकून बसलेला आश्चर्याचा धक्का इतका स्वाभाविक दिसला की, ' मदयंती खोटं तर बोलली नाही ना ? ' अशी शंका दमयंती-ला आल्याविना राहिली नाही. नानासाहेबाना आश्चर्य वाटले होते आपली कल्पना किती चुकली होती याचे. मदयंती मौन धारण करील, तिच्या तोंडून एक अवाक्षरहि बाहेर पडणार नाही, यावर आपला केवढा प्रचण्ड विश्वास होता आणि तो अशा रीतीने ढासळावा या आश्चर्याचा नाना-साहेबाना धक्का बसला होता. दमयंती मात्र निराळे समजली. ती म्हणाली– " जर मला कळल ते चुकीच असल तर क्षमा करा. पण मदयंतीन मला तस सांगितल–– दयेलाहि तसच सांगितल. "

" काय ? सांगितल, सांगितल काय ? "

" ते शब्दात सांगण हास्यास्पद आहे. ती म्हणाली की, तुम्हाला तिच्या-बद्दल काही वाटत म्हणून. "

त्रासिक स्वरात नानासाहेब मध्येच उद्गारले--“ काही वाटतं असमोत्रम नको ती काय म्हणाली, तिचे- अगदी तिचे शब्द- मला कळले पाहिजेत.”

दमयंतीच्या मनाने पुरे घेतले की काही तरी आहे, मदयंती खोटे बोलली नाही. ती आता स्पष्टपणे म्हणाली, “ मदयंती सागत होती की, तुम्ही तिला नावेत नेल, तिला जवळ घेतली- ( पुढची गोष्ट तिच्या तोंडून निघाली नाही ) आणि म्हटल- ‘ मी वचन बद्ध आहे ’ म्हणून ”

“ आणि हे सार तिन तुला आणि दयेलाहि सांगितल ? ”

“ हो. ” खेदपूर्वक स्मित करीत दमयंती म्हणाली, “ दयेच्या मतान आता मी रत्नपूरला राहू नये. ”

नानासाहेबाच्या मनावर अजूनहि आश्चर्याचाच पगडा होता. मदयंती आपणाला असे खेळवील व आपणावरच डाव उलटवील याची त्याना स्वप्नातहि कल्पना आली नव्हती.

नानासाहेबाची ही ‘ आश्चर्यकारक स्थिति ’ स्थिति पाहून दमयंती दचकलीच. समोरूनच कोणी घोडा मारला असे वाटल्याबरोबर जसे आपण त्याला चुकविण्याचा प्रयत्न करतो तसे ती करू लागली. तिचे अबद्ध विचार मोडक्या-तोडक्या व तोकड्या शब्दात बाहेर पडू लागले- “ मला हे सागण भागच पडल. रत्नपूरला आम्ही दोघींनी-- एकीन कोणी तरी-- गेलच पाहिजे आता--”

नानासाहेब मध्येच एकदम म्हणाले--“ तुला हे सार सहज आणि सोप असल्यासारख वाटत ना ? तुला यात काही विशेष वाटतस दिसत नाही. होय ना ? ”

“ कस सागू मी ? ” दमयंती थडपणे म्हणाली-- “ तुमच्या मनाला काय वाटत हे माहीत नसताना, काय- सागू तरी काय मी ? ”

एका चमत्कारिक स्वरात नानासाहेब म्हणाले, “ तुला माहीत नाही ? नाही ना माहीत तुला ? ”

आपल्या मनात काय वणवा पेटला आहे याची अंधुक कल्पना जर नानासाहेबाना आली, तर खरा निश्चय करताना ते कचरतील म्हणून विलक्षण आत्मसंयमन करून, चेहऱ्यावर काहीहि न दिसण्याचा प्रयत्न दमयंती

करून करीत होती, व त्यामुळे तिचा चेहरा पूर्णपणे निर्विकार दिसत होता. तिने नुसती मान हलविली.

तिचा निर्विकारपणा— जे काही होत आहे या विषयी पुरी बेफिकीर वृत्ति पाहून इकडे नानासाहेबांना वाटले की, हिला आपणाविषयी काही वाटत नाही, याबद्दल या निर्विकारतेपेक्षा आणखी कोणता पुरावा पाहिजे? जे काय झाले याबद्दल जबाबदार कोण? आपण नको नको म्हणत असता हिने मदयतीला आपल्याकडे आणावे, तिला आपल्याबरोबर एकटे न्यायला लावावे आणि मग चुकून झालेल्या एवढ्याशा चुकीचे, आपल्या तोंडून निघालेल्या अर्धवट शब्दाचे एवढे रामायण करावे, आणि वर "सुरू खुरू नकट गुरू" या न्यायाने थंडपणे आपणापुढे असा प्रश्न टाकावा, या साऱ्याचा अर्थ एकच, हिला आपल्याबद्दल यत्किंचित् काही वाटत नाही, हाच.

यामुळे अत्यंत त्रासिक व कटु स्वरात नानासाहेब म्हणाले—" त्याबद्दल बोलण्याचं काही कारणच दिसत नाही. तू मला हा प्रश्न विचारावास हे मला तरी कससच वाटत."

दमयंती अगदी नेहमीचा स्वर कायम ठेवून म्हणाली, "पण खरं काय आहे हे मला समजायला नको का? ते मला समजलच पाहिजे."

"काय समजलं पाहिजे? मदयंती म्हणाली ते?"

"होय"

"मला वाटत त्याला आता फारस महत्त्व नाही. तुला उघड उघड माझा कंटाळा आलेला दिसतो. आपण त्यातून सुटावं यासाठी तू खरोखर चांगला मार्ग शोधून काढला आहेस, असं मला वाटत."

नानासाहेब निराश होऊन बोलत होते. पण दमयंतीला वाटले की, ते आपणाला मार्गच सुचवीत आहेत. उगाच विशेष गाजावाजा न करता गुण्यागोविंदाने आपण त्यांना वचनमुक्त करावे व त्याचे खापर त्याच्या माथी फोडू नये, असा नानासाहेबांचा हेतु तिला मनापासून वाटला व त्यामुळे अगदी मनःपूर्वक वाटेल अशा रीतीने ती म्हणाली— "नाना, माझ्या बंधनातून मी तुम्हाला पूर्णपणे मुक्त करते. मदयंतीची ही भानगड उपस्थित झाली नसती तरी तुम्हाला असं सांगावं, असं बऱ्याच दिवसांपासून मला वाटत

होत. माझीहि इच्छा एवढीच आहे की, आपण उगाच याबद्दल आता भांडत बसू नये."

"ठीक आहे. भांडणाची तुला काय आवश्यकता? नाही का? खर आहे. मला वाटत तुझ म्हणण बरोबर आहे. आपण हा सारा खेळ गाजावाजा न करता पुरा करू. पण त्यापूर्वी एकदा आपणाला थोड्या दिवसासाठी दयेसाठी तरी, रत्नपूरला गेलच पाहिजे."

तिने नेहमीच्या आपल्या आज्ञाधारक वृत्तीने उत्तर दिलें— "हो मी परत रत्नपूरला जाईन आणि साऱ्या गोष्टी व्यवस्थितपणे पार पाडण्याचा प्रयत्न करीन."

आपण काय बोलतो आहोत याचे आता दमयतीला भानच नव्हते. आपण काय करतो आहोत, याबद्दलहि तिला काही वाटेनासे झाले होते तिला जे काय वाटत होते ते कुठल्या–कोणत्याहि शब्दाच्या पलीकडचे होते. प्रेमाची दुसरी बाजू– सुखसभोगाची व आनदाची नव्हे, तर वियोगाची व दुःखाची– आज तिला दिसत होती. प्रेमवासना किती त्रासदायक असते हे मदयतीच्या आड येण्याने तिला आज कळून आले होते. विलक्षण प्रेम करणे काय असते, याची तिला आज कल्पना आली होती. नाना साहेबामुळे आजवर आपण दुःखापासून दूर राहिलो, पण आता आपण केवढ्या सुखाला मुकणार आहोत याची जाणीव आज तिला झाली होती. पण आता काय? घर जळून गेल्यावर विहीर खणून तरी काय होणार? ती अगदी शात बसली होती.

आणि तिला अशी निर्विकार, शात पाहून ही अतर्बाह्य अशीच थड, शात, निर्विकार, हृदयहीन, प्रेमशून्य आहे असे नानासाहेबांना वाटले.

तरीहि थोडा वेळ ते तेथे घोटाळलेच. आता ते पूर्णपणे निराश झाले होते त्याना रागहि आला होता. या स्त्रीसाठी आपण किती त्रास सोसला, (शातपणे त्रास सोसणे हा पुरुषधर्म नव्हेच!) आणि त्या साऱ्याचा परिणाम हा! बरें झाले, आपण हिच्याजवळ काही विशेष गोष्टींची याचना केली नाही. किती टाळाटाळी? वडलाचा मृत्यु, दयेचा आजार, कशीतरी कबुली आणि शेवटी ही बेपर्वाई. व्यर्थ, व्यर्थ आपण आशा करीत राहिलो

की, आपण जसे हिच्यावर प्रेम करीत होतो तसे हीहि एके दिवशीं आपणावर करील म्हणून पण आपलीच चूक. इतका अनुभव घेण्याची आवश्यकताच नव्हती. जे काय होते ते उघड उघड दिसत होते.

ते शेवटीं खिन्नपणे हसले व दाराशीं जाऊन म्हणाले, " बर आहे. येता मी "

दमयंतीच्या मुखातून एकही अक्षर निघेना ती गप्पच. आणि आपण जाऊ लागलो असताही दमयंती गप्प आहे हे पाहून नानासाहेब पूर्णपणे निराश झाले बाहेर जाऊन त्यांनी हळूच दार लोटून घेतले.

नानासाहेब गेले –

---

# १४

नानासाहेब गेले.––

ते जाईपर्यंत दमयंतीने विलक्षण आत्मसंयमन करून दडपून ठेविलेल्या सार्‍या भावना, वासना, कल्पना याचा एकदम स्फोट झाला. ती भयंकर अस्वस्थ झाली. तिला तेथे एक क्षणभरहि बसणे अशक्य झाले. बाहेर भयंकर उकाडा होत होता. शरदृतूचे ऊन्ह भी म्हणत होते. पण चपला घालून व छत्री घेऊन त्या उन्हाचा विचार न करता ती बाहेर पडली.

दमयंती घराबाहेर पडली खरी, पण जायचे कोठे ? ओळखीच्या कुणाहि माणसाकडे जाण्यासारखी तिची मनःस्थिति नव्हती किंबहुना ती कोठे जात होती, हें तिचे तिलाच माहीत नव्हते. खरे म्हणजे तिचे पाय नेतील तिकडे ती जात होती.

तिचे पाय समुद्राकडे वळले बाजूच्या पायमार्गावर टाकलेल्या एका बाकावर ती बसली दुपारची तीन वाजायची वेळ. कोण असणार तेव्हा तिथे ? पण तिला कोणाशी काय करावयाचे होते ? आपल्या लहानशा छत्रीने उन्हापासून स्वतःचे रक्षण करीत ती बाकावर बसली होती. ओहोटी सुरु होऊन बराच वेळ झाला होता पुढचे वाळवट कोरडे पडले होते व भरतीच्या लाटाबरोबर वाहून आलेली घाण इतस्ततः पडलेली दिसत होती.

तिचे हृदयहि आज भरती जाऊन कोरडे झालेल्या वाळवटासारखेंच होते. तेथे या क्षणी जलवीची नृत्य करीत नव्हत्या. आमच्या शुद्ध जलक्रीडेत तुमचा व्यत्यय नको म्हणून पृष्ठभागावर तरंगणाऱ्या प्रत्येक वस्तूस त्या किनाऱ्यावर फेकीत नव्हत्या. तू जितकी पुढे गेलीस त्याहूनहि मी थोडी पुढे जाईन या अहमहमिकेने लाटेमागून लाट उसळत येत नव्हती. त्यातून आज सारे सुख ओसरून गेले होते उरले होते ते दुःख. एकाकाळी सुख देणाऱ्या पण आज दुःख वाढविणाऱ्या त्या सुखाच्या आठवणी. तिच्याने तेथे बसवेना. ती उठली व ते ओले-सुके घाण वाळवट तुडवीत समुद्राच्या काठा काठाने चालू लागली.

वाळवटाचा काठ सपला. आता, बांधलेला कृत्रिम धक्का व त्यावरच्या भव्य भव्य हवेल्या. ती बाजूस वळून शहरात शिरली ती निरनिराळीं दुकाने, त्या मांडलेल्या निर्जीव पुतळ्या, त्या साऱ्या भपक्याच्या वस्तू त्याच्याकडे पाहात व मनात विचार करीत भटकता भटकता ती पुन्हा कोटातून समुद्रकाठी वळली व 'भारत-द्वारा'च्या बाजून ताजमहाल हॉटेलाशी येऊन पोचली. हॉटेलाच्या दारासमोरील पाणी शिंपून व ताडाच्या कुंड्या दोन्ही बाजूस ठेवून केलेली ती स्वच्छ पायवाट, ते नीटस पोशाक केलेले नोकर, ती लोकांची ये-जा,— नानासाहेबहि कदाचित् एकादे वेळेस आत जाताना किंवा बाहेर येताना दिसावयाचे ! ती सडकेच्या दुसऱ्या बाजून किंचित् बाजूला जाऊन उभी राहिली, नानासाहेब ओझरते तरी दिसतील या आशेने

कोणत्या दशेला दमयंती आज पोचली होती ! तिच्या हृदयात निराशा थैमान घालीत होती. जो तरुण इतकीं वर्षे तिच्या एका शब्दाने, तिच्या

नुसत्या इशाऱ्याने, पुढे येऊन उभा राहावयाचा, तो ओझरता तरी दिसावा म्हणून आज केवढी यातायात! बराच वेळ दमयंती उभी राहिली पण तिची इच्छा पुरी होईलसे दिसेना. शेवटी ती कंटाळली. बरेच तास एकसारखे चालून व उभे राहून ती अगदी दमली होती. शरीर जेवढा ताण सहन करू शकत होते तेवढा त्याने सहन केला होता. शेवटी अत्यंत श्रांत अशा स्थितीत ती घरी आली व जनाबाईस 'मला जेवावयाचं नाही, डोकं दुखत आहे' असे काहीतरी सांगून आपल्या खोलीत गेली व धाडदिशी बिछान्यावर पडली.

शरीराला थोडी विश्रांति मिळाली, पण मनाला? त्याचे भटकणे सुरूच होते. मागील चित्रे स्मृतिपटलावरून भराभर दृश्यादृश्य होत होती. आपण किती आनंदी होतो, केवढे सुखी होतो! पण त्या आनंदाने, त्या सुखानेच आपले डोळे बंद झाले होते. आपणास दिसेनासे झाले होते. बिचाऱ्या नानासाहेबांनी तरी किती वाट पाहावी? तो काळ, तो व्यर्थ गेलेला काळ, आज तिला भेवडावू लागला. नानासाहेब कधी कधी अस्वस्थ का दिसत, मदयंतीहि इतकी अधीर का होते, हे तिला आजच्या आपल्या अधीरपणावरून समजले. नुसत्या नानासाहेबांच्या दर्शनासाठी आज आपण इतक्या आतुर, मग त्यांचा स्पर्श, त्यांचे. ... आणि. ... आणि....
तिचे डोके सुन्न झाले.

बाहेर तिन्हीसांजा झाल्या होत्या. खोलीत अंधार पडू लागला होता. सांजवात लावायची वेळ झाली होती. दमयंती उठली. देवाजवळ गेली. जनाबाईने तयार करून ठेवलेले निरंजन तिने लावले, राधाकृष्णाला नमस्कार केला. पोथीवर कुंकू वाहून तेच बोट आपल्या कपाळावर टेकले व नेहमीच्या सवयीप्रमाणे 'शुभं करोति' तिच्या तोंडून बाहेर पडले.

ज्या संध्याकाळी या श्लोकाने व त्यावरून सुचलेल्या विचारांनी दमयंती व्यथित झाली होती, ती संध्याकाळ तिला आठवली. त्या दिवशी आपणाला कोणी शत्रु आहे काय, हीच शंका तिला आली होती. पण आज? शुभकल्याणाचीच मुळी शंका. तिला आपले गेलेले दिवस आठवू लागले. त्यावेळी तिच्याजवळ, अगदी तिच्या हातात ज्या गोष्टी होत्या, त्यांच्याकडे

तिने तेव्हा दुर्लक्ष केले. ते दुर्लक्ष अजाणपणे झाले असेल, पण त्या दुर्लक्ष्याचाच हा सारा परिणाम, हे तिला स्पष्ट वाटू लागले.

नावेत काय झाले असेल याचा देखावा तिच्या डोळ्यापुढे उभा राहिला, पण तो निराळ्या दृष्टिकोनातून. नानासाहेब व मदयती जवळजवळ उभी आहेत. जी गोष्ट आपणाजवळ तोपावेतो नव्हती, जी आपण नानासाहेबास देऊ शकलो नाही, ज्यामुळे त्याना कधी कधी अस्वस्थता येई, जिच्यासाठी त्यांचे अंतःकरण तडफडे, जिच्यापासून प्रेमाचे खरे सुख– शारीरिक सुखाची परम सीमा– प्राप्त होते, जिच्या लाभासाठी त्यानी इतकी वर्षे वाट पाहिली व जिच्यात सर्वस्व साठविलेले होते, ती गोष्ट जर त्याना मदयतीत दिसली असेल, निदान ती तिजजवळ आहे, असे वाटले असेल, आणि मग त्या प्रलोभनाने जर ते क्षणभर चळले असतील तर त्याचा दोषच काय? तान्हेने तडफडणाऱ्या माणसाला पाणी दिसले व मग जर त्या पाण्याने तोंड ओले करण्याचा त्याला मोह झाला, तर ते एवढे अक्षम्य आहे काय?

नानासाहेबानी मदयतीला जवळ, अगदी जवळ घेतले आहे, त्यांच्या बाहुपाशात ती अडकली आहे, आशाळभूत नजरेने ती त्यांच्याकडे व ते तिजकडे पाहात आहेत, दोघांची तोंडे एकमेकाजवळ येत आहेत— या कल्पनेनेच आज दमयंती अस्थिर झाली. मदयतीच्या ठिकाणी आपण आहोत, आपणहि एकमेकांच्या बाहुपाशात अडकलो आहोत, आपलीहि मुखे एकमेकाजवळ येत आहेत– पण छे, हे कुठले आता आपल्या नशिबी?

निरंजन विझत आले होते. ती उठली. तिने विजेचे बटन दाबले खोली लखख प्रकाशित झाली. वडलांच्या चित्राकडे तिने पाहिले. बाबा-साहेबांच्या—– 'बाळ चाललो मी. तुला काही कमी नाही. तू आणि नाना आता सुखाने संसार करा.' या शेवटल्या शब्दांची तिला आठवण झाली तिने चित्राला नमस्कार केला. आज आपणास काय कमी नाही? सारेच कमी. आता कुठला संसार व कुठले सुख? बाबासाहेबहि गेले व त्यानी स्वाधीन केलेले नानासाहेबहि आज आपणापासून 'बरं आहे. येतो मी.' असे म्हणून कायमचे निघून गेले.

ती पुन्हा देवाजवळ येऊन बसली. आज आपण पूर्णपणे आपल्या जीवितांचा डाव हरलो असे तिला कळून आले या पराजयाचा जय करणे आता प्रत्यक्ष परमेश्वराच्या तरी हाती आहे का? देवाकडे-- त्या गळ्यात गळा घातलेल्या राधाकृष्णाकडे- पाहून आज तिच्या मनात, आजपावेतो कधी न आलेले भलते भलतेच विचार येऊ लागले. तिने डोळे मिटले हात जोडले. नानासाहेब दुरावल्याच्या दु:खापेक्षाहि हे दु:ख, वासनाकडून आपला झालेला पराभव हा तिला अधिक जाणवला लहानपणापासून संयत आणि सुखी वृत्तीने, दुसऱ्याचे वाईट यत्किंचितहि न चिंतणाऱ्या आपल्या मनात आज या अशा विचारांनी आकांडतांडव करावे, हाच आपला खरा पराभव अशी तिची खात्री झाली

बाबासाहेबांनी तिच्याकडून गीता पाठ करवून घेतली होती कधी कधी ते गीतेचा भाग पाठहि तिजकडून करवीत आजहि तिला तसे करावेसे वाटले ती मंगलाचरणाचे श्लोक म्हणू लागली ते संपले व आरंभ झाला, "धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे." धर्मक्षेत्र शब्दावरून मनाने भरारी मारली. आपल्या हृदयाच्या धर्मक्षेत्राचे आज असेच झाले नाही का? नानासाहेबांचे मदयंतीवर प्रेम असेल तर त्यांच्या सुखाच्या आड न येण्याचा आपला सद्विचार आज 'प्रवृत्ते शस्त्रसंपाते' अर्जुनासारखाच बावरला नाही का? माझे सुख, या माझ्या आशा, या माझ्या आकांक्षा-- या साऱ्यांना कसे मारू, हीच शंका त्या सद्विचारापुढे आज उभी राहिली नाही का? आणि यामुळेच आपण मोहित झालो नाही का? पाठ असलेले गीतेचे श्लोक म्हणत असता व मनाने हे तुलनात्मक विचार चालले असता 'यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे' (२-७) हा श्लोक म्हणताना ती इतकी तल्लीन झाली की, तिच्या तोंडून पुढचा चरण 'शिष्या तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नाम्' या स्वरूपात बाहेर पडला.

श्रीधराने शिवलीलामृताच्या चौदाव्या अध्यायात शिवपार्वतीच्या सारिपाट क्रीडेचे वर्णन केले आहे. खेळताना शंकर सारे हरवून बसतात व रागावून पार्वतीस सोडून निघून जातात. पुढे पार्वती त्यांना शोधीत फिरते. वने, अरण्ये, गिरिकंदरे, सारे शोध शोधून पार्वती दमते व भी शंकराला शोधन

काढीत हा तिचा अभिमान गळून 'वल्लभा, मी शरण तुते' असा उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडतो. अभिमान गळाला, मन अहंकाररहित झाले की, ईश्वरस्वरूप दिसावयास काही उशीर लागत नाही. तिला हिमालयाच्या एका शिखरावर शंकराचे दर्शन होते. गीतेचा पाठ करीत असता अशाच प्रकारची विचार-मालिका दमयंतीच्या मनात गुफली जात होती

आपल्या वडलानी मदयंतीच्या बाबतीत अन्याय केला. तो दूर करण्यासाठी आपण तिला जवळ केली, अगदी आपलीशी समजून तिची सारी व्यवस्था केली, लोक नको म्हणत असता तिला आपल्याजवळ ठेवली, नानासाहेबाच्या इच्छेविरुद्ध आपण तिला आपल्याबरोबर त्याच्या घरात नेली, नानासाहेबावर 'नाव दाखवा' म्हणून आपणच तो प्रसग आणावयाचा मूर्खपणा केला. हा आपला शहाणपणा की फाजील सज्जनपणाचा मूर्खपणा? 'किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः' (४-१६) हा श्लोक त्याच वेळीं तिच्या तोंडून निघाला व म्हणता म्हणता आपण चौथ्या अध्यायावर आलो हे तिला समजले.

मन स्वस्थ असता तोंडाने पाठ करणे सोपें असते. परतु मनात खळबळ माजली असता तोंडाने उच्चार होत असतो पण मन तर त्यात नसते अशा वेळी सचार फार त्रास देऊ लागतात. पुढचे मागे व मागचे पुढे असे होण्याचा सभव फार असतो. आज पुन्हा गीतेची आवृत्ति करण्याची तिला इच्छाच झाली होती. चुका होऊ नयेत म्हणून तिने पोथी उलगडली चौथा अध्याय काढला व 'कर्मणो ह्यपि बोद्धव्य' पासून वाचावयास आरभ केला. पोथी पुढे नसताना थोडे तरी मनास म्हणण्याकडे लक्ष द्यावे लागत होतें. आता तेवढेहि कारण उरलें नाही. पोथीवरून डोळे फिरू लागले, हाताकडून पाने उलटलीं जाऊ लागलीं व विचारचक्र अप्रतिहतपणे फिरू लागलें.

आपण इतके दिवस जीं तत्त्वे उराशीं बाळगलीं तीं वेडेपणाचींच का होती? बाबासाहेबानी जे आपणास धर्मशिक्षण दिलें तें सारे व्यर्थच का? दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होणें, परोपकार करणे, दुसऱ्याच्या सुखात माती न कालविणे, स्वार्थत्याग करणे हे सारे निरर्थकच की काय? लोक वेडे

म्हणत असताहि याच तत्त्वासाठी ना आपण या मार्गांचे अवलंबन केले? आणि आता या इंद्रियवासनाच्या सुखासाठी आपण महि लोकासारखेच वागू लागावें, नानासाहेब आपल्या हातचे गेले हे वाटताच मदयंतीबद्दल आपली शत्रुभावना व्हावी, याहून मोठा पराभव कोणता? मदयंती आपणास शत्रु का वाटावी— 'आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः' (६–५).

छे! ती आपली शत्रु नाहीच मुळी. बिचारीने किती दुःख सोसले! सकाळपासून संध्याकाळपर्यंत काबाडकष्ट. इतके करूनहि सारखी काळजी. आई त्या प्रकारची— आधळी आणि आजारी. त्या घाणींतले ते राहणें, ना कोठे जाणे ना येणे, ना शिक्षण ना वाचन, अशा दुःखात राहिलेल्या माणसास थोडे दिवस सुखात राहावयास मिळाले असता त्याची चित्तवृत्ति थोडी चंचल झाली तर आश्चर्य काय? माझ्यावर हे एवढेसें नानासाहेब दुरावल्याचे दुःख येऊन पडल्याबरोबर, माझे नाही का विचार बदलण्याच्या बेतात आले? हाच का मग माझा सदाचार? सुखात सारेच सदाचारी असतात. पण दुःखातहि सदाचार सोडणार नाहीत तेच श्रेष्ठ. मग दुराचारी कोण? ती का मी? विचाराची आगगाडी वेगाने धावतच होती. पण मध्येच पोथीत एक घडी घातलेला ल्हानसा कागद सापडल्यामुळे गाडी थाबली. असेल कोणींतरी खूण म्हणून ठेवलेला, म्हणून तो पोथीत दुसरीकडे तिने घालून ठेवला व गाडी

'अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्' (९–३०)

या श्लोकाकडून डोळे फिरत असता पुन्हा चालू झाली.

आपण नानासाहेबाच्या मार्गात येऊ नये, मदयंतीचा मार्ग आपण मोकळा करायलाच पाहिजे. आणि आपण तसं दयेजवळ कबूल नाही का केले? जे आपण नानासाहेबास देऊ शकलो नाही, जे आपण मदयंतीस दिले, दयेसाठी जे आपण सोसले, ते सारे जर या आपल्या स्वार्थाने दूषित झाले, मदयंतीस आपण दूर केले, नानासाहेबास पुन्हा जवळ केले— आणि हे करणे कठिण मुळीच नाही— तर आपण खरे सुखी होऊ, की या साऱ्यापासून दूर राहिल्याने, याना आपआपल्या सुखात दंग पाहून अधिक सुखी होऊ? आपल्या वासना कदाचित् अतृप्त राहतील, पण आजपावेतो यानी

कधी आपणास त्रास दिला नव्हता. मग आजच जर ह्या बेफाम होऊ लागल्या तर ?

मनियम्येद्रियग्राम सर्वत्र समबुद्धयः ( १२–४० )

टरलेच तर. आपण यान्यातून दूर झालेच पाहिजे नानासाहेबास आपण यत्किंचित् जवळ केलें तर ते मदयतीला दूर सारून आपणाकडे येतील. आज इतके दिवस त्यानी आपल्या इच्छेस मानून एका शब्दानेही आपणास न दुखविता आत्मसयमन केलें मग आता त्याच्या इच्छेस मान देऊन आपण नको का आत्मसयमन करायला ? आपण मदयतीस इतर प्रकाराने सुखात ठेवू शकू. आज जसे आपणास वाटले तसेंच वाटत राहिलें तर नानासाहेबासहि सुखी करू शकू. कदाचित् दयेचीहि आपणाविषयींची कल्पना बदलू शकेल मदयती सुदर आहे, तिला वाण तेवढी पैशाची ती आपण दूर करू शकतो. नानासाहेबास खरी आकांक्षा वैषयिक प्रेमाची, तीहि आपणास पुरी करता येईल. मदयतीचे लग्न दुसऱ्याशी होऊन तीहि सुखी होऊ शकेल. तिचे प्रेम काही उदात्त प्रेम नाही. नानासाहेब कदाचित् तिच्याशीं लग्न करणारहि नाहीत. थोड्याच दिवसात त्याना तिचा कटाळाहि येईल. नुसत्या इद्रिय-सुखावर उभारलेले प्रेम फार दिवस टिकू शकत नाही. हे सारे आपणास कळत आहे. आपण थोडें निराळे वागलो तर जे आपण गमावलेसे वाटत आहे तें सारें पुन्हा कमावता येईल. हे सारे आपणास अनायासे करता येणें शक्य आहे. पण हे सारें करावें काय ? हे सारे

असदित्युच्यते पार्थ नच तत्प्रेत्य नो इह ( १७–२८. )

पण हे सारेच कल्पनिक नाही का ? होईल, होणार, असे भविष्यकाळातील सभाव्य. पण वर्तमान, कटु वर्तमान काळ काय सागत आहे ? नानासाहेब व मदयती हल्ली तरी एकमेकावर प्रेम करीत आहेत ना ? दयेमहि आज त्याचेच लग्न इष्ट वाटत आहे ना ? मग आपले हे सारे विचार काय करायचे ? जे आहे ते असे आहे. तेव्हा आपण त्यातून वेगळे झालेंच पाहिजे. साऱ्याचा सग सोडलाच पाहिजे.

सर्वधर्मान्परित्यज्य मामेक शरण व्रज ( १८-६६ ).

दमयतीचा ठाम निश्चय झाला. सदसद्विवेक व सद्विचार याचे एकीकरण

झाले "यत्र योगेश्वर कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूति-र्ध्रुवा नीतिर्मतिर्मम. ।।" गीता सरली. दमयंतीने नमस्कार करून पोथी बांधून ठेवली. तिची तपस्या फळास आलेली दिसत होती. केलेल्या निश्चयाने व ताब्यात आल्यासारख्या वाटणाऱ्या मनाने तिचे चित्त प्रसन्न होते. तिने देवाला नमस्कार केला. बाबासाहेबांच्या चित्रापुढे हात जोडले व ती निजावयास गेली.

असल्या दुःखातून तावूनसुलाखून निघालेली दमयंती दुसऱ्या दिवसापासून पार बदलून गेली. तिचा वरवर ओसंडणारा, बहिरानंद जो अलीकडे कमी होऊ लागला होता, तो पार नाहीसा झाला. एकाद्या शांत, स्वानंदी योगिनीप्रमाणे ती दिसू लागली.

---

# १५

दमयंतीचा निरोप घेऊन नानासाहेब निघाले ते सरळ हॉटेलात गेले. एकटे बसावे तर मन क्षुब्ध. म्हणून, इतर मंडळीबरोबर हॉटेलातल्या दिवाणखान्यात ते जाऊन बसले. काही ओळखीची मंडळी होती व त्यांचे भोजनानंतरचे मद्यपान चालू होते. नानासाहेब असल्या समाजात फारसे मिसळत नसत. पण आज ते थोडेसे बेपर्वाच झालेले होते. त्यांनीहि एक दोन चषक घेतले व थोड्या वेळाने आपल्या खोलींत जाऊन आरामखुर्चीवर कलंडले. त्यांचा डोळा लागला. ते जागे झाले तेव्हा दिवे लागून गेले होते. त्यांनी ताट खोलींतच मागविले व जेवल्यावर पुन्हा आरामखुर्चीत विचार करीत पडले.

मदयंतीबद्दल त्यांच्या डोक्यांत फारसा विचार नव्हताच. तिजबद्दलची जिज्ञासा केव्हांच शांत झाली होती. तिच्या धीटपणानें, सौंदर्यानें, गांवढळ पण सडेतोड वागण्यानें, नानासाहेबांच्या स्वभावांतहि जो ग्राम्यपणा होता त्याला उत्तेजना मिळाली होती. नावेंतला प्रसंग संपल्यावर ती नानासाहेबांबरोबर कांहीं न बोलतां जेव्हां वाड्यांत आली तेव्हां तिच्याबद्दल नानासाहेबांस थोडा आदर वाटला. पण जेव्हां मागें फिरल्याबरोबर तिनें दमयंतीजवळ व दयेजवळ ती गोष्ट सांगितली, तेव्हां मात्र त्यांना ती अगदींच साधारण पण्यस्त्रीसारखी भासली. नानासाहेबांच्या ओळखींत अशा पांच-चार तरी स्त्रिया सहज होत्या. धीटपणा व सौंदर्य बऱ्याच ठिकाणीं सांपडतें. नुसते एवढेच गुण असलेल्या स्त्रिया नानासाहेबांसहि सांपडणें सुलभ होतें. आपल्या सभ्यपणाच्या, शिष्टाचाराच्या कल्पनामुळें नानासाहेब मदयंतीच्या बाबतींत यापुढें जाणें शक्यहि नव्हतें. आणि या सार्‍या कारणामुळें मदयंती त्यांच्या विचारांत क्वचितच येई.

मदयंतीबद्दल ते पूर्णपणें उदासीन होते. जसें तिजबद्दल त्यांना कांहीं वाटतहि नसे तसाच तिचा रागहि पण त्यांस येत नसे. दयेसाठीं म्हणून तिला कांहीं दिवस घरांत ठेवणें आवश्यक होतें. ते तिची भेट घेणें टाळूं शकत होते. ती आपल्या पायावर उभी राहण्यास समर्थ आहे याबद्दल त्यांची पूर्ण खात्री होती. तिला लागणारा पैसा दमयंती तिला पुरवूं शकेल. पुढें मागें कोणीतरी तिच्या सौंदर्यावर लुब्ध होऊन तिच्याशीं लग्न करील. आपणांस आतांपावेतों जो त्रास झाला याहून ती जास्त त्रास देऊं शकेल असें त्यांच्या पुरुषी व हुकमी स्वभावास कधीं वाटलें नाहीं, आणि त्यामुळें जगांतील इतर गोष्टींकडे जसे ते बेफिकीरपणें पाहात, त्याच बेफिकीरपणानें ते मदयंतीकडे पाहात असत.

नानासाहेब आधुनिक काय ते जन्मानेंच. त्यांचा खाक्या सारा जुन्या सरदारी थाटाचा. प्राचीन पूर्वजांच्या पराक्रमाविषयीं पराकाष्ठेचा अभिमान, सरदारकीच्या फोल डामडौलाच्या कल्पना, खालच्या समजल्या जाणाऱ्या लोकांबद्दल तिरस्कार व अनादर, स्वतःबद्दलचा मिथ्या अहंकार इत्यादि गोष्टी त्यांच्यांतून पूर्णपणें गेलेल्या नव्हत्या. पैशाच्या योगानें जगाशीं फटकून

व दमयतीच्या योगाने जगाशी जुळून ते वागत. पण आता दमयतीच्या या त्याना वाटणाऱ्या मूर्खपणाने त्याना आपल्या जीवनाचाच कटाळा आला. स्वतःचे स्वभावदोष आणि दयेची काळजी यातच या कटाळ्याची भर पडली व त्याना सारे जग निःसार वाटू लागले.

त्याच्या साऱ्या दोषाचे दमयती म्हणजे एक पाघरूण होते. ती बरोबर असताना तिच्या आनदी व खेळकर वृत्तीने, तिच्या उदार स्वभावाने, त्याचे दोष सहज झाकून जात. आपल्या बुद्धिवैभवाने तिने त्याचे मन आधीच आकृष्ट केले होते, आणि थोड्या दिवसापूर्वी विवाहाचे वचन तिजकडून मिळाल्यामुळे नानासाहेबास आपल्या जीवनात नवचैतन्य सापडल्यासारखे वाटत होते. तिने ज्या वासना त्याच्या मनात उत्पन्न केल्या, त्या आज नाही उद्या, आपण तिच्या मनात उत्पन्न करू आणि नतर दोघेहि परिपूर्ण सुखात कालक्रमणा करू हेच अलीकडे त्याचे ध्येय झालेले होते.

पण ते ध्येय शेवटी मृगजळच ठरले. वासनात्मक अनुराग दमयतीत मूळचाच कमी. तिच्या आनदी, खेळकर वृत्तीने मात्र ती नानासाहेबास हवीशी वाटे. पण अलीकडे तो खेळकरपणाहि नाहीसा झाला होता. मदयती आल्यापासून ती आपणाविषयी थड होत चालली होती व शेवटी ज्या थड निर्विकार मनाने तिने नानासाहेबाना शेवटचा निरोप दिला, तो तर काही औरच होता. इतक्या दिवसाच्या परिचयाने परिणत झालेला विश्वास पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे मदयतीच्या एका फुकराने फुटावा याचेच त्याना फार वाईट वाटले.

त्याची ही विचार-मालिका कदाचित् आणखी पुढे चालू राहिली असती· पण तितक्यात हॉटेलचा शिपाई एका तबकात एक तार घेऊन त्याजकडे आला. नानासाहेबानी तार घेतली, पावतीच्या कागदावर सही करून दिली व तार फोडली. तार रत्नपूरहून आली होती. तेथील कारकुनाने ती केली होती " दयाबाई बेचैन. ताबडतोब यावे. " एवढाच मजकूर तारेत होता. तार वाचताच नानासाहेबाच्या विचाराची गाडी दुसऱ्या रूळावरून धावू लागली. दयेला एकटीला सोडून दमयतीने इकडे यावयासच नको होते. याबद्दल दमयतीचा त्याना थोडा रागहि आला. त्यानी दुसऱ्या दिवशी

सकाळींच ती तार दमयंतीकडे पाठवून दिली. त्याची कल्पना होती की, तार पाहून दमयंतीहि आपणाबरोबर रत्नपूरला येईल. पण तसे काही झाले नाही. नानासाहेब एकटेच रत्नपूरला आले.

आल्याबरोबर ते दयेजवळ गेले. "का ग ? काही जास्त होत आहे का ? तारशी करवलीस ?"

"मग काय करू ?" दया म्हणाली, "मला तुम्ही सार्‍यांनी इथे असावंस वाटत. मला एकटीला अगदीच कंटाळा येतो. तुम्ही इथे नव्हताच जीजीहि निघून गेली. आणि मदयंतीबाई दोन दिवसापासून बाहेरच फिरताहेत."

मदयंतीच्या या दुर्लक्ष्य करण्याचा नानासाहेबास राग आला आणि त्या-बरोबर दमयंतीचाहि. या मदयंतीवर दयेला सोपवून तिने निघून जावे ना ? मदयंतीशी आता मऊ वागून चालावयाचे नाही ते जरा रागानेच म्हणाले, "का ? मदयंतीबाई बाहेरशा फिरतात ? तुला काही अधिक तर होत नाही ना ? डॉक्टरला घेऊन यायला दमयंतीला तार करू का ?"

"नको नको. डॉक्टरला तार बिर काही नको मदयंतीबाईंना त्यांच्या आईने कसल्याशा एका मुळीबद्दल मागितल होत. ती शोधायला त्या दिवस-भर बाहेर डोंगरात हिंडताहेत. ती मिळाली तर सात दिवसात मी बरी होईन असं त्यांच म्हणणं आहे."

मदयंतीचे हे नवीन खूळ काय, म्हणून नानासाहेबाचा राग थोडा आणखीच वर चढला.

"पण नाना, जीजीन तुम्हाला--"

"हो सारं सांगितलं. ते सारं आता संपलं आहे."

दयेची प्रकृति नानासाहेबाना ठीक दिसली नाही. या नवीन मुळीच्या आशेने थोडाफार तजेला जरी तिच्या चेहर्‍यावर वाटला तरी आपण गेल्या-पासून ही चांगलीच खंगली आहे, हे नानासाहेबान्या लक्षात आले तिला न सांगता।हि डॉक्टरला घेऊन येण्यासाठी दमयंतीला तार केलीच पाहिजे असे त्यांनी मनाशी ठरविले.

नानासाहेबाना रोगी माणसाजवळ बसण्याची सवय नव्हती. दयेची

काळजी जरी ते पूर्णपणे वाहात होते तरी तिच्याजवळ बसण्याचे काम परिचारिका किंवा दमयंती आणि अलिकडे मदयंती यांजकडेच असे. त्यामुळे तेथे बसून थोड्याच वेळात ते कंटाळले आणि दयेचा डोळा लागला आहे असे पाहून ते त्याशी आले पाहतात तो जिन्याच्या पायथ्याशीच मदयंती उभी

मदयंतीची सुंदर मुद्रा बदललेली दिसत होती. काही अपराध करावा व शिक्षेची वाट पाहात असावे, अशी तिची मुद्रा होती. तिला पाहाताच नानासाहेब कठोरपणे म्हणाले—" फार चांगला गोंधळ केलात तुम्ही, मदयंतीबाई ! गप्प राहाणं तुम्हाला अगदी अशक्यच झालं वाटतं ? "

मदयंतीने नुसती मान हलविली नानासाहेब पुढे म्हणाले, " दमयंती मुंबईला आली आणि तिनं मला वचनमुक्त केलं. " हे ऐकताच मदयंती थोडी जवळ सरकली नानासाहेब रूक्षपणे म्हणाले, " एखादी खोटी गोष्ट खरी करून कशी दाखवावी हे कसब तुम्हाला फार चांगलं साधलंस दिसतं. "

आपल्या रागाने व कठोरपणाने मदयंती घाबरली आहे हे नानासाहेबाच्या लक्षात आले. थोड्या वेळात ती कदाचित् पूर्वीप्रमाणे स्फुंदू लागावयाचीहि. हा फार्स कोणाच्या नजरेस पडू नये म्हणून नानासाहेब बाजूच्याच खोलीत शिरले व म्हणाले, " इकडे या अशा. म्हणजे नीट बोलता येईल, आणि कोणापुढे प्रदर्शनहि दिसणार नाही. " त्यांनी बाजूचे दार उघडलें व मदयंती आत येत नाहीसे पाहून तिचा हात धरून तिला जवळ जवळ फरफटतच खोलीत नेले. खोलीत गेल्यावर त्यांनी दार बंद केले व पलीकडच्या खिडक्या सताड उघडल्या.

नानासाहेब हात धरून ओढीत असता मदयंतीने एक उसासा टाकला व ते खिडक्या उघडीत असता ती त्यांना नम्रपणे म्हणाली, " पण तुम्हाला यात राग एवढा कशाचा आला आहे ? दमयंतीला तुमच्याबद्दल वाटतच नव्हतं काही. वाटत असतं तर मी तुम्हा दोघांमध्ये येऊच शकलें नसते. असते का ? "

नानासाहेबांना हे खरे वाटले. त्यांना वाटले, विश्वासघात जर कोणी

केला असेल तर तो दमयंतीने ती जसे दाखवीत असे तसे तिचे प्रेम आपणावर नव्हतेच. असते तर या स्त्रीच्या कचाट्यात आपण सापडलोच नसतो. तरी पण ते रागानेच म्हणाले, "दमयंतीबद्दल मी काही बोलू इच्छित नाही. माझा प्रश्न आहे माझ्या दयेबद्दल माझी म्हणण्यासारखी आता तेवढी तीच राहिली आहे"

"मग दयाबाइंच मी काय वाईट केल?"

"वाईट बिईट मला कळत नाही. पण तुम्ही तिला भयंकर रीतीन आपल्या वश करून घेतल एवढ मात्र खर. आणि आता हें नवीन औप-धाच कसल खूळ काढल आहे? जर तिला काही झाल तर पाहा गाठ माझ्याशीं आहे."

"पण देणारच आहे कोण? आणि माहित आहे कुणाला औषध बिषध? मुळात काही नाही. मला त्यांच्याजवळ बसून राहाण आवडेना, त्या मला सोडीनात तेव्हा काढली ही शक्कल. त्यानाही बर वाटल. मलाहि मोकळीक मिळाली फिरायची मीं त्याच काही वाईट केलहि नाही आणि करणारही नाही. त्याना आशा दाखवून मी त्याच चागलच केल आहे. आज-पर्यंत त्याना जितक सुख मिळाल नव्हत, तितक त्याना मी दिल आहे"

नानासाहेब चिडून म्हणाले. "पण हे सार तुम्ही कशासाठी केल?"

काठी उगारून आपल्यावर धावणाऱ्या माणसापुढे माजर पळत असते पण एकाएकी त्याची वाट अडावी, म्हणजे निरुपाय होऊन ज्या दृष्टीने तें परत फिरते व काठी उगारणाऱ्यावर नजर रोखते त्या नजरेने नानासाहेबा-कडे पाहात मदयती म्हणाली, "पुन्हा पुन्हा तच तेच विचारून काय उपयोग? कशासाठी हे तुम्हाला चागलच माहीत आहे, आणि तेच मीं त्या दोघीना सागितल– माझ तुमच्यावर प्रेम आहे म्हणून. सरदारसाहेब, या प्रेमाच्या इतक आधीन व्हाव असी माझी इच्छा नव्हती. कोणाही तरु-णाचा एवढा ताबा माझ्या मनावर बसेल अस मला स्वप्नातही वाटल नव्हत. पण आता काय? मी सर्वस्वी तुमच्या आधीन झाले आहे. कसही करून तुम्हाला आता त्याचा विचार केलाच पाहिजे."

मदयंतीच्या शब्दा शब्दातून तिला काय वाटत होते ते बाहेर पडत होते. नानासाहेबांना या अशा प्रेमाची इच्छा होती. मदयंतीमुळे नव्हे, तर तिला वाटणाऱ्या या प्रेमामुळे, या अनुरागामुळे, नानासाहेब थोडे नरमले. पण त्याचबरोबर दमयंतीचा त्यांना राग आला. दमयंती जर असेच म्हणत आपणाकडे येती तर? पण छे. ती म्हणजे किती निर्विकार! आपण निरोप घेत असताना तरी किती थंड होती ती!

दयेशी बोलत असता तेथे बसूनच नानासाहेब त्रासले होते. त्या त्रासामुळे मदयंतीशी वागताना जो कठोरपणा हवा होता तो आला नाही. निश्चय तर ताबडतोब करावयास पाहिजे, असे त्यांना वाटत होते पण तो होऊ शकत नव्हता मदयंतीला झिडकारून टाकले पाहिजे, निर्दयपणे झिडकारले पाहिजे, असे वाटत होते. पण तसे करता येणे शक्य नव्हते. इकडे ज्या गोष्टीची त्यांना अपेक्षा होती ती हातात घेऊन आत्मसमर्पण करण्याला तयार अशी मदयंती त्यांच्यापुढे उभी होती. त्यामुळे जितक्या जोराने प्रतिकार करावयास हवा होता, तितक्या जोराने तो नानासाहेबांना करता आला नाही.

शांत स्वरात ते म्हणाले, " म्हणजे तुम्हाला या एका गोष्टीशिवाय दुसरं सुचत नाही, दुसऱ्या कशाच महत्त्व वाटत नाही, असच म्हणायच ना?"

" होय. आणि मला दुसरं का सुचाव? निरर्थक गोष्टीबद्दल वाटून घ्यायला, नसलेल्या गोष्टीत विश्राम ठेवायला, मी शिकलेच नाही मुळी. असल्या गोष्टी म्हणजे निव्वळ गप्पा वाटतात मला. माझ्या हृदयात जे काय वाटत त्याचच मला महत्त्व."

" मग मी काय विचार करावा अशी तुमची अपेक्षा आहे?" नानासाहेब जड आवाजाने म्हणाले.

" का? काय करायच ते तुम्हाला ठरवता येत नाही वाटत?"

आपल्या अडचणी वाढवायला ही बाई समर्थ आहे अशी नानासाहेबांची खात्री झाली. खिन्नपणे ते हसले.

मदयंती म्हणजे दमयंतीची बहीण, आपली पाहुणी, आणि दयेची आता झालेली मैत्रीण. हिच्याशी लग्न तरी केले पाहिजे नाही तर हला घालवून तरी

दिले पाहिजे. निसऱ्या रीतीने हा प्रश्न सुटणारा नव्हता. खून तर अशक्यच. मदयतीला हें स्पष्टपणे समजलेंच पाहिजे. शेवटीं ते म्हणाले, " मदयतीबाई, तुम्हाला इथून जावच लागणार. दमयतीन तुमची व्यवस्था करायची आहे, आणि ती तशी करीलच. "

आपले शब्द फोल आहेत हें नानासाहेबास जाणवतच होते. परतु मदयतीच्या हसण्याने ते वाऱ्यावरच विरले. ती हसत म्हणाली, " सरदार-साहेब, मी भिकारीण असेन, पण आता मी पोर नाहीं खास. अशा रीतीन तुम्हाला माझा निकाल लावता येणार नाही हे निश्चित. "

" हो. मनात आणल तर तुम्ही मला आणखी त्रास देऊ शकाल याची मला जाणीव आहे. "

" आणि मी गेलें म्हणजे दयाबाईच काय ? "

" तो धाक नका मला घालू. तुम्ही नसताना दयेची व्यवस्था होतच होती ना ? तशीच आताहि काही तरी होईल. "

" अस्स होय ? दुसरी काही व्यवस्था करणार आहात होय ? " नाना-साहेब गप्प होते. ती पुढे थोड्या वेळाने म्हणाली-- " पण मला तुम्ही जायला का सागता तेच मला कळत नाही तुमच्या त्या दिवशींच्या कृती-वरून तर तुम्हालाहि माझ्याबद्दल काही वाटतस दिसल होत "

नानासाहेब तिजवर आरोप करीत म्हणाले-- " त्या यत्किचित् गोष्टीच तुम्हीं एवढ रामायण केलत आणि हा सारा गोंधळ घडवून आणला. "

" आणि तुम्ही गप्प बसणार होता नाही ? तुम्हाला दमयतीबाईविषयी वाटत नाही, त्याना तुमच्याविषयी नाही, तरी या नसत्या गोष्टीच रामायण रचायला मात्र तुमची हरकत नाही. " मदयती फणकाऱ्याने म्हणाली.

तिचे साधेच शब्द. पण ते अशा तऱ्हेने उच्चारले गेले होते की, त्या-वरून तिच्या मनात काय वाटत आहे, हें स्पष्ट समजत होतें. गद्गद स्वराने ती पुढे म्हणाली--" तुमच्याबद्दल इतक वाटणाऱ्या स्त्रीचा तुम्ही तिरस्कार कसा करता हेच मला समजत नाही. "

काय म्हणावें हिला ? इतकी अशिक्षित, अशी मूर्ख आणि असली असस्कृत स्त्री नानासाहेबानी कधी पाहिली नव्हती. त्याच्या समाजात अशी

स्त्री सापडणे कठिणच होते. त्याचबरोबर तिचे सौंदर्यहि पण असाधारण होते. आणि आता तर ते तिच्या हृदयातील अनुरागाने उद्दीपित होऊन फारच परिणामकारक दिसत होते. तिच्या आत्मसमर्पणाचा स्वीकार करण्यास कोणाहि तरुणास आनंदच झाला असता. तिचे डोळे पाण्याने भरून आलेले पाहून नानासाहेब थोडे द्रवले आणि म्हणाले-- " मदयंतीबाई मी तुमचा तिरस्कार करीत नाहीं. "

त्याच्या शब्दांत मृदुता दिसताच मदयंती किंचित् पुढे सरसावली. एकादा भ्यालेला कुत्रा जसा धन्याची मुद्रा पाहून मग हळुहळु पुढे जातो, तशीच तिची वागणूक होती. आणि नानासाहेबाच्या कठोर आणि गर्विष्ठ वृत्तीला अशी बेछूट वागणारी स्त्री इतकी नम्र व्हावी, यामुळे थोडे समाधान झाल्याविना राहिले नाही.

मदयंती पुढे हळूच म्हणाली- " तुम्हीं मला जवळ घेतली आहे. माझ्या तोंडाला तुमच्या ओठाचा स्पर्श झाला आहे. या साऱ्यावरून तुम्ही निदान माझा द्वेष तरी करीत नाही अशी माझी समजूत आहे. ही चूक आहे का ? " ती आणखी थोडी पुढे सरली नानासाहेबाचा हात तिने आपल्या हातात घेतला व अत्यंत दीनवाण्या स्वरात ती म्हणाली- " मला आज बरं वाटत नाही. मी अगदी दमून गेले आहे. इतकी वाट पाहाणं, इतके दिवस वाट पाहाणं, म्हणजे तुम्हाला काय वाटतं ? छे. स्त्रियांच जिणं किती कठिण आहे हे समजायला स्त्रीच झालं पाहिजे. "

नानासाहेबानी आपला हात तिच्या हातातून काढून घेतला नाही. ते तिच्याकडे पाहात उभे राहिले. तिच्या डोळ्यातले अश्रू गालावरून घळघळ ओसरत होते.

" मदयंतीबाई, एवढं दुःख करायचं काही कारण नाही. मी काही तुम्हाला आजच जायला सांगत नाहीं हो. "

" मग, मी राहू ना इथे ? "

" राहा वाटल्यास. दया आहे तोपर्यंत तुम्हाला राहायला काहींच हरकत नाही. "

" थोड प्रेमान तुम्हीं माझ्याकडे जरी पाहिल, तरी ते मला पुरेस आहे. मी तुम्हाला त्रास देणार नाहीं. " यापुढे यावेळीं जाणे शक्य नाही, हे मदयंतीने ओळखलें. तिने नानासाहेबाचा हात सोडला.

नानासाहेबाना वाईटहि वाटले व हसूहि आले. तिच्या मुग्ध शब्दात खोंच तर होतीच, पण एक लज्जतहि होती. ते हळूच दूर सरले व दार उघडून खोलीच्या बाहेर पडले.

---

# १६

दुसऱ्या दिवशीं मदयंतीने ती मुळी मुळीच मिळत नाही म्हणून दयेला सांगितले. दयेच्या साऱ्या आशा त्यामुळे भग पावल्या. नानासाहेबानी तिला आदले दिवशीच सगळे सांगितले होते. त्यामुळे दया आता खरोखरच घाबरली. त्याच दिवशीं तिला सडकून तापहि भरला. केवढालीं मनोराज्यें आपण केलीं ! त्या मनोराज्यात गग राहून आपण आपली प्रकृति अधिक बिघडवून घेतली, असे तिला समजले. पण आता काय ? पुन्हा तेच डॉक्टर व तींच औषधे. ताप आल्यामुळे आपण आता बरे होत नाहीं असे तिला वाटू लागले व ती डॉक्टरास दाखविण्यास तयार झाली. नानासाहेबानी डॉ. महात्मे याना रत्नपूरला घेऊन येण्याविषयीं दमयतीला तार केली.

नानासाहेबानी स्वतःस आलेली तार दमयतीकडे पाठविली होती. पण त्या तारेंत नानासाहेबासच बोलविलें होतें. नानासाहेबाचा निरोपहि तारेबरोबर काही नव्हता. तेव्हा नुसती दयेची बातमी देण्यासाठीच नानासाहेबानी आपणाकडे तार पाठविली, अशी दमयतीची कल्पना झाली व म्हणून ती

गेली नाही. पण आता अशी तार आल्यावर तिला जाणे प्राप्तच होतें. त्या रात्रीं मनावर मिळालेल्या विजयामुळे तिला आता काहीच वाटत नव्हते. ती पूर्णपणे स्वार्थनिरपेक्ष झाली होती. डॉ. महात्मे याना फोनवर विचारून तिने केव्हा निघावयाचे ते ठरविले व त्याना घेऊन ती रत्नपूरला आली.

डॉक्टरानी दयेला तपासले. औषध सांगितलें. दोन परिचारिका ठेवावयास सांगितल्या. पण त्याचवेळीं हेहि स्पष्टपणे सांगितले की, " दया आता फार थोड्या दिवसाची सोबतीण आहे. तिच्यावर सारखे लक्ष्य ठेवावयास पाहिजे. तिला कोणत्याहि प्रकारची उत्तेजना मिळू नये म्हणून तिच्या खोलींत उगाच कोणीं जाऊन बसू नये, तिच्याशी फारसे बोलू नये, इत्यादि इत्यादि." त्यानी मदयंतीला मात्र दोष दिला नाही. काही केलें असते तरी दया या स्थितीला आलीच असती. उलट, थोडे दिवस का होईना, तिला आनंद मिळवून दिल्याबद्दल डॉक्टरानी मदयंतीचे आभारच मानिले.

पण बाकीच्याना असे थोडेंच वाटे ? पावसाळा संपल्यामुळे पुन्हा पूर्वीच्या बाई, परिचारिका, गडी, सारीं माणसें आलीं. त्या साऱ्याना दयेची प्रकृति बिघडण्यास मदयंतीच कारण, असे साहजिकपणेच वाटे. त्यामुळे तीं सारींच मदयंतीशी फटकून वागत. नानासाहेब तिची मुळी गाठच पडू देत नसत. येऊन जाऊन तिच्याशी बोलणार म्हणजे दमयंतीच. दमयंती म्हणजे मदयंतीस एक कोडे वाटू लागली होती अलीकडे. इतके मूर्ख माणूस जगात असूं शकते याचें तिला आश्चर्यच वाटे. आपण हिच्याशीं इतके शत्रुत्वाने वागतो, तरीहि ही सरळच वागते. पण तिच्याशीं बोलावेंसेंच मदयंतीस वाटत नसे. या साऱ्यामुळे मदयंतीची कुचंबणा झाली होती.

दमयंतीचे जावयाचें ठरलेलेच होतें. लोकांत वाईट दिसू नये म्हणून तडकाफडकी तिने जाण्याचे ठरविलें नाही. पण जेव्हा सारे स्थिरस्थावर झालें, सारीं कामें पुन्हा सुरळीत चालू लागलीं, तेव्हा तिने एक दिवस नानासाहेबास सांगितलें, " मी उद्या संध्याकाळी जाणार."

दयेला आपण आता थोड्या दिवसाच्या सोबती आहोत, हें कळल्यापासून तिच्यात एक विलक्षण शांतता आली होती. ती कोणाशींच फारसें बोलत नसे. कसें काय म्हणून कोणी विचारलें तर ' ठीक ' एवढें तिचें

ठरीव उत्तर असे. साधारणपणे या मधल्या उत्तेजनेची प्रतिक्रिया म्हणून असो, कीं तिचा जीवनदीप ग्वरोखर विझत चालला होता म्हणून असो, पण ती बहुधा आपल्याच गुर्गीत असे.

दया जाणार हे कळल्यापासून तर नानासाहेबाची विलक्षण स्थिति झाली. दया नाही, दमयती जाणार व मदयती आपणास नको, तेव्हा आता आयुष्यात राहिलेच काय, अशी त्याची मनोवृत्ति झाली. या मनोवृत्तीत दमयती दुसऱ्या दिवशीं जाणार, हें कळल्याने आणखीच भर पडली. त्या सध्याकाळीं ते काहीसा विचार करून बाहेर पडले व कामकरी लोकास काही हुकूम सोडून आले. कामकऱ्याना, गड्याना व ज्याना ज्याना तो हुकूम समजला त्या साऱ्यानाच अत्यत आश्चर्य वाटले. पण करणार काय ? मालकाचा हुकूम. तो बजावलाच पाहिजे. म्हणून त्यानी ते कबूल केलें. पण नानासाहेबास वेडबिड तर लागले नाही ना, असें त्याना वाटल्याशिवाय मात्र राहिले नाही. कारण तो हुकूम म्हणजे त्या सध्याकाळी अधार पडला की एवढ्या परिश्रमाने तयार केलेल्या नावेस आग लावून टाकावी असा होता. नानासाहेबास ती नाव म्हणजे डोळ्यासमोर नकोशी झाली होती, व जेथे चळल्यामुळे आपल्या जीवनाचा सारा खेळखडोबा झाला, ती नाव त्या रात्रीं जाळून टाकण्याचा निश्चय करूनच त्यानी तसा हुकूम सोडला होता. पण गरीब बिचाऱ्या कामकऱ्याना काय माहीत हें ? त्याना वाटलें की, सरदारसाहेबाची ही एक लहर आहे. दुसरे काय ?

दमयतीने आपले सारें सामान आवरलें. जे घर आपलेंच होणार असे समजून ती इतके दिवस चालली होती, तेथे तिचे काय नसणार ? कपडे, पुस्तकें, चित्रे, कितीतरी गोष्टी तिने येथे एकत्र केल्या होत्या. शिवाय, वेळोवेळी नानासाहेबानी भेट म्हणून दिलेल्या कितीतरी वस्तू तेथे होत्या. यात कित्येक मौल्यवान् अलकारहि होते. कुडीं, बागड्या, चपलाहार, आगठ्या, मोत्याचे सर इत्यादि. रात्रीं जेवणे-खाणे झाल्यावर ती आपल्या खोलींत गेली व अलकाराची पेटी काढून तिने ते सारे अलकार बिछान्यावर घातलेल्या निळ्या पलगपोसावर काढून ठेवले. त्या निळ्या पृष्ठभागावर त्या वस्तू, आकाशातल्या नक्षत्राप्रमाणे, मंद दिव्याच्या प्रकाशात चमचम करीत

होत्या. इतक्यात तिला खिडकीवाटे दूर मोठा प्रकाश दिसला. कुठे आग तर लागली नाही ना? शोध करिता तिला कळले की, नावेला व तेथे तयार केलेल्या साऱ्या भागाला, नानासाहेबानी हुकूम दिला होता त्याप्रमाणेच ती होळी पेटली होती.

नानासाहेबाची ही वेडी लहर ऐकून तिला आश्चर्य तर वाटलेंच, पण त्याबरोबरच मनातल्या मनात एक प्रकारचे समाधानहि वाटले. आपल्या जाण्याची ही नानासाहेबानी दिलेली सलामी अयोग्य नाही असे तिला वाटलें. आपल्या लग्नाची देणगी देण्यासाठी म्हणून तयार केलेले हें सारें नानासाहेबानी नष्ट करून टाकावे, यात त्याचा फार मोठा व उदात्त हेतु तिला दिसला. त्या ज्वाळाकडे पाहात असता हें आपले सुख जळत आहे, असें जरी तिला वाटलें, तरी पण ती मोठी होळी पाहून त्या सुखाचे परिमाण केवढें होते हे तिच्या ध्यानात आले. तिला याची पूर्ण कल्पना झाली की, आता जरी नानासाहेबाचें आपणावर प्रेम राहिलें नसले तरी ते एकाकाळीं एवढे होते की, त्याची आठवण करून देणारी ती नाव व त्या साऱ्या वस्तू यापुढे नानासाहेब दृष्टीने पाहू शकले नसते, व म्हणूनच त्यानी तें सारे जाळून टाकण्याची आज्ञा दिली होती.

बिछान्यावर पसरलेल्या त्या अलकारातून नानासाहेबानी दिलेले अलंकार तिने निवडून काढले नानासाहेबाचें हें कृत्य झाले नसतें तरी तिला ते अलकार आपल्याजवळ ठेवणे अयोग्यच वाटत होते. पण आता आपली आठवण नानासाहेबानी अशारीतीने नष्ट केल्यावर आपणास ते ठेवणें अशक्यच होते. ते अलंकार इतके मौल्यवान् होते की, त्याचा नाश करणे म्हणजे शुद्ध वेडेपणाच झाला असता. शिवाय, ते घेताना आपण नानासाहेबाच्याच होणार आहोत या भावनेने आपणास काही वाटले नाही. पण हें असे झाल्यानतर त्यावर आपली मालकीच काय? बरें, ते उघड उघड परत करणेंहि तिला जमलें नसते. म्हणून ते सारे एका लहान पेटींत भरून त्या पेटीची किल्ली जाताना हळूच नानासाहेबाच्या हातीं द्यावयाची या हेतूने सारे निवडले होते.

एक लहानशी पेटी तिने रिकामी केली व ते दागिने आत भरणार तो

तिला दारावर टिचक्या ऐकू आल्या. दयेची प्रकृति अधिक झाली की काय असे वाटून ती झटदिशीं दार उघडण्यास गेली. तिच्या तोंडून शब्द बाहेर पडले "कोण आहे?" पुन्हा टिचक्या. दमयतीने दार उघडले. पाहाते तो दाराशीं मदयती उभी. "दयेची प्रकृति बिघडली वाटत? चल तू. आलेच मी–" दमयती म्हणाली.

मदयतीने नकारार्थी मान हलविली. "दयाबाई ठीक आहेत. त्या झोंपल्या असतील. मलाच तुमच्याशीं काही बोलायच आहे."

मदयती दारातून दूर न होताच म्हणाली, "आत्ता? या वेळी? सकाळ-पर्यंत थाब. मी आज दमले आहे. अन् मला अजून थोड आवरायच आहे."

"सकाळपर्यंत थाबून चालणार नाही. मी मोठ्या अडचणींत आहे. तुम्हाला माझ म्हणण आत्ताच ऐकल पाहिजे."

तिच्या चेहऱ्यावरून व स्वरावरून तसेच काहीतरी असले पाहिजे, अशी दमयतीची खात्री झाली.

"चल तर मग आत." असे म्हणून दमयती दारातून दूर झाली. मदयतीने आत प्रवेश केला. ते अलकार सारे बिछान्यावरच पसरलेले होते. पण तिकडे मदयतीचे लक्ष्य गेले नाही. पलगाजवळचीच खुर्ची तिने पुढे ओढली व पलगाकडे पाठ करून ती बसली. आज मदयतीचे लक्ष्य स्वतः-कडे नसलेसे दिसत होते. अलिकडे नीटनेटकेपणाकडे लक्ष्य देणारी मदयती आज गबाळासारखी दिसत होती. केस थोडे विस्कटलेले, नेसत्या लुगड्याचा चोळा-मोळा झालेला, पोलकेहि मळलेले, चेहरा अगदी मलूल व उतरलेला. दमयतींत तरी यावेळीं मदयतीला तोंड देण्याचे कुठे सामर्थ्य होते? तीहि दमलेलीच होती. घड्याळात जवळ जवळ बारा वाजावयास झाले होते. दिवाळीपूर्वीची थडी बाहेर पडू लागली होती. चद्र नुकताच उगवत होता, आणि खाली जळत असलेल्या नौकागृहाच्या ज्वालाची रक्तिमा पसरलेली होती.

दमयतीने दुसरी खुर्ची ओढली व ती मदयतीसमोर बसली.

"तुम्ही उद्या जाणार म्हणून ऐकते." मदयती म्हणाली.

"हो. मी उद्या जातें आहें. पण माझ्या मनात काही किल्मिष ठेवून मी जात नाहीं."

मदयती गप्पच. दमयती कष्टाने पुढे म्हणाली— " मला अशा गोष्टी बोलायला आवडत नाहीत. पण मला वाटत, काही व्यावहारिक गोष्टी तू विचारायला आली असावीस. सध्या तरी तुझ्याजवळ बरेचसे पैसे असतील. मी गेले म्हणजे घोरपडेसाहेबाना सागून तुझी काही तरी सोय करणारच आहे. "

" पैशाबद्दल बोलण्यासाठी मी आता आले नाही. " मदयती म्हणाली. " मला वाटत, पैशापेक्षाहि तुम्ही माझ काही अधिक देण लागता. "

" काय ते ? "

" आपल्या आणि माझ्या वडलामधील. मला वाटत, माझी आई म्हणे त्यात काही तरी तथ्य असाव आणि जाण्यापूर्वी तुम्ही ते मला सागाव. बाबा-साहेबाचे सारे कागद तुम्ही पाहिले आहेत काय ? "

" पण तस काही तरी असण तुलाहि शक्य वाटत नाही ना ? मी सारे कागद पाहिले नाहीत, पण ते आता मला पाहावेच लागतील. तुझ्या डोक्यात अशी कल्पना का यावी हे मला कळत नाही. पण तरी मी ते सारे कागद पाहीन. हवे तर तुझ्याकडे पाठवीन. तूही पाहा आणि आपली खात्री करून घे. मग तर झाल ना ? पण हेच का सागण्यासाठी तू आता इथे आली आहेस ? "

" नाही. तेवढ्यासाठीच नाही. " मदयतीने आपला एक पाय खुर्चीवर घेतला व त्या गुडघ्यावर हनुवटी टेकून ती म्हणाली— " तुम्ही जाण्यापूर्वी नानासाहेबाशी तुम्ही काही तरी माझ्याबद्दल बोलाव हे सागण्यासाठी मी आले आहे. "

" मी बोलायच आता काय राहिल आहे ? दयेच्या सागण्यावरून तुमच लग्न होणार हे मी गृहीत धरूनच चालले आहे. "

" दयाबाई काय, मी मनात भरवीन ते बोलतात. पण नानासाहेब मुळी माझी भेटच घेत नाहीत. आज मोठ्या मुष्किलीन मी त्याना गाठल तेव्हा मला समजल की, तुम्ही गेला की दुसऱ्याच दिवशी तेहि जाणार आहेत. कुठ, काय, किती दिवसासाठी हे काहीच सागत नाहीत. माझ्या बोलण्यात त्याना काही महत्त्वच दिसत नाही. मी बोलले की ते नुसते हसतात. पण

तुम्हीच सांगा बर, त्यांनी माझ्याशी लग्न केल पाहिजे की नाही? केलच पाहिजे. तस करायच नव्हत तर त्यांनी मला अशी आशा का दाखवली? मला जवळ का केल? मला बगलेत का घेतल? माझ चुंबन देखील का घेतल? मी वचनबद्ध आहे अस का सांगितल?"

"मदयंती, मदयंती, अस बोलू नये म्हणून तुला सांगितल ना? अस बोलण किती हलक दिसत?"

मदयंतीने क्रूरपणे तिजकडे पाहिले व ती म्हणाली, "जेवढ म्हणून खर, तेवढ सार तुम्हा सान्यांना हलकट वाटत. पण तुम्हाला काय वाटत याची मला पर्वा नाही. नानासाहेब सोडून दुसऱ्या कुणाबद्दल किंवा कशाबद्दल मला विचार करायचा नाही. काय करू हो? आरंभी आरंभी अस नव्हत. माझ्या मनात दुसऱ्याहि काही कल्पना येत. पण आता? छे! सारच बदलल आहे. दुसर काही, काही डोक्यात येतच नाही."

"हें सांगायला तू माझ्याकडे यावस, हे चमत्कारिक नाही वाटत तुला?"

"तुम्हाला वाटत. मी तुमच्याशी वाईट वागले होय? तुम्हाला नानासाहेबाबद्दल कधीच काही वाटल नाही. पण मला— मला काय वाटत याची कल्पनाहि तुम्ही करू शकाल की नाही याचीच मला शंका आहे."

आपली कबुली ती अशा प्रकारे देत असताना दमयंतीला तिजकडे पाहवले नाही. "पण मग, मदयंती, मी काय कराव अस तुला वाटत?" तिने विचारिले.

"नानासाहेबांना समजावून सांगा. सांगा त्यांना, त्यांनी मला इथे सोडून जाण योग्य नाही म्हणून. असच दोघांच लग्न होणार अस दयाबाईंना वाटत म्हणून. ते व्हाव अस तुम्हालाहि वाटत म्हणून."

"पण दयेला तस वाटायला तूच लावलस ना! मला कठिणच वाटत की नाना—"

"माझ्याशी लग्न करतील हं." मदयंतीने वाक्य पुरे केले. "का?"

"तस नव्हे— कुणाच्या सांगण्यावरून ते आपला विचार बदलतील हे." दमयंतीने आपले वाक्य पुरे केले. "मदयंती, तू मला पुष्कळ वेळा

फसवल आहेस, पण या वेळीं तू काय बोलते आहेस तें खरं आहे. माझी खात्री पटली की, तुझं नानासाहेबावर प्रेम आहे."

" मग सांगा ना त्याना तसं. करा रदबदली माझी."

हें तिचे काम करणं किती विलक्षण होते! दमयंतीला या स्थितींतहि हसू आलें. ती मृदुपणे म्हणाली, " पण तू स्वतःच का नाही तसं सांगत त्याना ? "

" नाही. मला ते जमत नाही हो. माझी आणि त्याची भाषाच निराळी पडते. मला तुमच्या सभ्य भाषेत तसं सांगता येत नाही. ते मुळीं मला आपल्या जगातलीच समजत नाहीत. जेव्हा विचाराव तेव्हा टाळाटाळी. दमयंतीबाई, मी त्याना माझ्यावर प्रेम करायला खात्रीन लावीन हो. त्यानी मला जवळ मात्र राहू दिलं पाहिजे. तेवढंच करायला तुम्ही त्याना सांगा, म्हणजे झालं. "

ज्या समाजात मदयंती लहानाची मोठी झाली, तिला लहानपणापासून जे काय दिसलें त्यातला नीति-नियम म्हणजे एवढाच. प्रेम म्हणजे लग्न, हेंच त्यातले समीकरण. आपणच पसरलेल्या पाशात पाय अडकलेल्या मदयंतीचें एवढेच नीतिशास्त्र नानासाहेब काय आहेत हे तिला व ती काय आहे हे नानासाहेबाना, खरे सांगावयाचे म्हणजे, कळलेच नव्हते. दोघेही आपआपल्या परीने चतुर, पण एकमेकाची कल्पना करण्यात दोघानीहि गोता खाल्लेला. दमयंतीला स्पष्टपणे दिसून आले की, नानासाहेब व मदयंती याच्यामध्ये केवढे अंतर, केवढा अनुल्लंघनीय खंदक आहे!

एकादी नवीन आकर्षक वस्तु दिसावी, तिने एकदम मनाला थोडे बरे वाटावें, व आपण तिच्याकडे आकृष्ट व्हावें, याप्रकारची तरी नानासाहेबाची भावना मदयंतीविषयीं असावी. किंवा तिच्याबद्दल खरेच प्रेम वाटत असूनहि आपल्या मोठेपणाच्या कल्पनेने, इतके दिवस लोकात प्रसिद्ध असलेल्या आपल्या गोष्टीमुळे तरी ते तिला दूर लोटीत असावेत, व तिचा उघडपणे स्वीकार करण्याचे धैर्य त्याना होत नसावे. काही असले तरी वाईटच. आणि यात हात घालणे म्हणजे भयकरच, असें दमयंतीला वाटलें.

मदयंती उठली. " मला तुमच्याजवळ एवढंच मागायचं होतं. मला

वाटल, तुम्ही मला मदत कराल अशा प्रकारचीं काम करण तुम्हाला आव-डत असं मला वाटत. माझी खात्री आहे की, तुमच्या बोलण्याचा त्याच्या मनावर परिणाम होईल इतकी लाचार होऊन मी तुमच्याशी कधी बोलले नाही. पण काय करूं हो! माझा अगदी नाइलाज झाला आहे."

मदयतीच्या बोलण्यात थोडा उद्धटपणा असला तरी त्या स्त्रीची निराशा, तिचा धीटपणा, तिला सर्वश्रेष्ठ वाटत असलेली गोष्ट आणि ती प्राप्त होण्यासाठी हव्या त्या मार्गाचा अवलंब या साऱ्यामुळे दमयंतीला तो क्षम्य वाटला.

नानासाहेब मदयंतीशीं वागताना किती पुढे गेले होते, हे तरी दमयंतीला पुरतेपणीं कुठे ठाऊक होते? मुंबईस जेव्हा तिचे त्यांच्याबरोबर या बाब-तीत संभाषण झाले, तेव्हा त्यांनी आपल्या बोलण्याचा निषेध केला नाही एवढेच. पण त्यांना मदयंतीबद्दल खरे काय वाटत होतें, हे तिला कुठे ठाऊक होते?

हे प्रेम, हे विलक्षण प्रेम माणसाला कुठल्या थराला नेऊन पोचवितें याची मात्र मदयंतीकडे पाहून दमयंतीला कल्पना आली. मदयंतीचे प्रेम वासनात्मक असेल, तें हीन दर्जाचें, दुर्दम्य आणि नानासाहेबांच्या बहिरंगामुळे उत्पन्न झालेले असेल, पण याक्षणीं त्याचा मदयंतीवर पूर्ण ताबा बसलेला आहे याविषयीं दमयंतीला शंका राहिली नाही.

आपली देखील त्या दिवशी अशीच स्थिति नव्हती का झाली? ताज-महाल हॉटेलच्या समोर आपण जेव्हा नानासाहेब ओझरते तरी दिसतील का, याची वाट पहात उभ्या होतो, तेव्हा आपण तरी यापेक्षा कुठल्या उच्च पायरीवर होतो? त्यावेळच्या आपणात आणि आजच्या मदयंतींत काय अंतर? आज ती आपणास भूतकाळातील स्मृतिशेष झालेली गोष्ट वाटत आहे एवढेच. मदयंतीची या वेळची स्थिति पाहून या प्रेमाचा दमयंतीला पूर्णपणे वीट आला. असल्या या प्रेमाची तिला दहशतच बसली.

मदयंती उभीच होती. "झाला ना विचार तुमचा? सांगाल ना मग तुम्ही?" असे म्हणताना मदयंतीची जी केविलवाणी स्थिति झाली होती,

ती पाहून दमयंतीच्या अंतःकरणात कालवू लागले तिच्या तोंडातून शब्द निघेना. तिने मानेनेच होय म्हणून सुचविले.

आता कुठे मदयंतीचे लक्ष्य बिछान्यावर पडलेल्या दागिन्याकडे गेले. " कुणाचे हे अन् किती सुंदर ! " असे म्हणून ती ते हाताळू लागली. " किती छान, आणि हे सारे नानासाहेबानी तुम्हाला दिलेले ? मग तुम्ही काय हे परत करणार आहात ? "

खिडकींतून नौकागृहाच्या आगीचा प्रकाश तिलाहि दिसला. ती म्हणाली, " आणि नानासाहेबांनी ती नाव म्हणे जाळून टाकवली. ते का ? "

" ते मला काय माहीत ? " दमयंती म्हणाली

" पण याचा अर्थ काय ? "

" मदयंती, आता तू जाशील का ? मला एकटीला थोडा वेळ शांत असू दे. मला अजून पुष्कळ आवरायचं आहे. मला उद्या जायचं आहे. "

" पण तुम्ही मला या घरात आणलच का ? ' मदयंती शेवटी म्हणाली. " मी घालवलेल्या दिवसानंतर— असा पुरुष— या साऱ्या गोष्टी तुम्हाला समजायला पाहिजे होत्या. "

हे म्हणताना मदयंतीला विसर पडला होता की नानासाहेबावर मोहजाल पसरण्याला तिने जो आरंभ केला होता तो दमयंतीबद्दलच्या शत्रुबुद्धीने. दमयंतीला नानासाहेब मिळू नयेत हा मूळ हेतु. आता त्या जाळ्यात तीच अडकली, ही गोष्ट निराळी.

" मला वाटतं आता, मी मूर्खपणा केला. पण आता काय ? सारं होऊन गेलं ना ? खरोखरच माझा मूर्खपणा तो पण मदयंती, तरी देखील मी जे काय तुझ्यासाठी करू शकेन, ते केल्याशिवाय राहाणार नाही. "

" मला ठाऊक आहे. मी त्यांच्या बरोबरीच्या कुळातली नाही म्हणून नानासाहेब माझ्याशी लग्न करायला तयार नाहीत. पण तुमच्यात आणि माझ्यात फरक काय आहे ? जो काय असेल तो पैशाचाच ना ? "

" मीहि पण तसंच म्हणते ना ? पण मग मी नानांना काय सांगू आणि कसं सांगू ? "

" कस तें तुमच तुम्ही पाहा. त्याना सागा की, मला एकटीला सोडून जाऊ नका. सागाल ना ? "

" सागून पाहीन." दमयती म्हणाली. तिने विचार केला. आपल्या पापाच्या प्रायश्चित्तासाठी जो दुःखाचा पेला आपणाला प्यावयाचा त्याचा हा शेवटला घोट आहे.

मदयती निघून गेली. दमयती एकटीच खोलींत राहिली. तिने दिवा मालवून टाकला. बाहेरच्या चद्राचा जो मद प्रकाश खिडकीवाटे आत येत होता त्यातच ते अलकार त्या पेटींत भरले. कुलूप लावले. किल्ली हात-पिशवीत ठेवली व पुन्हा एकदा खिडकीशीं जाऊन ती बाहेर पाहू लागली.

आता आकाशात एकटा चद्रच प्रकाशत होता. नौकागृहाची आग विझत आली होती. तिचा प्रकाश झाडाआड लपला होता. नानासाहेबानी आपल्याला दिलेली शेवटची सलामी अनत कालात विलीन झाली होती.



# १७

दुसऱ्या दिवशी मोठ्या पहाटेमच मदयती उठली. दमयतीकडून आपली बाज् आता पक्की झालीच आहे. पण आणखीहि एक कल्पना तिच्या मनात आली. सकाळची कामे उरकून ती हळूच दयेच्या खोलीकडे वळली.

दयेला अजून आपली गरज असेल ती नानासाहेबास सागू शकेल. ती सरळ दयेच्या खोलींत शिरली.

सकाळची वेळ. दयेचा डोळा लागला आहे असें पाहून परिचारिका आपआपलीं कामे उरकण्यासाठी गेलेल्या. दया खोलींत एकटीच होती, ती डोळे मिटून पडली होती, पण झोंपेत नव्हती. ताप व खोकला यानी ती बरीच जर्जर झाली होती. मदयतीची चाहूल तिला लागली. तिने डोळे उघडले.

मदयतीने दार लोटले व ती दयेजवळ येऊन म्हणाली, " मी मोठ्या सकटात सापडले आहे, दयाबाई. "

दयेने तिजकडे पाहिलें, पण तिच्या दृष्टींत जिज्ञासेचा लेशहि दिसत नव्हता.

मदयती बिछान्याजवळ आली व दयेवर ओणवून उभी राहिली. तिची विशाल, भव्य छाया दयेच्या सर्वांगावर पडली. " दयाबाई, माझ्याबद्दल तुम्हाला काय वाटत, हें दाखवायची वेळ आता आली आहे. "

" काय झाल ? " क्षीण स्वरात दयेने विचारिले.

" आज दमयतीबाई जायच्या आहेत आणि माझ्याबरोबर राहायला नको म्हणून उद्या नानासाहेबहि जाणार आहेत. "

" मग मला सागून काय उपयोग ? त्याचीं काही काम असतील, ते जात असतील. "

" पण नानासाहेबानी मला आपल्याबरोबर न्याव अस सागाना तुम्ही त्याना. ते माझ्याबरोबर राहायला तयार नाहीत. तुम्ही मला एवढी मदत करणार नाही का ? "

दया हसली. तिचे फटफटीत, पाढरे ओठ विलग होऊन किती भीषण रीतीने तिचे दात लकाकले ! ती अत्यत क्षीण स्वराने म्हणाली, " मी आता कोणला काही मदत करू शकत नाही. आजचा दिवस तरी मी आता जगेन कीं नाही, देव जाणे. "

" छे. छे. तुम्ही बऱ्या होत आहात. तुम्हाला ठाऊक आहे की तुम्ही बऱ्या होत आल्या आहात. "

" नाही. मी कधीच बरी होत नव्हते. मला आता सार स्पष्ट दिसत आहे."

" तुम्ही मला तर दोष नाही ना देत याबद्दल ? "

" नाही. मुळीच नाही. तुमच्या करण्यान फारसा फरक पडला, अस मला वाटत नाही. जन्मापासूनच मी मरत होते. तुमची मदत न मिळती तर मला थोडा आनद कमी मिळाला असता. पण कदाचित् डॉक्टराच्या सल्ल्यान वागते तर थोडी अधिक जगलें असते. पण आता काय त्याच ? "

" दमयतीबाई तर तुमच्याकडे येऊन गेल्या नाहीत ? " मदयतीने आश्चर्यचकित होऊन विचारिलें.

" मुळीच नाही. मला वाटन, मी जीजीला मुकले. तिन, नानानी, दादासाहेब, मावशीबाई साऱ्या जुन्या ओळखीच्या माणसानी माझ्याजवळ याव असं आता मला वाटू लागल आहे. पण करायच काय बोलावून, म्हणून मी कोणाला बोलावत मात्र नाहीं. " दयेचे शब्द अगदी मद स्वरात निघत होते. पण मदयतीला ते प्रलयकालच्या मेघगर्जनेप्रमाणे वाटले

" म्हणजे ? मग तुम्हाला माझी आता मुळींच गरज नाही म्हणायची ? " मदयतीने प्रश्न केला.

" मला आता कुणाची नि कश्शाची गरज नाही. जीजी जाताच तुम्ही मळी शोधायच्या निमित्तान दोन दिवस बाहेर हिंडल्याच नानानी मला

सांगितलं, तेव्हा मला कळून आलं की तुम्हाला माझ्याबद्दल कधीच काही वाटलं नाही म्हणून. आणि आता तर मला स्पष्टच कळलं, तुम्ही मला काय हेतूनं हातीं धरलं हे."

मदयती बिछान्याजवळ ताठ उभी होती. तिने एकदम प्रश्न केला, "पण हे सारं तुम्हाला कोणीं सांगितलं?"

"कोणीं नाही." दया स्मित करीत म्हणाली. "माझ्या मनाशी विचार करता करताच मला हें समजलं. मरताना मनुष्य ज्ञानी होतो म्हणतात ना? तसंच असेल."

मदयती उमळून म्हणाली, "भलतंच! कुणींतरी तुम्हाला हे सांगितलं असेल. दमयंतीबाईनींच बहुधा हे सांगितलं असावं."

दयेने अगदी अशक्तपणे आपली मान हालविली. ती म्हणाली– "नाही. जीजी मला अजून मुळीं भेटलीच नाही. कोणत्या तोंडानं मी तिला आता भेटूं? ती फारच चांगली आहे. तिच्या तोंडून कुणाबद्दल कधी वाईट निघणारच नाही, मदयंतीबाई."

दयेला एवढे बोलणेहि सहन झाले नाही असे दिसले. तिला एकदम खोकल्याची उबळ आली.

खोकल्याचा शब्द ऐकताच परिचारिका धावतच आली. मदयंतीला तेथे पाहून ती म्हणाली, "तुम्ही इथे कशा? जा पाहूं येथून आता."

मदयंतीने दयेकडे पाहिले व विचारिले–– "जाऊं मी?"

दयेने हात जोडून नमस्कार केला व मानेनेच रुकार दर्शविला.

मदयंती गेली. पण दयेशी तिचे जे बोलणे झालें त्यावरून आणि दयेची सध्याची दयनीय स्थिति पाहून मदयंतीच्या मनात आजपावेतो कधी न सुचलेले विचार येऊं लागले. तिला एका ठिकाणी बसवेना. ती बाहेर पडली व वाड्यासभोवती असलेल्या लहानशा फुलबागेत फिरूं लागली. कुंड्यात लावलेलीं लहान लहान, पण आपल्या नाजुक फुलांनी सारे सभोवतालचे वातावरण दरवळून टाकणारीं फुलझाडे पाहून तिला वाटले, या झाडांची किती काळजी घ्यावी लागते पाहा. ऊन्ह, वारा, पाऊस यापासून याचे रक्षण करण्यास या कुंड्या इकडून तिकडे उचलून ठेवाव्या लागतात. तेव्ह

कोठे हीं जगतात. उलट, रानझाडे. त्याना कोण पाणी घालतो, कोण इकडून तिकडे उचलून ठेवतो ? पण ती त्यातच फोफावतात. हें असे का ? याच्या जातीच निरनिराळ्या आहेत काय ? हा विचार आज प्रथमच तिच्या मनात आला.

दया आपणास खरी आजारी वाटलीच नाही. तिचा आजार म्हणजे आपणास श्रीमतीचे चोजले वाटले. यातून ही खास बरी होऊ शकेल हीच आपली कल्पना. पण ती किती खोटी ठरली ! दया आता खासच जगत नाही. आणि आपल्या लाभासाठी आपण तिचाहि उपयोग करून घेतला ना ? बरे, जे आपण केले तें तरी ती बरी व्हावी म्हणून, की या घरी सर्वांवर मात करून आपल्याला राहाता यावे म्हणून ? पण दया म्हणजे खरीच बागेतली कळी. रानफुलाचे उपचार तिला कसे मानवावेत ?

आपणास असे वाटत होते की, दया भोळी पोर आहे. तिच्या मनात काय, आपण भरवू ते विचार येतील. आपल्या इच्छेप्रमाणे तिला वाटू लागेल. आणि थोडा वेळ तसे आपणास करिताहि आले. तिच्या शुद्ध व चंद्रासारख्या निर्मल मनोबिंबावर काही काळ आपल्याला सहायाचे ढग आणता आले. पण जे ठसविण्याचा आपण इतका प्रयत्न केला ते किती सहज रीतीने तिच्या मनातून दूर झाले ! आपण एवढा रचलेला व्यूह तिच्या ध्यानात किती लवकर आला. तिने आपणास सर्वांत आधी ओळखले व आज निरोपच दिला. पण तिच्या मनात काही किल्मिष राहिले का ? मुळीच नाही. उलट, तिने आपणास दोष मुळीच दिला नाही. आपल्या मार्गात कोणी आडवे आले, तर आपणास काय वाटतें ? आपण त्याला मार्गातून दूर करण्यास किती जीवापाड श्रम करतो, वेळ आली तर त्याला कापून काढायलाहि कमी करीत नाही. आणि ही पोर ? आपण तिचा मृत्यु जवळ ओढवून आणला हे समजले तरी आपणावर रागावत नाही. हे असे का ? आपण दयाबाईपेक्षा खरेंच निराळ्या वर्गातल्या आहोंत काय ?

दयेवरून तिची कल्पना नानासाहेबाकडे वळली. आपण आपल्या सौंदर्याने त्याना मोहित करू शकू व दमयंतीपासून हिरावून घेऊ, ही आपली कल्पना. आपल्या उन्मादक वागणुकीने आपण त्याना आपणाकडे थोडे खेचलेहि.

आपल्या हस्तस्पर्शांने ते रोमांचित झाले आपल्या आलिंगनाने चचल होऊन त्यानी आपलें चुबनहि घेतले. तेवढ्या त्याच्या चचलतेचा दमयतीपासून त्याना दूर करण्यात आपण उपयोगहि करुन घेतला. पण पुढे काय? दमयतीपासून ते दूर झाले, पण आपल्याला जवळ झाले का? त्याना आपणाविषयीं अनुकपा वाटते. सहानुभूति वाटते, पण प्रेम? छे. तें काहीं त्याच्या मनात आपणास अजून निर्माण करता आलेले नाही. उलट दमयती पासून दुरावले नसता ते थोडे तरी आपणाकडे आकर्षिले जात होते. पण दमयती दूर जाताच त्याचे मन दुप्पट जोराने तिच्याकडेच आकर्षित होतें. असे का? दमयती आपणापेक्षा सुदर नाही. ती आपणाइतकी त्याना जवळहि करीत नव्हती. तरी ते आपणाकडे का ओढले गेले नाहीत? सौंदर्य नाही तरी दुसरें काही तरी दमयतींत खास आहे.

मदयतीने पुष्कळ विचार केला. आपला स्वार्थ न कळणारी दमयती, स्वतः होऊन आपल्यासारख्या अनोळखी बहिणीवर दया करणारी दमयंती, तिला आपल्या स्वतःच्या बरोबरीने वागवू इच्छिणारी दमयती, आपल्या स्वतःपेक्षा सुदर असलेल्या स्त्रीला आपल्या भावी पतीबरोबर वागू देणारी दमयती, ती आड येत आहे असे कळूनहि तिचा विरोध न करणारी दमयती, तिने आपला सर्वस्व नाश केला हे कळल्यावरहि मनात किल्मिश न ठेवणारी दमयती, आणि कालच रात्री त्याच बहिणीच्या विनवणीने तिच्याबद्दल नानासाहेबाजवळ रदबदली करायला तयार झालेली दमयती, आपणापेक्षा निराळ्या प्रकारची आहे, असें तिला वाटू लागले. तिचा दुपारपर्यंतचा सगळा वेळ या अशा विचारातच गेला.

घरात आल्यावर तिला कळले की दयेचा ताप वाढतच आहे. खोकलाहि वाढला आहे. ती फार बेचैन आहे. या साऱ्याचे खापर थोडेंफार तरी आपल्या माथ्यावर फुटणार हें तिला कळून चुकले.

जेवणखाण झाल्यावर दयेचा डोळा लागला आहे हें पाहून दमयंतीने नानासाहेबाची गाठ घेतली. आजकाल दोघेहि अगदी परक्यासारखीं वागत होतीं. नानासाहेबानी प्रवासाची तयारी वगैरे झाली कीं नाही याबद्दल

औपचारिक प्रश्न विचारले. दमयंतीने उत्तरें दिलीं. दोन माहित्या ओळखीचीं माणसें भेटतात तशी भेट व तशाच गोष्टी झाल्या.

" जाण्यापूर्वी दयेचा निरोप घेणार आहात ना ? " नानासाहेबांनी शेवटीं प्रश्न केला.

" होय. दयेनं मला केव्हाच निरोप दिला आहे. पण तरी निघण्यापूर्वी एकदा जाणार आहे मी तिचा शेवटचा निरोप घ्यायला. पण त्यापूर्वी मला थोडस तुमच्याशीं बोलायच आहे मदयंतीबद्दल."

" ते काय ? " नानासाहेबांनी डोळ्यानीच पृच्छा केली.

दमयंती कसे काय सांगावे या विचारात असताच परिचारिका धावत आली. तिला अगदी दम लागला होता. दयेचा ताप सकाळपासून वाढत होता तो एकदम उतरला आहे, तिचे हात पाय थंड पडत चालले आहेत आणि तिने नानासाहेब व दमयंतीबाई, दोघांसहि तांबडतोब बोलाविले आहे असा निरोप तिने धापा टाकीत टाकीत कसातरी सांगितला.

दोघेहि जवळजवळ धावतच दयेच्या खोलीत गेलीं. दोघांसहि बरोबरच आंत आलेलीं पाहून दयेच्या चेहऱ्यावर त्यावेळींहि स्मित झळकले. ती आनंदी दिसूं लागली.

" कस काय दया ? " नानासाहेबांनी विचारिलें.

" आता काय विचारता नाना ? दिसत नाही का ? मी आता, मला वाटत, थोड्याच क्षणाची सोबती आहें. मदयंतीबाईनाहि बोलवा ना."

आपण इकडे येताना मदयंती दाराशींच आपणास दिसल्याचें नानासाहेबांस आठवलें. तिलाहि बोलावणें गेले. तीहि आली. दयेच्या उशाशीं उजव्या हाताकडे दमयंती, तिच्या उजवीकडेच नानासाहेब व त्याच्या पलीकडे मदयंती अशा तिघांकडेहि दयेने पाहिलें.

ती म्हणाली--" नाना, मरताना मनुष्य ज्ञानी होतो, नाही ? आणि तो मोठाहि होतो. केवढी भाग्यवान् मी ! तुमच्यासारखीं माणस मला मिळालीं. तुम्हा साऱ्यानाच माझ्यासाठी फार कष्ट झाले. मी जें काही बोललें चाललें असेन त्याबद्दल क्षमा करा."

एवढे बोलून तिने सर्वांना हात जोडले व थोडा वेळ डोळे मिटून ती स्वस्थ पडली.

थोड्या वेळाने डोळे उघडून तिने मदयतीकडे पाहिले व म्हटलें—"मदयतीबाई, तुम्हाला तो ताईत– जो अगदी आपल्या पहिल्याच भेटीच्या वेळेस फार आवडला होता तो– मी देतें आहें. आपण दोघींनी थोडे दिवस आनदात घालविले. तुमच्यामुळे मला फार आनद मिळाला त्याची आठवण तो तुम्हाला देत जाईल."

आपण हिच्याशीं कसे वागलो आणि ही आपणाशीं कशी वागत आहे, हे पाहून मदयती आश्चर्याने दिङ्मूढ होऊन उभी होती.

दमयतीकडे पाहून ती म्हणाली– "जीजी, काही दिल तरी तुझी उतराई मी होणार नाहीं. तेव्हा त्या भानगडीत मी पडत नाहीं. अज्ञानामुळे जे काही मी तुला बोलले, त्याची क्षमा कर. आज आता तू इथून जाऊं नकोस एवढच तुझ्याजवळ मी मागते."

पुन्हा थोडा वेळ दमल्यामुळे ती स्वस्थ पडून राहिली. नतर नाना-साहेबाना म्हणाली, "नाना, माझे वडील, आई, सारे तुम्हीच. त्या अप-घाताबद्दल उगाच वाईट वाटून घेऊ नका. तो झाला नसता तरी मी याहून अधिक जगले नसते. सकाळपासूनच मला आज मी मरणार अस वाटत आहे. तुमची दिवाळी मात्र माझ्या दिवसात जाणार. पण कार्तिकी पौर्णिमेला– त्रिपुरी पौर्णिमेला– नाना, रत्नेश्वरापुढे खूप दिवे लावा आणि दिवाळी साजरी करा. कराल ना? यदा मोठा त्रिपुर लावण्याचा मीं नवस केला होता. मी गेलें तरी तुम्ही तो पुरा करा."

ती गप्प राहिली. नानासाहेबानी तिला अधिक न बोलण्याविषयीं सुच-विले. पण ती म्हणाली, "इतके दिवस मला मरणाची भीति वाटत होती, पण आज मला मुळीच भीति वाटत नाही. ताम्ब्याची ती कविता आज मला सारखी आठवते आहे. नाना तेवढ पुस्तक घ्याना. जीजी तूं म्हण ती कविता. मी आता फार बोलत नाही. काढ ती, 'घनतमीं शुक्र बघ राज्य करी."

एवढें सांगून दयेने डोळे मिटले. तिच्या नाड्या सुटत चालल्या होत्या, पण ती पूर्णपणे शुद्धीवर मात्र होती.

नानासाहेबानी दमयंतीच्या हातीं पुस्तक दिले. ती कविता काढून म्हणू लागली--

घनतमीं शुक्र बघ राज्य करी ।
रे खिन्न मना बघ जरा तरी ॥ ध्रु० ॥

दयेने डोळे उघडले-- दमयंती पुढे म्हणू लागली—

ये बाहेरी अंडे फोडुनि
शुद्ध मोकळ्या वातावरणीं
कां गुदमरसी आंतच कुढुनी
रे मार भरारी जरा वरी ॥ १ ॥
घनतमीं शुक्र बघ राज्य करी ॥

दया म्हणाली— "चालले मी आता भरारी मारीत. चालू दे जीजी."
दमयंतीने सुरुवात केली--

प्रसवे अवस सुवर्णा अरुणा
उषा प्रसवते अनंत किरणा
पहा कशी ही वाहे करुणा
कां बागुल तू रचितोस घरीं ॥ २ ॥
घनतमी शुक्र बघ राज्य करी ॥

"मदयंतीबाई, आता बागुलबुवाचं काहीच कारण नाही. हं- पुढे."

फूल हसे काट्यात बघ कसे
काळ्या ढगीं बघ तेज रसरसें
तीव्र हिमांतरिं वसतहि हसे
रे उघड नयन कळ पळे दुरी ॥ ३ ॥
घनतमीं शुक्र बघ राज्य करी ॥

"आता कळ मुळीच नाही. गेली पळून पार. जीजी, थांबू नकोस-"

फूल गळे, फळ गोड जहालें
बीज नुरे, डौलात तरु डुले
तेल जळे, बघ ज्योत पाजळे
का मरणिं अमरता ही न खरी ॥ ४ ॥
घनतमीं शुक्र बघ राज्य करी ॥

" नाना तेल सपल. आता विझताना दिवा मोठा होतो तसच जीजी, कर पुरी ती कविता. "

प्रत्येक कडव्यागणिक दमयंतीचा कंठ भरून येत होता. तिचा स्वर कंपित होत होता. गद्गद स्वराने ती म्हणू लागली—

मना वृथा का भीसी मरणा
दार सुखाचे तें हरिकरुणा
आई पाही वाट रे मना
पसरोनि बाहु कवळण्या उरीं ॥ ५ ॥
घनतमीं शुक्र बघ राज्य करी ॥

दयेने दोन्ही हात पसरले. नानासाहेबानी तिला उचलून घेतले. त्याच्या खांद्यावर डोक्याचा व अंगावर शरीराचा भार टाकून दयेची प्राणज्योति निघून गेली.

---

# १८

दया गेली. तिचे दिवस सपले.

आता मात्र खरा प्रश्न उभा राहिला. मदयतीचें काय करावयाचे? नानासाहेब व्यवस्था करतील ही दमयतीची कल्पना, आपल्यावर जबाबदारी नाही ही नानासाहेबाची भावना, आणि ती त्याच्यावर लादली जावी ही मदयतीची योजना.

दमयंतीचा जावयाचा दिवस ठरला. दमयती गेली की दुसऱ्या दिवशीं आपणहि जाणार हे नानासाहेबानी जाहीर केले. मदयतीने दमयतीला पुन्हा आपलें वचन पुरे करण्यास बजाविले.

जाण्याच्या दिवशीं दमयती व नानासाहेब दिवाणखान्यात बसलीं असता दमयतीने भीत भीत मदयतीचा प्रश्न काढला. ती म्हणाली--

" नानासाहेब, आता मदयतीच काय करायच? तुम्हीं या बाबतीत काय ठरवल आहे?"

" मीं?" नानासाहेब अत्यंत रूक्ष स्वराने म्हणाले-- " म्हणजे? मदयंतीबाईची जबाबदारी माझ्यावर आहे की काय? तुम्ही त्याना वाटेल तिथं ठेवावं किंवा त्यानी वाटेल तिथ जाव. माझा त्याच्याशीं काय सबध? आपल्या गाठी आता क्वचित्‌च पडतील."

" तुम्हीं असं म्हणावं हें मला कससच वाटत." दमयती मोठ्या दुःखाने म्हणाली-- " माझी [illegible] कल्पना होती की तुमच आणि तिचं . . ."

तिचे वाक्य पुरे न होऊ देताच नानासाहेब म्हणाले– " अस्स ! म्हणजे माझे प्रश्न तुम्ही परस्परच ठरवून टाकता म्हणायच ? दमयंतीबाई, माझ आणि मदयंतीबाईच लग्न व्हाव अस जर तुमच म्हणण असेल, तर मला तुम्हाला स्पष्टच सांगितल पाहिजे की, ही कल्पना माझ्या डोक्यात कधी आलीहि नाही, आज तर नाहीच आणि पुढेहि कधी येणार नाही. "

" पण मदयंतीची तशी कल्पना आहे. दयेचीहि तशीच होती. तुम्ही वचनबद्ध होता याबद्दल तुम्हाला वाईटहि वाटत होत. "

" अगदी खोट. साफ खोट. तुमची बहीण खोट बोलते हें तुम्हाला अजून समजल नाही म्हणायच ? वचन-बद्धतेबद्दल म्हणाल, तर ' मी वचन-बद्ध आहे ' ही प्रतिज्ञा मीं त्याना सांगितली, आणि त्यानी तुम्हाला ती तक्रार म्हणून भासवली. आणि दया तर काय, तिची समजूत घालावी तस म्हणत असे बिचारी. "

दमयंतीला आठवले की मदयंतीहि असेच म्हणाली होती. पण तेव्हा त्या शब्दाचे तिला इतके महत्त्व वाटलें नव्हते. पण आता ? नानासाहेबांच्या स्पष्ट बोलण्याने शंका घेण्याला जागाच राहिली नव्हती. दमयंती असा विचार करीत असताच नानासाहेब पुढे म्हणाले, " उघड उघड दिसणाऱ्या गोष्टींबद्दलहि तुम्ही फार बेपर्वा दिसता दमयंतीबाई. इतक्या निर्विकारपणे मला दूर लोटल एवढ पुरे नाही झाल वाटतं ? आता बहिणीची धोंड माझ्या गळ्यात अडकवायची आहे वाटत ! "

बेपर्वा, निर्विकार हे शब्द ऐकल्यानंतर पुढचे वाक्य दमयंतीला ऐकूच गेले नाही.

" बेपर्वा आणि निर्विकार ! कोण मी ? " दमयंती म्हणाली, आणि आपणास काय वाटते हे नानासाहेबांना कसे समजून सांगावे, किंबहुना तें सांगणें कसें अशक्य आहे, हें मनात आल्यामुळे ती गप्प राहिली.

" मला वाटत हा विषय एवढाच पुरे. " नानासाहेब म्हणाले. त्यांच्या स्वरात हुकमीपणा होता.

" पण असं करून कसं चालेल ! मला या गोष्टीचा निकाल लावलाच

पाहिजे. मदयतीला वाटत, नव्हे तिची खात्री आहे-- नानासाहेब तुम्हीच पाहा बर, हा विषय असाच कसा सोडता येईल ? "

" त्यात काय पाहायच आहे ? तुम्ही आपल्या मार्गाने जा. मदयतीबाई आपल्या पायावर उभ्या राहायला असमर्थ नाहीत. माझा त्याच्याशी काय सबंध ? "

" पण जर मदयतीचा यात काही सबधच नाही, तर तुमच्या माझ्या-मध्ये मग आडव काय आल ? "

" तुमची स्वत:ची तस करण्याची इच्छा. तुम्हाला यत्किंचित् निमित्त सापडलं, अन् तेवढ तुम्हाला पुरल. " नानासाहेब म्हणाले– आपले तीक्ष्ण घारे डोळे दमयतीवर रोखीत ते आव्हानपूर्वक म्हणाले. त्याच्या बोलण्यात थोडा क्रोध दिसत होता– " आणि दमयती, आता तुला एक प्रश्न विचारू का ? तू मदयतीबाईना माझ्यावर का लादलस ? "

" मी ? कधीच नाही. मला कधीही कल्पनाच आली नाही की तुम्हा दोघात-- " दमयती थाबली आणि अत्यत नम्रपणे व सरळपणे म्हणाली– " नाना, ( दमयतीबाईची दमयती होताच सहजच नानासाहेबाचे नाना झाले. ) माझी खात्री होती की तुमच माझ्यावर प्रेम आहे आणि मला अस वाटल की, त्या प्रेमामुळ आपणा दोघात कोणीही येण शक्यच नाही. माझी तशी श्रद्धा होती. अर्थात् असा दृढविश्वास ठेवण्याचा माझा अधिकार नव्हता. "

" आणि तुझी ही श्रद्धा, हा दृढविश्वास, नाहीसा केव्हा आणि कशा-मुळ झाला ? " नानासाहेब आपल्या उभ्या चित्राच्या पुढेच बसले होते. दमयतीला ती रात्र आठवली. त्या दिवशी मदयती व नानासाहेब, दोघा-शीही आपणास सामना करावा लागत आहे असे वाटलें होतें– आज नाना-साहेब व त्याचें प्रतिबिब याच्याशीं. नानासाहेबाच्या रुबाबदार चेहऱ्या-वरील शीर न शीर स्पष्ट दिसत होती. ती म्हणाली, " मदयतीन मला सागितल, तेव्हा माझा विश्वास डळमळला नाही. दयेन सागितलं, तेव्हाही माझी श्रद्धा ढळली नाही. पण मी तुमच्याशीं जेव्हा मुबईत बोललें आणि तुम्हीं कोणत्याहि गोष्टीचा निषेध केला नाही, तेव्हा माझा विश्वास उडाला.

मी विलक्षण प्रेम करू शकत नाहीं, असं तुम्हीं अनेक वार मला सागि-तलं होतं. आणि त्याबरोबरच असं विलक्षण प्रेम करणारं कुणी भेटलं तर तुमचं मन चलबिचल होण्याचा संभव आहे, असहि तुम्ही म्हणाला होता. मला त्या दिवशी वाटलं, मदयंती तुम्हाला तशी सापडली म्हणून. पण आज जेव्हा मी ऐकते आहे की मदयंतीचा काही संबंधच नाही, तेव्हा मला काही कळेनासच झालं आहे."

एवढें बोलून दमयंतीने आपले दोन्ही हात एकात एक घट्ट गुतवून ठेविले. तिच्या चेहऱ्यावर चमत्कारिक दुःख दिसू लागलें डोळ्याच्या कडा ओल्या झाल्या. ज्या स्त्रीची रदबदली करण्यासाठी म्हणून तिने उपक्रम केला होता, तिची तिला पूर्णपणे विस्मृति पडली. ती अगदी मोकळ्या मनाने म्हणाली, "नाना, कृपा करून अगदी खरं खरं काय झालं असेल तें सागा. सारा असा गोधळ झाला आहे. ही गुतागुत सोडवायचा मार्ग एकच आहे. आणि तो म्हणजे खरं खरं काय आहे हें समजणं."

"ही सारी तुझी बेपर्वाई, तुझा मूर्खपणा." नानासाहेबानी खाड्दिशीं उत्तर दिले. "माझं म्हणणं, साधा शिष्टाचार, उघड व्यवहारज्ञान, या साऱ्या गोष्टींकडे दुर्लक्ष करून, निव्वळ हट्टानं आपणा साऱ्यात तू ही नागीण आणून सोडलीस, त्याचा हा सारा दुष्परिणाम. माझी तुला किती पर्वा होती हे यावरून मला कळलं. मदयंती मला आकर्षक वाटली. तिनं माझं कुतूहल जागृत केलं. अगदी खरं आणि स्पष्ट सागायचं तर, असहि म्हणता येईल की, थोडा तुझ्यावर सूड उगवावा, तुझ्या असूयेला डिंवचावं, ही भावनाही तिच्यामुळं माझ्या मनात उत्पन्न झाली. आणि या साऱ्या गोष्टींमुळं– विस्तवाजवळ ठेवलेल्या तुपाप्रमाणं– मी थोडा विरघळलों, चळलो. एकदाच, फक्त एकदाच. मीं लगेच स्वतःला सावरलं. पण तू मात्र कायमची दुरावलीस."

नानासाहेबाच्या तीक्ष्ण घाऱ्या डोळ्याची दमयतीला नेहमीच भीति वाटत असे. पण आज त्या डोळ्यातून जे कटु दुःख, एकातिक, एकटेपणाचें जें दुःख दिसत होते, ते पाहून दमयतीला भयकर भीति वाटली. नानासाहेब आपणापासून दुरावले या कल्पनेने आपणास त्या दिवशीं मुबईस काय वाटलें

होते याची तिला आठवण झाली. तिच्या अंतःकरणात सहानुभूतीची लाट उसळली. आपण सोसलेला त्रास, भोगलेले दुःख, केलेले मानसिक मथन व शेवटी मिळविलेला वासनाजय– सारे व्यर्थच. पण हेच जर नानासाहेब त्या दिवशी बोलते तर? पण आता काय? तिच्या मनातील ती भावना मृतप्राय झाली होती. तिच्यात नवचैतन्य उत्पन्न होणे तिला शक्यच वाटले नाही.

रत्नपूरचा, नानासाहेबाचा, फार काय, आपल्या त्या मृतप्राय प्रेमाचा निरोप घेण्यासाठी ती उठली. नेहमीच्या सवयीप्रमाणे तिने आपला पदर सावरला व डोक्यावरून घेतला. गुडघ्याखाली लुगड्यावरून एकदा हात झटकला व समोरच्या टेबलावरील आपली हातपिशवी उचलली. या जाण्याच्या तयारींत आपल्या नेहमीच्या आकर्षक ढबीत तिला उभी राहिलेली पाहून व तिच्या दृष्टीत दिसून येणारे दुःख पाहून नानासाहेबांची स्थिरता डळमळू लागली. ते कंपित स्वरात म्हणाले–– " तुझी बहीण– तिच्याबद्दल तुला असं वाटलंच कसं?"

" नाना, तुमच्या क्षणिक आकर्षणापलिकडे तुम्हाला तिच्याबद्दल काही– अगदी काही वाटलं नाही?"

" कसं वाटलं असेल? का वाटावं?" त्यांनी उलट प्रश्न टाकला

" म्हणजे हा सारा गोंधळ झाला, तरी तुमच्यात आणि माझ्यात कोणी आडवं आलंच नाही?"

" कसं येणार?"

दमयंतीने सुस्कारा सोडला. " पण मग, मी तुम्हाला कधी दुरावलेच नव्हते. फक्त तुमच्या मर्जीविरुद्ध तुम्हाला अडवून ठेवावं असं मला वाटलं नाही." हे शब्द न कळत तिच्या तोंडावाटे बाहेर पडले. तिच्या सुप्त व लुप्त विचारांचा तिच्या मुखावाटे व्यक्त झालेला तो प्रतिध्वनि होता.

' तुमच्यात आणि माझ्यात कोणी आडवं आलंच नाही, कसं येणार, पण मग, मी कधी दुरावलेच नव्हते.' या वाक्याचा प्रतिध्वनि वातावरणात सारखा घुमू लागला, दरवळणाऱ्या सुगंधाप्रमाणे तो पसरू लागला, त्याचा परिणाम घडून येऊ लागला. नानासाहेब व दमयंती एकमेकाकडे पाहू लागली. या सत्याच्या ' क्ष ' किरणामुळे एकाच्या अभिमानाने व

दुसऱ्याच्या भोळेपणाने, गैरसमजाचा केवढा प्रचंड डोंगर मध्ये आडवा आला होता, तो स्पष्ट दिसू लागला.

दमयंतीची बोटे हळूहळू हात पिशवीतची साखळी सैल करीत होती. ती अगदी क्षीण स्वराने म्हणाली— "पण आता काय उपयोग ? वेळ निघून गेली."

तिने पिशवीतून एक लहानशी किल्ली काढली, "नाना, क्षमा करा. मला फार वाईट वाटत. पण ही मला तुमच्या स्वाधीन केलीच पाहिजे. हिची पेटी, जी खोली माझ्याकडे होती, तिच्यात ठेवली आहे." असे म्हणून तिने ती किल्ली हळूच नानासाहेबापुढे टेबलावर ठेविली. हेतु हा की, आपल्या हातून ती घेण्याचा प्रसंग नानासाहेबावर येऊ नये.

नानासाहेबानी आपला ओठ जोराने चावला. नानासाहेबाच्या चेहऱ्यावर आजपर्यंत कधी न दिसलेला विकार दिसू लागला. ते एकदम बदललेले दिसू लागले. दमयंतीला वाटले की, ते वृद्ध झाले आहेत. त्याच्या डोक्यातील केसावर आलेला पाढरेपणा तिच्या नजरेस पडला.

ते म्हणाले, "मी नाव जाळून टाकली, त्या नौकागृहाचा नाश केला. एवढ्यावरून तुला काही समजल नाही ?"

"ती मात्र सुंदर सलामी तुम्ही मला दिली." दमयंती स्मित करीत म्हणाली.

अजूनहि नानासाहेबाचा अभिमान त्याना मागे ओढीत होता. तो दमयंतीच्या शरणागतीची वाट पाहात होता. त्यानी काय सांगावयाचे होते, ते सांगितले होते. दोघानाहि काय समजावयाचे ते समजून चुकले होते. यानंतर नानासाहेबाची अपेक्षा होती की, दमयंती आता आपण होऊन आपल्याजवळ येईल. पण त्याऐवजी तिने दागिन्याच्या पेटीची किल्ली आपणापुढे टाकली. तिच्या चेहऱ्याकडे नानासाहेबानी पाहिले. त्यावर दिसून येणाऱ्या करुण व दीन शांततेने भयभीत होऊन त्याचा अभिमान— शरणागति अपेक्षणारा अभिमान— स्वतःच शरण गेला.

ते म्हणाले— "सलामी बिलामी काही नाही. दमयंती, काही झालंहि

नाही, आणि तू जातहि नाहीस. तुला सार समजल ना ? कीं आणखी काही समजायच राहिल आहे ? ”

नानासाहेबाचें सारे अंग थरारत होते. दमयंतीच्या– सर्वथैव दमलेल्या दमयंतीच्याहि– अंगाला दुःखाने कंप सुटला होता. ती म्हणाली– “ नाना, मला शांतपणे जाऊ द्या. कृपा करा. मला इथून नाहीस झालच पाहिजे. ”

आपल्या दुर्दैवावर नानासाहेबाचा विश्वासच बसेना. ते पुढे झाले. त्यानी तिचे दोन्ही हात धरले व त्या कापणाऱ्या हातातून तिची पिशवी त्यानी काढून घेतली. त्याचाहि हात कापतच होता. ते म्हणाले–– “ दमयंती तू जाऊ शकत नाहीस. तें अशक्य आहे. आज तू फार दमलेली दिसतेस. आज विश्रांति घे. आपण उद्या विचार करू. काही एक घडलेल नाही. माझ्या हातून वेडेपणा झाला, पण तो संपला. ”

“ नाना, क्षमा करा. मला गेलच पाहिजे. ”

तिचा हा शेवटला निकाल ऐकून नानासाहेबाचा आग्रह एकदम थांबला. पण त्यानी मोठ्याने प्रश्न केला, “ पण का ? ”

“ ते, मला वाटत, मला तुम्हाला सांगता येणार नाही. ”

नानासाहेबानी तिचे हात सोडले आपल्या मनावरील संयम जात चालला आहे असे त्याना वाटले. त्यानी पुढे विचारिलें, “ तुझ्या मनाने माझा अपराध फार मोठा आहे होय ? अक्षम्य ? अगदी अक्षम्य ? ”

अक्षम्य ! क्षमा न करता येण्यासारखा ! हा शब्द ऐकताच दमयंती म्हणाली– “ नाना, क्षमा करण्यासारख काही घडल आहे असच मला वाटत नाही. मी कठोर आहे, किंवा रागावलें आहे अस समजू नका. माझ्या जाण्याच कारण दुसरंच आहे. ”

“ पण तें आहे तरी काय ? ”

दमयंती मटदिशी खुर्चीवर बसली. टेबलावर कोंपर टेकून तिने आपलें त्रस्त डोकें त्यावर टेकले. पदर किंचित पुढे आल्यामुळे तिचे केंस व श्रांत चेहरा थोडा झाकला गेला होता. ती म्हणाली, “ मी तुम्हाला सांगण्याचा प्रयत्न करून पाहाते. ”

दुःख, आघात, क्रोध, आश्चर्य या नानासाहेबाच्या साऱ्या विकाराना

तिला तोंड द्यावयाचे होते. तिने आपले डोळे मिटून घेतले. आपलें शांत मन शांत केलें व हळूहळू सांगायला आरंभ केला, " नाना, मुंबईला त्या-दिवशीं, तुम्हाला माझ्याबद्दल आता काही वाटत नाही– अशी माझी दृढ समजूत झाली. मला असं वाटू लागलं की, मीं तुम्हाला मुक्त केलंच पाहिजे. मीं तुम्हाला तसं सांगितलं आणि तुम्ही निघून गेलात. पण मग मला कळून आलं तुम्हाला सोडणं किती कठिण आहे तें."

" बरं मग ? " नानासाहेब जोराने म्हणाले.

त्याच्या त्या स्वराने थोडी भयभीत होऊन दमयंती म्हणाली, " नाना, रागावू नका. मला पुरतं सांगू द्या. त्यादिवशी प्रेमाची वासनात्मक, उद्दीपक बाजू– ज्याला तुम्ही विलक्षण प्रेम म्हणत आहात– ती मला समजली. त्या विलक्षण प्रेमाने केवढा आघात बसू शकतो हे मला त्या दिवशीं कळलं. त्या आघातापेक्षा मृत्यु बरा असं मला वाटू लागलं. मी वेडी झाले. वेड्या-सारखी समुद्रकांठी तर उन्हात जाऊन मी बसले, सडकांवरून तर वणवण हिंडले, तुमच्या हॉटेलच्या दारासमोर दूर भिकारणीसारखी तर उभी राहिलें. एक ना दोन. शेवटीं अगदी दमून मी घरीं आलें आणि अंतःकरणपूर्वक ईश्वराची करुणा भाकली की, " देवा ! सोडव या विलक्षण प्रेमातून. "
या शेवटल्या शब्दावर दमयंतीने थोडा विराम केला, डोळे मिटले व ती पुढे म्हणाली, " त्या रात्रीं मी त्या विलक्षण प्रेमाशी झगडले. तुम्हाला, मदयंतीला, दयेला, कोणालाहि माझ्याकडून दुःख पोचू नये, मी पुन्हा रत्नपूरला पाऊलहि टाकू नये या इच्छेने, मी खूप मनोमंथन केलं, अंत:-करणाशीं भांडले. नाना, मी रागावले नाही नाहीतर हे सारं मीं तुम्हाला सांगितलंच नसतं. "

नानासाहेबांनी विलक्षण खेदजनक सुस्कारा सोडला व ते खिडकीशीं जाऊन उभे राहिले.

दमयंती पुढे म्हणाली–– " तुमच्या तारेप्रमाणं मी इथं आलें, ही गोष्ट खरी. पण मी आले ती पार बदललेली आले. "

" कोणत्या दृष्टीनं ? माझ्याविषयींच्या ? " नानासाहेब तिच्याकडे वळून एकदम म्हणाले.

" मला वाटत," दमयती हळूच म्हणाली, " त्या रात्रीं माझी प्रार्थना परमेश्वरानं ऐकली. माझ्यातलं काही तरी पार नाहीसं झाल. कदाचित् माझ अंतःकरणच मृत झाल असेल. मला कळत नाही. मी अगदी निर्बल झालें आहें. दुःख आणि करुणा याशिवाय माझ्या मनात काही राहिलच नाही, अस मला वाटत. "

दमयतीचें बोलणें संपलें. नानासाहेबाना सागताना देखील, दयेच्या मरणाच्या आदल्या दिवशींची मदयंतीची हीन दशा पाहून उरले–सुरलेंही वासनात्मक प्रेम कसें पुरले गेले, हें ती नानासाहेबाना सागू शकली नाही.

तिला तशी खुर्चीत बसलेली पाहून नानासाहेबाना तिची पूर्वींची सारी वागणूक आठवली. ही किती शुद्ध आहे, किती उदार आहे, आणि हिचें मन एकाद्या ध्येयाच्या मागे लागले की तें केवढा स्वार्थत्याग करू शकतें, याची त्याना पूर्ण जाणीव झाली. आपण हिच्यावर प्रेम करायला सर्वथैव अयोग्य आहोत, असें त्याना वाटू लागलें. त्याचा अभिमान, डौल, गर्व, सारें काही मातींत जणू मिसळून गेले. हिच्यामुळे आपणास केवढा आधार वाटत होता, आणि ही गेली की आपण कसे एकाकी होऊ, एवढाच विचार त्याच्या डोक्यात शिल्लक राहिला.

ते फक्त एवढेच म्हणाले— " दमयती, मला थोडा वेळ दे. दोन दिवस. निदान एक दिवस तरी. या स्थितींत तू आजच्या आज जाण मला बर वाटत नाही. तुझ्यासाठी मीं किती दिवस वाट पाहिली याचा विचार कर. वर्षेच्या वर्षे. आणि मी फक्त मागतों आहे एकच दिवस. "

या म्हणण्यास दमयतीजवळ उत्तरच नव्हते. तरी पण, तिला आता मदयंतीने व आपण, दोघीनींहि, एक दिवसहि येथे राहावें हे पटेना. तिने आपली मान नकारार्थी हलविली व आपली पिशवी उचलून हातात घेतली.

' आता येतें मी. ' असें म्हणणेहि तिच्या जिवावर आलें. नानासाहेब दाराच्या व तिच्या मध्येच उभे होते. ती जेव्हा दाराकडे वळली तेव्हा एक अक्षरहि न बोलता आणि वर दृष्टीहि न उचलता, भीत भीत नाना-साहेबानी तिच्या हाताला हात लावला. नानासाहेबासारख्या मानी माणसाने

इतकें निरभिमान, लज्जित आणि दुःखित व्हावें याचे तिच्या मनाला अत्यंत वाईट वाटले. त्याचा हात थरथर कापत होता.

दमयंतीने दीर्घ उसासा सोडला ती हळूच म्हणाली— "नाना, यापुढ तुम्ही अगदी एकाकी होणार ! होय ना ?"

नानासाहेबानी उत्तर देण्याचा प्रयत्न केला नाही. ते शांत राहिले. तिच्या मनात चालेल्या खळबळीत आपण ढवळाढवळ न करणेंच बरे, असे त्याच्या मनाने घेतले. त्यानी तो हात नुसता तोंडाशीं नेला व हळूच आपल्या हृदयावर ठेवला.

नानासाहेबाचे हृदय केवढ्याने तरी धडकत होते ! पण तितक्यात त्या पेक्षाहि मोठ्याने धाड्दिशीं दार उघडले गेलें व मदयंतीने आत प्रवेश केला.

---

# १९

मदयंतीच्या मनास अलीकडे विचार करण्यापलीकडे दुसरे कामच राहिले नव्हतें.

लहानपणापासून गरिबींत आणि काबाडकष्टात दिवस घालवावे लागल्यामुळे तिच्या मनाच्या कारखान्यात नेहमी उपयोगाला पडणाऱ्या स्वार्थमूलक विचारापेक्षा निराळे असे उच्च विचार कधी घडवलेच गेले नव्हते. तिचे विचार सामान्यत्वाने जसे साऱ्या निर्धन कामकरी वर्गाचे असतात तसेच होते. जगात जिकडे पाहावे तिकडे स्वार्थ, जीवनकलह आणि 'ज्याच्या हातीं ससा तो पारधी' हाच न्याय. गरीबाचा श्रीमताशीं संबंध यावयाचा तो फक्त त्याच्यावळून पैसा घेण्याच्या वेळेस. मग तो पैसा आपल्या काबाडकष्टाबद्दल असो कीं आपली गरज भागविण्यासाठी त्याच्याकडून उसना घेतलेला असो. गरिबाचे मालक किंवा सावकार हेच श्रीमंत. पण हे कधी कष्ट करताना दिसत

नाहीत. मग याच्याजवळ पैसा कुठून आला? काबाडकष्टाने, निढळाच्या घामाने, पैसा मिळवून कधीच कोणी श्रीमत होत नाही. श्रीमती ही गरिबाना फसवून किंवा लुबाडूनच प्राप्त होत असते. श्रीमताजवळ काही अधिक असते म्हणून ते श्रीमत होतात असे नाही, तर ते लबाडीनेच श्रीमत होतात. या लबाड लोकाची संतति जरी लबाडी करीत नसली तरी त्याची श्रीमती नुसती ती त्याच्या घराण्यात जन्माला आली म्हणून असते. जन्म काही कोणाच्या हातचा नाही. श्रीमत जसे पैशाच्या जोरावर हवे ते मिळवितात तसे आपणाजवळ जे काही असेल त्याच्या जोरावर आपणहि हवें ते, हव्या त्या तऱ्हेने मिळविण्यास हरकत नाही. पैसा सोडला की, आपण आणि श्रीमत सारखेच. उलट, कित्येक वेळा खरे शरीरसौष्ठव, सौंदर्य, आरोग्य, शारीरिक सामर्थ्य गरिबातच श्रीमतापेक्षा अधिक. तेव्हा ते जसे आपल्या पैशाचा आपणास लुबाडण्याच्या कामात उपयोग करितात, तसा आपल्याजवळ असलेल्या गोष्टीचा आपणहि त्याना लुबाडण्याच्या कामी उपयोग करण्यास हरकत नाही, एवढीच गरिबाची नीति, नागाव सोडीपर्यंत तिला माहीत होती.

नागाव सोडल्यावर जेव्हा दमयंतीबरोबर ती या श्रीमत व सभ्य गणल्या जाणाऱ्या लोकात मिसळू लागली, तेव्हा आपण निराळ्या प्रकारच्या लोकात येऊन पडलो याची जाणीव तिला झाली. पण हा निराळेपणा नुसत्या पैशामुळे घडून आलेला आहे, अशी तिची खात्री असल्यामुळे, पैसा आपणास मिळाला की आपण तो निराळेपणा घालवू शकू, असेच तिला वाटत होते. परंतु जेव्हा या लोकाचा अधिकाधिक अनुभव येऊ लागला, तेव्हा हे लोक नुसत्या पैशानेच नव्हेत, तर इतर गोष्टीतहि निराळे आहेत असे तिला वाटू लागले. मनोविकाराचे संयमन, दुसऱ्याने अपकार केला असतानाहि तो विसरून त्यावर उपकार करण्याची प्रवृत्ति, या दोन गोष्टींचा अभाव तर मदयंतीला आपणात तीव्रतेने जाणवू लागला. नुकताच, अगदी मरणाच्या आधी, हिच्या साऱ्या गोष्टी समजूनहि दयेने जेव्हा हिला तो बहुमूल्य रत्नजडित ताईत दिला, तेव्हा तर मदयंती थक्कच झाली होती. पण तिला हा एक प्रकारचा वेडेपणाच वाटे. आणि कधी कधी तर हे लोक असे वागतात यातहि त्याचा काही तरी स्वार्थ असलाच पाहिजे असेंहि तिला वाटे. केवळ

तो स्वार्थ काय असावा, हे तिला समजत नसे, आणि म्हणूनच ती कधी तसे बोलून दाखवीत नसे.

मदयतीची सारी भिस्त श्रीमताच्या या वेडेपणावरच होती. या वेडेपणामुळेच दमयती आपणाबद्दल नानासाहेबाजवळ रदबदली करील असें तिला वाटले व दमयतीने ते कबूल केल्यावर तिला दमयतीच्या वेडेपणाचें हसूहि आलें. दमयती काय बोलते ते ऐकण्यासाठीच मदयती, आपल्या चोरून ऐकण्याच्या सवयीस अनुसरून, दाराबाहेर येऊन उभी होती. पण तिला फारसे ऐकू गेले नाही. यामुळे कटाळून, त्रासून व थोडी सतापून जेव्हा तिने धाड्दिशी दार उघडले तेव्हा दमयतीचा हात नानासाहेबाच्या छातीवर ठेवलेला पाहून मदयती क्षणभर चकितच झाली. लगेच दमयती आणि नानासाहेब वरून दिसतात तसे नाहीत, तर आपल्यासारखेच स्वार्थी आहेत, ही कल्पना तिच्या डोक्यात लकाकली. तिचा राग अनावर झाला. उजव्या बगलेखालून आपला पदर घट्ट ओढीत तिने विचारिले, "दमयतीबाई, तुम्ही जाणार आहात ना आज?"

"नाही." नानासाहेबानीच उत्तर दिले.

"असं?" मदयती खोचक दृष्टीने दमयतीकडे पाहात म्हणाली— "म्हणजे मग मला जे काय कबूल केल होत ते सार फसविण्यासाठीच होत वाटत?"

हा मारा चुकविण्यासाठी दमयतीने तोंड बाजूस केले. नानासाहेबाचें प्रेम आपणावर होतें, अजूनहि आहे, आणि असे असूनहि या बाईने त्या प्रेमाबद्दल आपल्या मनात अशी शका उत्पन्न करावी की ज्यामुळे तें मृतप्राय व्हावे, ही गोष्ट कळल्यामुळे आज मदयतीकडे तिची पाहण्याची दृष्टि बदलली होती. मदयतीबद्दल अनुकपा तिला अजूनहि वाटत होती. पण ती आता निराळ्या प्रकारची होती, एवढे मात्र खरें.

ती हळूच म्हणाली, "मदयती, यापुढ मला छळू नकोस. सहनशक्तीलाहि सीमा असते. आपण सारे आता त्या सीमेवर पोचलो आहोत."

गप्प राहण्यासाठी ही एक प्रकारे प्रार्थनाच होती. पण मदयती कुठली

समजायला ! तिरस्कारदर्शक हास्य करून ती म्हणाली, “ जर तुम्हा उभयताचहि परस्परावर प्रेम होत, तर मला तस पूर्वीच स्पष्ट सांगायला हव होत. ” ‘ पूर्वीच ’ हा शब्द उच्चारताना तिने असा आविर्भाव प्रकट केला की कशाच्यापूर्वी हे सर्वांना सहज समजावे.

नानासाहेब उत्तर देण्याच्या बेतात होते. पण दमयती बोलत आहेसे पाहून ते थांबले. दमयती म्हणाली— “ आता काही बोलू नकोस पाहू. आपण सारे आता मौन धरू या. ” एकादी असह्य आपत्ति टाळण्यासाठी जसे करावे तसा भाव दमयतीच्या चेहऱ्यावर दिसत होता.

“ आज तुम्ही माझ तोंड बंद का करताहात ? कालपर्यंत तुम्ही मला स्पष्टपणे बोलू देत होता. ” मदयती म्हणाली.

“ हो. कारण, कालपर्यंत मला सार कळल नव्हत. आता सार समजल आहे. आता शब्दाची आवश्यकताच उरली नाही. ”

मदयतीने कठोर दृष्टीने नानासाहेबाकडे पाहून म्हटले, “ आणि तुम्हाला काही बोलायच नाही का ? ”

ज्या एका शब्दाने नानासाहेबानी तिला प्रथम उत्तर दिले होते, त्याच शब्दाने आताही दिले, “ नाही. ”

“ आणि मी गप्प राहाव अशी तुमचीहि अपेक्षा असेल नाही ? ” मदयतीने प्रश्न केला. तिच्या स्वरात आणि आविर्भावात इतका उर्मटपणा, असा उपमर्द व एवढा घातकीपणा भरला होता की, दमयतीच्या-- कधी न रागावणाऱ्या दमयतीच्या-- मनातहि रागाचा संचार झाला. ती हुकमी आवाजात म्हणाली— “ तू आता इथून जा पाहू कशी ! मी मग, मग तुझ्याशी बोलेन. ”

आपणास फसविणारी, स्वतःचें वचन मोडणारी दमयती उलट आपणावरच रागावते हे पाहून मदयती बेभान झाली. आपण काय व कोणाशीं बोलतों याचा त्या संपाठ्यात तिला विचार राहिला नाही. संतापाने बेफाम होऊन ती म्हणाली— “ पण मला जे काय बोलायच आहे, तें आता या क्षणीच मी बोलणार आहें. मी तुझ्याशीं स्पष्टपणे वागलें आणि त्याचा

परिणाम म्हणजे तू मला बनवलस अ ? आणि हेच तुझ स्वार्थत्यागाच, निःस्वार्थीपणाच ढोंग. नाही का ?"

मदयती बेभान झाली आहे, यावेळीं तिच्याशी बोलण्यात अर्थ नाही, असे समजून नानासाहेब दमयतीला म्हणाले, "चल ग इथून." त्याचे शब्द स्नेहाने आर्द्र असे होते. पण मदयती एकदम दारात जाऊन उभी राहिली व ओरडून म्हणाली–– "नाही. मी तुला इथून अशी जाऊ देणार नाही. पैसा, नुसता पैसा तोंडावर फेकला की आपण सुटलो, अस वाटल नाही का तुला ? पैशापेक्षा किती तरी तू माझ देण आहेस. मला सिद्ध करता येत नाही, पण कल्पना करता येते. माझ्या आईन तुझ्याशीं वागताना, तुला घराबाहेर घालवून देताना— 'तू चोर, तुझा बाप चोर' म्हणून जे शब्द उच्चारले होते, त्याबद्दल मला आज समाधान वाटत आहे. कारण तू आपल्या कृतीन आता आपल्या स्वतःला चोरट्या बापाची चोरटी मुलगी, अस सिद्ध केल आहेस."

मदयती फाड फाड असे बोलून गेली खरी. ती कदाचित् आणखीहि काही बोलली असती. पण नानासाहेबाचा "चूप" हा सतापातिरेकाने उच्च स्वरात उच्चारलेला एकच शब्द ऐकताच तिचे तोंड बद झाले, आणि नानासाहेबाकडे पाहिल्याबरोबर तर तिची बोबडीच वळली. नानासाहेबाच्या डोळयातून जणू काही ठिणग्या बाहेर पडत होत्या. एकाद्या जललहरीचा छप् छप् असा मद शब्द जसा घोंघावत येणाऱ्या लाटेच्या गर्जनेने लुप्त होतो, तसे झाले.

दमयती व मदयती, दोघींचेहि लक्ष्य बोलण्याच्या भरात एकमेकींकडे असल्यामुळे ते नानासाहेबाकडे वळले नव्हते. नाही तर याच्यापूर्वीच नानासाहेबाचा भडकत चाललेला क्रोधाग्नि पाहून त्यानी आवरते घेतले असते. मदयतीचे तोंड एकदम गप्प करण्यासाठी नानासाहेबानी आपल्या स्वरात, अगदी हलकट माणसाशीं वागताना त्याना दाबण्यासाठी जो कठोरपणा आणावा लागतो, तो आणला होता. शाळेच्या टेबलावर पतोजीने जोराने छडी आपटताच मुलाची जशी गाळण उडावी तशी मदयतीची उडली होती.

"चालती होतेस कीं नाही इथून ?" नानासाहेबाची गर्जना झाली.

मदयंतीची गाळण उडालीच होती, पण थोडे सावरून ती म्हणाली– " नाही, मी जाणार नाही, सरदारसाहेब."

मदयंती थोडी ताळ्यावर आलेली पाहताच नानासाहेबांनीहि थोडें आत्मसंयमन केलें. पण सभ्य भाषेत हिला सांगून समजावयाचे नाही म्हणून तिला स्पष्ट समजेल अशा भाषेत हात लांब पसरून तर्जनीने दाखवीत ते म्हणाले– " चालती हो माझ्या घरातून. आताच्या आता, या क्षणीं. खबरदार आणखी लबाड्याच गाठोडं इथ उघडीत बसलीस तर ! "

मदयंतीची नजर खाली गेली. ती हळूच कुरकुरत म्हणाली, " पण मी जाऊ कुठे ? "

नानासाहेब करड्या आवाजाने म्हणाले, ' तें मला माहीत नाही. पुष्कळ झाली आता तुझी लबाडी. ती मी इतके दिवस सहन केली दमयंतीसाठी. पण आता यापुढ मी ती मुळीच चालू देणार नाहीं. "

" पण मीं अस केल तरी काय ? " ती पुटपुटली.

दमयंतीला हा सारा प्रकार अभूतपूर्व होता. ती हळूच म्हणाली, " जा, जा बाई आता या वेळेला तरी. नाना काय बोलताहेत हें यावेळेस रागामुळ त्याच त्यानाच कळत नसेल. "

" सार कळत आहे मला. " नानासाहेब गरजले. " दमयंती, या पुढ मऊपणा मी मुळींच चालू देणार नाहीं. तुझ्या मऊपणाचा झाला एवढा परिणाम पुरे. हिला आत्ताच्या आत्ता गाशा गुडाळलाच पाहिजे. संध्याकाळच्या आत हिला इथून काळ केलच पाहिजे. "

मदयंती निराशेने अगदी वेडी झाली होती. आपण करायला गेलो काय आणि झाले काय ? या दोघांवरहि तिने मोठ्या धूर्तपणाने अधिकार जमविला होता. यांच्याच शिष्टाचाराच्या, सभ्यपणाच्या कल्पनांचे जाळे विणून त्यात तिने यांना आवळले होतें. पण तिच्या हें लक्षात आले नाही की, आवळताना गाठ जितकी घट्ट होणे शक्य होते तितकी होऊन गेली होती. एकादा आणखी हिसका बसताच ती तुटण्याचा– ताडकन तुटण्याचा-संभव होता. काय बोलावे हे न सुचून ती म्हणाली– " पण माझ्यावर तुमचा आरोप तरी काय आहे ? "

नानासाहेबाना आता स्पष्ट समजले होतें की, येथे सभ्य वागणुकीचा काही उपयोग नाही. ठोशास ठोसाच येथे ठेवावा लागणार. म्हणून ते एकदम रागाच्या आवेशाने म्हणाले, "तुला आरोप ऐकायचाच आहे काय? ठीक! ऐक तर. तुझ्यावर मुख्य आरोप असा की, तू हलकट आणि पाजी आहेस. आपल्या घाणेरड्या कृतींनी तू आमच्या साऱ्यात बिब्बा घातला आहेस. दमयतीच्या मूर्खपणाच्या औदार्यरूपी अन्नवस्त्रावर, तू प्रेतावर तुटून पडणाऱ्या गिधाडीप्रमाणे पोसली आहेस. आणखी ऐकायचं आहे काही?"

आपले शेवटले अस्त्र उपसीत मदयती म्हणाली, "आणि मग नावेंतल्या कृतीबद्दल?"

"त्याविषयींहि मला जें काय सागायच ते सारं मीं दमयतीला स्पष्ट सागितल आहे. चोरची चोर आणि वरून शिरजोर. चालती होतेस कीं नाही इथून— की—"

पण मदयती जागची हालली नाही. नानासाहेब दमयतीकडे वळून म्हणाले, "कर तिला दूर दारातून."

दमयती बिचारी हात चोळू लागली. ती म्हणाली, "आता तुला कस सागू बाई, म्हणजे तू दूर होशील? तुला कळत नाही कसं की, आता साऱ्या गोष्टीचा निकाल लागला आहे म्हणून!"

"निकाल!" मदयती पुटपुटली. "म्हणजे तुम्हीही माझ्यावर उठलात म्हणायच!"

"तू आता इथून जावस एवढीच माझी इच्छा आहे."

"एकदम. आजच्या आज. माझ्या वाड्याच्या बाहेर, माझ्या दृष्टीच्या आड." नानासाहेबानी हुकूम फर्माविला.

नानासाहेबाच्या निघून जा म्हणण्याचा मदयतीला राग आला नव्हता. दमयतीने आपणास जा म्हणावें याचाच तिला खरा राग आला होता. तिच्याकडून पुन्हा काही खटपट करवून पाहावी म्हणून ती म्हणाली. "दमयतीबाई, तुम्ही तरी याना काही समजूत सागा." पण दमयती म्हणाली, "मी काय सागणार? माझा काय अधिकार? घर त्याच आहे."

"म्हणजे तुम्हाला काही सांगायचं नाही असं स्पष्ट सांगा ना." एवढे म्हणून तिने आपलें शेवटले ब्रह्मास्त्र काढले. "तुम्हाला वाटतं की, यांनी जे काही सांगितलं तेच खरं आहे सारं ?"

नानासाहेब दमयंतीकडे पाहात म्हणाले, "सांग ना तुला काय वाटतं ते ?" तिला त्यांचा आशय समजला. नानासाहेबांचे करणे न्यायसंगत आणि मनःपूत होते. या दोघांमध्ये जणू आपणास आता निवड करावयाची आहे, हें तिला कळले. आणि ही निवड म्हणजे प्रेम व द्वेष यामधील होती.

ती हळूच मदयंतीला म्हणाली, "मला वाटतं, नानांचं म्हणणं आणि करणं बरोबर आहे. त्यांनी जे मला सांगितलं ते यथार्थच असलं पाहिजे. तू आता जावंस आणि पुन्हा आमची कोणाची भेट घेऊं नयेस असं मला वाटतं."

दमयंतीसारख्या स्त्रीच्या तोंडून असे शब्द निघण्याची पाळी यावी, यांत आपला प्रचण्ड पराभव आहे, आपण हे काय केले, याचें तिचें तिलाच आश्चर्य वाटू लागले. पण आता काय ? तिच्या व्यूहाचा आधारच गेल्या-बरोबर तिचा उमर्टपणा कोलमडून पडला. ती दारातून दूर झाली.

नानासाहेब खोलीतून ताडकन् निघून गेले. पण जाताना मदयंतीला बजावण्यास विसरले नाहीत— "लक्ष्यात आहे ना तुला आजच्या आज इथून गेलंच पाहिजे हे ?"

नानासाहेबांनी बाहेर जाऊन दार लोटल्यावर मदयंती म्हणाली, "ऐक-लंत ना तुम्हीं सारं हे ?"

दमयंतीने उत्तर दिले, "ते ठरविणं त्यांचं काम आहे. मला पण वाटतं की त्यांचं करणं बरोबर आहे. नाही तरी तू फारच ताणलंस सार्‍यांना."

मदयंतीलाहि हे बरोबर पटले. तिने त्यांचा विलक्षण कोंडमारा केला आणि मग आत्मसंरक्षणासाठी म्हणून त्यांना तिच्यावर उलटावे लागले. या शेवट-च्या प्रवेशाने तर सर्वांवर कळसच चढविला. दमयंतीला वाटले— आपण शुद्ध मनाने नानासाहेबांचा निरोप घेत होतो, तो प्रसंगहि हिने अपवित्र करून टाकला. ही दाराशीं सारे ऐकत उभी असावी या खात्रीमुळे तर दमयंतीचे मन तिच्याविषयीं पूर्णपणे विटले.

तरी पण तिने मदयतीला जवळ बोलावून म्हटले—“ मदयती, आता आपण दोघी एका ठिकाणीं राहूच शकत नाही. तुला जे काय दिल आहे ते घेऊन गड्याबरोबर तू मोटारीवर जा. मुबईला तुझ्या ओळखीच कुणी नसेलच. तिथल्या महिला-पथिकाश्रमात उतर. सध्या काही दिवस पुरेसे पैसे तुझ्याजवळ आहेतच. लवकरच मी तुझी काही तरी व्यवस्था करीन.

“ हो, आणखी एक गोष्ट. ते बाबाचे सारे माझ्याजवळ असलेले कागद मी तुझ्याकडेच पाठवून देईन. तू ते सावकाशपणे पाहा आणि आपली खात्री करून घे जा आता. ”

असें म्हणून दमयतीने मदयतीस निरोप दिला. मदयती आपले चबू-गबाळे सारे आटोपून त्या दिवशीच तेथून मुबईस निघून गेली.

---

# २०

आणखी दोन दिवस गेले.

तिसऱ्या दिवशीं सकाळीं स्नान झाल्यावर दमयतीने बाबासाहेबाची गीतेची पोथी उघडली. मुबईस गीतापाठाने तिच्या हृदयाला शाति मिळाल्या दिवसा-पासून ती रोज सकाळीं नियमितपणे गीता वाचू लागली होती. गेल्या दोन दिवसात बाबासाहेबाचे सारे कागद तिने एक एक करून तपासून पाहिले होते. कागदाचे बस्ते नानासाहेबाकडेच होते. कारण, सारी व्यवस्था तेच पाहात असत. दमयतीने कागद नि कागद तपासून पाहिला. पण तिला त्यात काही सापडले नाही. लोकाच्या बोलण्यावरून आपल्या वडिलाबद्दलहि आपणास सशय यावा याबद्दल तिने स्वतःच्या कमकुवत मनाला दोष दिला. यामुळे आज तिचे मन प्रफुल्लित होते, व गीतापाठ थोडा अधिक करायचा तिचा विचार होता. तिचा गीतापाठ सुरू झाला होता.

वाचता-वाचता एक पान उलटल्याबरोबर तिला एक घडी केलेला कागदाचा कपटा सापडला. दमयंतीला आठवण झाली. त्या रात्री मुंबईत डोळ्यांनी गीतावाचन व मनाने विचार-चिंतन चाललें असताना याच कपट्याने तिच्या मनाची गाडी थोडा वेळ थांबविली होती. दमयंतीला तो श्लोकहि आठवला-- ' अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ' आपणच ती घडी तेथून काढून दुसरीकडे ठेविली. पूर्वी तो कागद कोणीं तरी खूण म्हणून ठेविला असेल, पण आपण काही हा तसा ठेविला नव्हता. पोथींत याची अडगळ उगाच कशाला, म्हणून ती तो कागद फाडणार, इतक्यात वाऱ्याच्या एकदम आलेल्या झोताने तो तिच्या हातातून निसटला आणि कोपऱ्यात जाऊन पडला. वाऱ्याने त्याची घडी थोडी उलटली होती व आत काही लिहिल्यासारखे वाटत होते. दमयंतीने वाचीत असलेला श्लोक--

स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशो हि तत् ॥

पुरा केला आणि उठून तो कागद उचलला आतलें अक्षर बाबासाहेबांच्या अक्षरासारखे वाटल्यामुळे तिनें त्या कागदाच्या कपट्याची घडी उलगडली व साफ करून वाचावयास आरंभ केला.

" देवा, मीं केलेल्या पापाचे--कितीहि अप्रत्यक्षपणे किंवा केवढ्याहि अल्प-प्रमाणात का होईना- केलेल्या पापाचे— सख्ख्या भावास- दुराचारी असला तरी त्यास- लुबाडल्याच्या पापाचे— प्रायश्चित्त मी घेतलेच पाहिजे. देवा, हे सारे चारलोकात उघडपणे सांगण्याचे मला सामर्थ्य दे. ते सामर्थ्य तुझ्या अवकृपेने मला प्राप्त न झाले, तर ही गोष्ट केव्हा तरी उघडकीस येवो व ते प्रायश्चित्त मजकडून घेतले जावो-- **धर्म्यो मोहिता.**

दमयंतीच्या डोळ्यापुढे बाबासाहेबांची मूर्ति उभी राहिली. किती प्रेमळ ! त्यांच्या प्रेमछत्राखालीं वाढत असताना- त्यांच्याबद्दल आपली एवढी श्रद्धा असताना- त्या वरून शांत दिसणाऱ्या, त्या शरीराच्या अंतर्मनात केवढा ज्वालामुखी धुमसत होता, याची साक्ष त्या कागदातील एक नि एक शब्द देत होता. काकाचे प्रत्यक्ष दुःख बाबांच्या या अप्रत्यक्ष दुःखापुढे काहीच नाही. शेवटीं केलेल्या सहीने, आपली लीनता, नीचता दाखविणाऱ्या शब्द-

प्रयोगाने, त्या ज्वालामुखीची साक्ष स्पष्टपणे पटत होती. पण आता--?

या प्रश्नापुढे गीता कसची? दमयंतीने पोथी बांधून ठेविली. बांधता बांधता तिच्या डोळ्यापुढे श्लोक दिसला.

' ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति । '

तिच्या हृद्देशातील ईश्वराने तिला आदेश दिला. तिने चटकन् काही निश्चय केला व शुभस्य शीघ्रं या न्यायाने लगेच तो अमलात आणण्याचे ठरविले. ती कागदाची घडी तिने आपल्या हात-पिशवींत घातली भराभर थोडे आवश्यक सामान एका बॅगेत भरले व खोलीबाहेर पडणार, तों नानासाहेब समोर.

" हें काय दमयंती? निघालीस कुठे?" नानासाहेबास काहीच कल्पना नव्हती.

" मुंबईला."

" या वेळी? एकदम? छे."

" नाना, थट्टा नव्हे. मी खरच निघालें आहे."

" मुळीच नाही."

" शपथ आहे माझी तुम्हाला, जर मला अडवाल तर. मुंबईला माझं अत्यंत महत्त्वाचं काम आहे, नी त्यासाठी मला आत्ताच्या आत्ता तांबडतोब गेलंच पाहिजे."

काही तरी विशेष आहे, हें नानासाहेबांस सहजच समजले. दमयंतीच्या एकदर चेहऱ्या-मोहऱ्यावरून, तिच्या बोलण्याच्या स्वरावरून व प्रकारावरून त्यांची खात्री झाली की, काही तरी विशेष गोष्ट घडली असावी. ही वेळ विशेष बोलण्याची नव्हे, असे समजून ते एवढेच म्हणाले-- " बरं तर. मीहि तुझ्याबरोबर येतो."

तिने नानासाहेबांकडे शून्य दृष्टीने पाहिलें. प्रत्येक गोष्ट आपणास त्यांच्या-पासून दूरदूर नेत होती, आणि आता या गोष्टीने तर आपण त्यांच्या जगाच्या बाहेरच जाणार.

" साऱ्या गोष्टीचा निकाल लागला आहे, हें मीं त्याच दिवशीं सांगितलं ना, नाना?"

" हो. पण तरी मला तुझ्याबरोबर राहायला तर काही हरकत नाही ना?"

दमयंतीला फिरत आहेसे वाटले. ती मटदिशी जवळच्या खुर्चीवर बसली व म्हणाली-- " थोडा चहा मागवा ना ?"

" दमयंती, तुला बरं नाही. आज तू कुठच जाऊ शकत नाहीस मी तुला जाऊ देणार नाही. "

नानासाहेबानी चहा मागविला. दमयंती डोळे मिटून स्वस्थ बसली होती. नानासाहेबहि चकार शब्द न बोलता तिच्याकडे पाहात दुसऱ्या खुर्चीवर बसले. चहा आल्यावर त्यानी कप तयार करून तिच्यापुढे ठेविला व "ह, हा घे चहा " म्हणून तिला म्हटले. दमयंतीने डोळे उघडले व घटाघट पेला रिकामा केला. ' आणखी थोडा ?" असे नानासाहेबानी विचारल्यावर हातानेच ' थोडा ' अशी खूण केली. नानासाहेबानी दुसरा अर्धा कप तिच्यासाठी व एक स्वतःसाठी तयार केला. हा अर्धा कप दमयंती अगदी हळूहळू प्याली पहिला कढत असताहि घटाघट, व यावेळीं थोडा निवला असताहि अगदी हळूहळू, यावरून नानासाहेबाना कळून आले की, आपण चहा पीत आहों याची जाणीवच दमयंतीला नसावी.

गड्याने चहाचा ट्रे उचलून नेल्यावर नानासाहेब हळूच म्हणाले—"दमयंती, तुझ्यावर काहीं तरी नव संकट आल आहे नी तें तू मला सागत नाहीस. होय ना ? एवढाहि विश्वास तुझा माझ्यावर नाहीं का ? "

एक क्षणभर तिला असे वाटले की, नानासाहेबाना सारे सागून टाकावें. पण लगेच नानासाहेब काय करतील याची तिला कल्पना आली. त्याच्या पुरुषी व व्यावहारिक स्वभावाचें पर्यवसान होईल पुन्हा शोध करण्यात, चौकशी करण्यात, कायदा काय सागतो हे पाहाण्यात, वकिलाचा सल्ला घेण्यात, आणि शेवटीं थोडा पैसा अधिक देऊन मदयंतीला गप्प करण्यात. पण मदयंती काय म्हणाली होती ? " पैशापेक्षाहि तू माझ देण अधिक लागतेस " म्हणून. नानासाहेबाना हे पटायचें नाही. त्याच्या मनात आपल्याविषयी गाढ प्रेम आहे. आज ना उद्या आपले लग्न होईल असें त्याना अजूनहि वाटत आहे, व त्यामुळे आपल्या भावी वधूवर आणि तिच्या वाडिलावर असा डाग आलेला त्याना आवडणार नाही. शिवाय ही जबाबदारी

आपली आहे. आपल्या मित्रपणामुळे हा भार आपण त्यांच्यावर कां टाकावा ? असेंहि तिला वाटलें.

दमयंती असा विचार करीत असता नानासाहेबहि आपल्याच विचारांत मग्न होते. ते पुन्हा म्हणाले, " मी मुंबईला तुझ्याबरोबर येईन आणि जिथं तुला जायचं असेल तिथं जाताना तुझ्याबरोबर राहीन. "

दमयंतीने निषेधार्थी मान हालविली. ती म्हणाली--" तुम्हांला इथंच राहिलं पाहिजे. माझ्याबरोबर या वेळीं तरी कोणी नको अगदी. "

" बरं तर मग. मुंबईच काम संपल्याबरोबर इथं येण्याचं वचन दे. " नानासाहेब झटकन् म्हणाले.

दमयंतीने आपल्या हाताचीं बोटांत बोटें अडकाविलीं. नानासाहेबांना कसे कळत नाहीं कीं, या क्षणीं जर आपल्या अंतःकरणात त्यांना शिरतां आलें असतें तर त्यांना दिसलें असतें की आपल्या आशा, आकांक्षा, वासना, सर्व जळून कशा खाक झाल्या आहेत तें.

ती बेचैनपणे म्हणाली, " अंहं, मला तसहि वचन देता येत नाही. "

" म्हणजे मी तुला मुकणार, असं तुझं म्हणणं आहे काय ? "

" मी मुकलेलीच आहे, आणि आता तर तुम्हाला मला पूर्णपणे मुकलंच पाहिजे. "

" पण झालं काय ? " नानासाहेब जरा त्रासिक स्वराने म्हणाले. " आज दोन दिवस तूं कागद पाहाते आहेस त्यात कांही आपणाविरुद्ध मिळालं कीं काय ? "

" आपणाविरुद्ध काहीच नाही. तें सारं त्या दिवशींच संपलं होतं." दमयंती विवरून सांगण्याचा प्रयत्न करीत होती. " माझं मन किनई, नाना, अगदी निष्प्रेम झालं आहे. मला फार मोठं दुःख होतं आहे आणि तें सहन करण्याची शक्ति देव देईल कीं नाही हीहि शंका वाटते आहे. "

" दमयंती, तुझ्यावर खरोखरच कांही संकट आलं आहे, आणि त्यासाठीच तूं मला दूर लोटते आहेस ना ? पण मला तें संकट समजायला काय हरकत आहे ? आहे का काही ?"

नानासाहेबांच्या प्रश्नाला उत्तर देणें दमयंतीला प्राप्तच होतें. त्यांची

अभिमानी वृत्ति, व्यावहारिक दृष्टि, सभ्यपणाची व नीतीची कल्पना, त्याचा संकुचित व रागीट स्वभाव— या साऱ्याची तिला या रत्नपूरला राहाण्यात जितकी माहिती झाली होती, तितकी पूर्वीच्या हसण्या-खेळण्याच्या दिवसात झाली नव्हती. त्याना उत्तर दिलेच पाहिजे. आताच पाहा ना, कसे रागाने व त्रासाने ते तिच्याकडे पाहात होते.

ती नम्रपणे म्हणाली—" मला तुम्हाला दूर लोटलच पाहिजे. दुसरी गतिच उरली नाही आता. "

" पण का ? "

" कारण, तुम्हाला माझ मन समजणार नाही. तुमचे गैरसमज होतील. नाना, अस रागान पाहू नका. गैरसमज भलतेच नाहीत. पण माझ करण तुम्हाला मूर्खपणाच वाटेल. "

" म्हणजे अजून तुझा माझ्यावर विश्वास नाही. इकडे तोडान म्हणतेहि आहेस की, सकट मूर्खपणाच आहे म्हणून "

नानासाहेबाच्या या कटु बोलण्याने दमयतीला थोडें सामर्थ्य आले. एकदा काय आहे तें सागून टाकावे व कायमची सुटका करून घ्यावी. एकदा हें गुपित व आपण काय करावयाचें ठरविले आहे हे नानासाहेबाना समजलें की ते आपल्याबरोबर येणारहि नाहीत आणि आपल्या जाण्याला अडथळाहि करणार नाहीत. मग सागितलेलेंच काय वाईट ? आत्ताच सागून टाकावे हेच बरें.

ती थोडा वेळ स्वस्थ बसली. जणू काही कसे सागावे याचा विचारच करीत होती. नानासाहेबाची उत्तर ऐकण्याची अधीरता वाढत होती. थोड्या वेळाने ती म्हणाली— " मी त्या दिवशीं नागावला अगदी पहिल्यादाच मदयतीला भेटायला गेले होते, ते आठवत का तुम्हाला ? "

" हो. न आठवायला काय झाल ? "

" तर मग— त्या दिवशीं ती म्हातारी मला जे काय म्हणाली होती तें खर आहे. "

" पण हें कोणीं सागितल, आणि त्या गोष्टीला पुरावा काय ? "

" पुरावा ? हा इथ आहे." दमयंती छातीवर हात ठेवून म्हणाली. " बाबानी वाईट केलं. हक्क काकाचा होता."

" तुला हे कळल याबद्दल वाईट वाटत मला."

हें ऐकून दमयनी थोडी गांगरलीच. ती म्हणाली, " तुम्ही तर अस बोलता आहात की, जणू हें तुम्हाला पूर्वीच ठाऊक होत."

" ठाऊक नव्हत पण माझा तर्क होता. मुंबईला ऐकलेल्या काही गोष्टी-वरून, पैसे पोचविणाऱ्या त्या म्हाताऱ्याच्या बोलण्यावरून आणि त्या म्हातारी-च्या संतापावरून, काही तरी असाव अस मला वाटे. आणि मदयंतीवर झालेल्या या अन्यायाची थोडी फार भरपाई म्हणूनच मी तिच्या इथ राहा-ण्याच्या बाबतीत कबुली दिली. आता तस करण्यात मूर्खपणा झाला, ही गोष्ट निराळी. पण काही झाल तरी तिच्या आईबापाचा पाजीपणा काही त्यान कमी होत नाही. हो, पण पुरावा काय ?"

नानासाहेब बोलत असता दमयंतीला आश्चर्य वाटत होते. नानासाहेबानी तर्क करावा व आपणास कळू नये. बाबासाहेबाच्या हृदयात सारखी आग धुमसत असावी व आपणास त्याचा थाग-पत्ताहि लागू नये. या पुरुषाची मने असतात तरी कोणत्या प्रकारची ? ती आपणास कधीच कळायची नाहीत का ? आताच पाहा ना. नानासाहेबाची पुरुषी बुद्धि बायकी काल्पनिक भावनाचा विचार न करता प्रत्यक्ष इंद्रियगम्य अशा पुराव्यालाच महत्त्व देत आहे.

" माझा पुरावा," दमयंती म्हणाली, " बाबानी देवाला संबोधून लिहिलेल एक पत्र."

" उः ! हा कसला पुरावा ? देव काही कोणाला ते पत्र दाखवायला जात नाही."

" नाही. देव दाखविणार नाही."

" आणि तू ?"

दमयंतीला वाटले की, नानासाहेबाच्या शेवटल्या सलामीचेच ते शब्द. एकमेकाच्या बंधनातून कायमचे मुक्त करणाऱ्या काळाचा तो शेवटलाच क्षण. नाव जाळून नानासाहेबानी जी सलामी दिली, त्याहून ही अगदीच निराळी.

विवाहोपहार म्हणून दिली जाणारी गोष्टच तेव्हा नष्ट झाली, पण आज परस्परावरील विश्वासच नष्ट होत आहे. त्याच्या मताने माझा मूर्खपणा कुठल्या थराला जातो व याचा शुष्क व्यवहार कुठपर्यंत जातो हे आज परस्पराना समजेल. ' उः ! हा कसला पुरावा ? ' असेच नाही का ते नुकते म्हणाले ?

ती अगदी शात चित्ताने म्हणाली, " नाना, मनाची टोचणी तुम्हाला माहीत आहे. तिच्यामुळे तुम्ही आपल्या आयुष्याच थोड फार नुकसानहि करून घेतल आहे. मग बाबाना ही गोष्ट कशी टोचत असेल याची नाही का तुम्हाला कल्पना करता येत ? "

" हो. चागली करता येते. पण, ते आता आहेत का ? सारा प्रश्न तू काय करणार यावर अवलबून आहे. ही गोष्ट कुणाला तू सागितल्याशिवाय कळण शक्य नाही. जो काय पुरावा, तो तुझ्याजवळच आहे. या साऱ्याचा तू विचार केलास का ? "

" होय "

" बाबासाहेब ही गोष्ट कुणाजवळ बोलले का ? "

" नाही. पण बोलायची त्याची इच्छा होती हें या पुराव्यावरून स्पष्ट दिसत. "

" आणि त्याच्या पश्चात् तू ते बोलून दाखवावस अशी त्याची इच्छा दिसते का ? "

" मला अस वाटत. कायद्यान त्या शब्दातून तसा अर्थ काढता येईल कीं नाही, मला माहीत नाही. पण तुम्ही आत्ताच म्हटल्याप्रमाण ते आता नाहीत, आणि सारा प्रश्न मी काय करणार यावरच अवलबून आहे. "

" आणि काय कराव याबद्दल तुला यत्किंचित् सशय वाटत नाही ? "

" नाही. मुळीच नाही. "

दमयती एवढे बोलून थोडी दूर सरली. मग काय पुढे होणाऱ्या ताटातुटीची सूचक ती क्रिया होती कीं काय न कळे. ती पुढे म्हणाली— " मी दुर्मैयतीपुढे सार कबूल करणार आहें. "

" मला वाटलच होत, तू अस काही तरी करशील हें. "

" म्हणूनच मी आता मुंबईस जायला निघाले आहे. मग जाऊ ना मी आता ? येते मी. "

" हो, हो. पण मी तुझ्याबरोबरच येतो आहे ना ? "

" तुम्ही ? "

" हो, मी. मी तुला यावेळीं सोडीन असं तुला का वाटलं ? "

" पण तुम्ही– हा माग माझा मूर्खपणा आहे ना ? "

" असेल पण मलाहि असंच वाटत की, तू मदयंतीला सारं सांगावंस म्हणून. तुला यावेळी जे काय करता येण्याजोगं आहे ते एवढंच. "

दमयंतीच्या आश्चर्यचकित चेहऱ्यावर एक नवीनच छटा पसरली.

" पण मदयंती कदाचित् हे चारचौघांत, साऱ्या समाजात प्रसिद्ध करील. तिचा पैसा तर मी तिला परत देणारच आहे. पैशाबरोबरच माझी प्रतिष्ठाहि जाईल. "

" काही हरकत नाही. "

दमयंती नानासाहेबांकडे पाहातच राहिली. जो क्षण आपणास शेवटच्या सलामीचा वाटला तो नवीन सलामीचा पहिला क्षण ठरला. आपण एकमेकांपासून दूर दूर जात आहोत असे वाटत असताना अंत:करणे एक व्हावीत ?

दमयंतीला थोडी गोंधळलेली पाहून नानासाहेब म्हणाले, " खरोखरच तू करतेस तेच मला पटत आहे मला वाटतं, तुझं करणं न्याय्य आहे. फक्त तू मला आपल्याबरोबर राहू दे, म्हणजे झालं. "

नानासाहेबांना नुकतीच वाचलेली एक गोष्ट आठवली. एका पुरुषाची पत्नी त्याच्याबरोबर साऱ्या सुखाचा उपभोग घेते. त्याच्या सन्मानाबरोबर तिचाहि सन्मान होतो. त्याच्या मोठेपणाने तिचाहि मोठेपणा वाढतो. पुढे त्या पुरुषावर काही किटाळ येऊन त्याला भर बाजारात फटके खाण्याची शिक्षा होते. बायको पोलिसाकडे जाते व " त्यांना बांधून न्याल तेव्हा मला त्यांच्याबरोबर चालू द्या व त्यांना फटके माराल तेव्हा माझीहि पाठ उघडी करा. " असें सांगते. ती त्यावेळी एवढेच करूं शकते.

दमयंतीने आपली कृतज्ञता डोळ्यांवाटे प्रदर्शित केली. तिचे डोळे भरून आले.

---

# २१

मदयती मुबईस आली खरी. पण मुबई तिला अपरिचित असल्याने, तेथे काय करावे हें तिला सुचेना.

नागावच्या वातावरणातून ती एकदम दुसऱ्याच वातावरणात शिरली होती. तेव्हा तिला तेंहि नवीनच होते. पण तेथे दमयतीसारखी पाठ-राखीण असल्यामुळे तिला हवे तसें वागण्यास त्यावेळी अडचण पडली नाही. दमयतीच्याच बळावर तिने त्या जगात कोणाची पर्वा केली नाही, कोणाशीहि मैत्री किंवा विशेष ओळख करून घेतली नाही, कुणाचीहि मर्जी सपादन केली नाही, की कुणाची सहानुभूतिहि मिळविली नाही. दमयतीचा पराभव मी सहज करीन, या श्रीमत बायकाना येणाऱ्या गोष्टी हा हा म्हणता शिकेन, या साऱ्याच्या डोक्यावर मिरीं वाटीन अशी तिची कल्पना होती. आणि थोड्या शहाणपणाने ती वागती तर तिला तसे करता येणे अशक्य नव्हते. तिला बुद्धि होती, रूपसपदा होती, शरीर-सामर्थ्य होतें. याच्या बळावर तिला कितीतरी गोष्टी करिता आल्या असत्या. पण तिचें मन दमयतीच्या द्वेषानें भरले असल्यामुळे आणि या खुळ्या पोरीच्या मूर्खपणाचा फायदा घेऊन आपल्या सहज-सपदेच्या साहाय्याने आपण हवे तें करू शकू, या वेड्या कल्पनेने तिची बुद्धि फिरल्यामुळे, तिने अशी वागणूक केली की, त्यामुळे तिजबद्दल सर्वत्र तिटकाराच उत्पन्न झाला. थोडे दिवसच का होईना, पण आतापर्यंत अननुभूत अशा सुखसोयीचा

व ऐश्वर्याचा उपभोग घेतल्यावर ती आपल्या पूर्वीच्या जगात जाण्यास तयार नव्हती. आणि तिच्या बेछूट वागणुकीमुळे या नव्या लोकात तिला कोणी जवळ करण्यास तयार नव्हते. ती मुबईस आली तेव्हा तिची अशी चमत्कारिक स्थिति झाली होती.

मुबईसारखे अफाट शहर ओळखीचे कुणी नाही. त्यामुळे काय करावें हे मदयतीस सुचेना रत्नपूरसारख्या एकात ठिकाणीहि तिचा वेळ पुस्तकें वाचण्यात व इतर कलाकुसरीची कामे शिकण्यात सहज निघून जात होता. पण हे करण्यात दमयतीचा पाडाव, निदान तिची बरोबरी तरी करण्याचा, मदयतीचा हेतु होता. या हेतूने प्रेरित झाल्यामुळेच ती वाचन किंवा कला सपादन करीत होती. याविषयी अभ्यासाने उत्पन्न होणारी आवड किंवा या ज्ञानप्राप्तीचा आनद तिला अजून लाभला नव्हता. त्यामुळे दमयती-पराभव हा प्रेरक हेतु नाहीसा होताच तिचे लक्ष या साऱ्या गोष्टीतून उडून गेले. या साऱ्या गोष्टी तिला आता निरर्थक वाटू लागल्या. नानासाहेबास वश करण्याचा प्रयत्नहि तिने दमयतीचा पाडाव करण्याच्याच दृष्टीने केला होता. पण तसे करताना ती स्वतःच त्या जाळ्यात अडकून, त्याना वश करण्याऐवजी स्वतःच विवश झाली होती. नानासाहेब हातचे निघून गेल्यामुळे तिला सारें जग भयाण, निरर्थक वाटू लागले होते, आणि दमयतीपासून दूर झाल्यामुळे तिची प्रेरक शक्ति नाहीशी होऊन ती अगदी निकाम झाली होती. दमयतीचा पाडाव होण्याच्या जागीं तिचाच पूर्ण पाडाव झाला होता.

मदयतीला अगदी एकटें राहाण्याचा आतापावेतो प्रसगच नव्हता. ल्हानपणापासून ती आईजवळच होती. तिच्या कर्मकटकटी ऐकूनच ती जगावर व विशेषतः दमयतीवर चिडलेली होती. आईची काळजी घेणे, तिच्यासाठी काबाडकष्ट करणे यातच तिचा सारा काळ गेला होता. आई गेल्यावर ती एकदम येऊन या श्रीमती भोवऱ्यात सापडली आणि लोकास फिरविण्याचा उद्योग करता करता स्वतःच गिरक्या खाऊन तळाशीं गेली. रत्नपूर सोडल्यापासून तिला तिचा एकाकीपणा जाचू लागला. काही झालें तरी मनुष्य हा समाजप्रिय प्राणी आहे. आपले असे कोणी नाही, आपल्या

सुखदु:खामुळे कोणी सुखी होत नाही किंवा कोणास दु:ख होत नाही, आणि आपणहि कुणास सुखवू, फार काय दुखवूहि शकत नाही अशी स्थिति झाली, म्हणजे जी एका प्रकारची निष्क्रियता येते, ती मदयतीत आता आली होती शिवाय, तिचे मन जर पूर्वीप्रमाणे स्वतंत्र असते तर तिने मुबईसारख्या ठिकाणी आपल्याजोगे काही काम शोधून काढले असते. पण या मधल्या राहणीने तिचे मन फार बदलून गेले होते. नानासाहेबा-मुळे उत्पन्न झालेल्या विकाराने ती पछाडली गेली होती, व नानासाहेबानी जेव्हा तिचा धिःकार केला तेव्हा तर ती पुरी पुरी घायाळ होऊन घायाळ प्राण्याप्रमाणे घरपडी झाली होती. तिला बाहेर कुठच करमेनासे झाले होते पण तरी मौज अशी होती की, त्यासाठी नानासाहेबाचा तिला राग मात्र मुळीच आला नव्हता तिचा राग सारा होता दमयतीवर. कारण, तिला शेवटल्या प्रकाराने असे वाटू लागले होते की, दमयती आपणाशी अगदी लबाडीने वागू शकली वरवर दिसणारा तिचा भोळेपणा किंवा मूर्खपणा खरा नसून सिंहाने पांघरलेले ते मेंढराचे कातडे होते. तिला फसविण्याऐवजी त्यामुळे आपणच फसलो, आणि साऱ्या सुखाचा आपला डोलारा तिच्या-मुळेच कोलमडून पडला.

तिने आपल्याजवळ असलेल्या पैशाची मोजदाद केली. सध्या तरी तिला पुरेसे पैसे जवळ होते. दमयतीने आणखी व्यवस्था करावयाचे वचन दिले होते. पण तिच्यावरचा तिचा विश्वास डळमळला होता. समजा, तशी व्यवस्था तिने न केली तर काय ? आपण मागावयासच गेलो तर ती काही रक्कम आपल्या तोंडावर टाकील. पण मग आपल्या आईवडिलाप्रमाणेच आपण केल्यासारखे नाही का होणार ? नानासाहेब आधीच आपणास जळू-सारखी समजत आहेत. आणि अशा तऱ्हेने मागणी करू लागलो तर मग काय, लुटारूच समजावयाचे.

या साऱ्या कारणामुळे त्रस्त झालेल्या मदयतीच्या नजरेस 'ब्रह्मदेशात काही स्त्री-पुरुषांची निरनिराळ्या कामासाठी आवश्यकता आहे.' अशा अर्थाची जाहिरात पडली. तिचा जन्म ब्रह्मदेशातला. तिला जरी तेथली काही आठवण नव्हती तरी आईच्या तोंडून तिने ब्रह्मदेशातील किती तरी

गोष्टी ऐकल्या होत्या व त्याबद्दल तिच्या मनात एकप्रकारचे कुतूहल व प्रेम होते. यामुळे तिच्या मनात आपण ब्रह्मदेशात– दमयती, नानासाहेब यापासून अगदी दूर दूर– जावे असे आले व ती त्या उद्योगास लागली.

मदयतीने ज्या मन:स्थितीत रत्नपूर सोडले होते त्यावरून ती काय हवे ते करील अशी दमयतीस भीति वाटत होती. आपण सारे मदयतीस सांगून सारा ऐवज तिच्या स्वाधीन केल्यावर तिने वाटेल ते करावे, वाटेल तिथे जावे, पण आपण हे करण्यापूर्वी नव्हे, अशी दमयतीची इच्छा, व त्याचसाठी तिची मुंबईस जाण्याची घाई होती. मदयतीजवळ हजारपाचशेचा तरी ऐवज होता, तेव्हा त्याच्या आधारावर ती कुठे निघून जाण्यापूर्वी आपण तिची भरपाई करावी हाच तिचा हेतु. हे सारे जाणून नानासाहेबांनी लगेच जबाबी तार करून उत्तर मागविले. महिला-पथिकाश्रमाच्या व्यवस्थापकाचे उत्तर आले की, मदयतीबाई तेथेच आहेत. दोघेहि मुंबईस जाण्यास निघाली.

कार्तिकी एकादशीचा दिवस. सकाळची वेळ. जाण्याची वाट नौकागृह बांधले होते त्यावरूनच. सकाळच्या भरतीचे पाणी भरल्यामुळे खाडीच्या आतल्या भागात पाणी तळ्यातल्यासारखे शांत. जळून गेलेल्या नौकागृहाचे व नावेचे काही काळवंडलेले भाग अजून इकडे तिकडे पडलेले. काळ्या झालेल्या कडा आपले तोंड त्या स्वच्छ पाण्यात पाहात असलेल्या. सायाची उंच उंच झाडे. त्याच्या शेंड्यावर कोवळी उन्हाची किरणे पसरलेली. पलीकडे कापलेली भात-शेते. त्या पलीकडे डोंगराच्या उतरणीवर नानासाहेबांनी लावलेली कलमे.

आजपावेतो या साऱ्या गोष्टी अशा प्रकाराने दमयतीच्या नजरेने कधीच पाहिल्या नव्हत्या. पण आज दु:खाने होरपळलेल्या तिच्या मनास– मृतप्राय मनास– हे सारे पाहून कसेसेच वाटले. खरोखर हे सारे नानासाहेबांचे. या साऱ्यामुळे ते केवढे सुखी असावयाचे. आपला येथे काय संबंध? या वर्गातील आपण नव्हेतच. आपला वर्ग मध्यम. पण आपण या गृहस्थाला आजपर्यंत किती दु:ख दिले, व अजून आपणापासून याला किती दु:ख

होणार आहे, याची कल्पना येऊन ती व्यथित झाली. दोघेहि काही न बोलता आपआपल्या विचारातच गुग होऊन चालली होती

मध्येच दमयंतीच्या तोंडून एकदम उद्गार निघाला– "नाना, मी भयंकर स्वार्थी आहे. नाही का ? मी एकटीच मुंबईला गेले तर नाही का चालणार ? "

" का ? एकदम असं वाटण्याचं आता काय कारण झालं ? "

" हें पाहा, " तिने हाताने सभोंवतालचा सारा देखावा दाखवीत म्हटले, " हें सारं तुमचं आहे. तुम्ही इथले आहात. मी परकी आहे मंदयंतीचा जसा इथे राहाण्याचा काही हक्क नव्हता तसाच माझाहि नाही खरोखर तुम्ही सोडून द्या ना मला. आपला संबंध संपला असंच समजा. "

नानासाहेबांनी तोंड बाजूस वळविलें. तिच्या दृष्टीला दृष्टी न देता ते म्हणाले, " तू पूर्वीहि मला असंच सांगितलं होतंस मुंबईत. पण मी गेल्यावर तुला मी हवा होतो असं वाटू लागलं होतं ना ? "

" हो. " दमयंती निरभिमानी व निगर्वी वृत्तीने म्हणाली. " पण आता माझ्या मनावर मी विजय मिळवला आहे. तुमच्या प्रेमातून– विलक्षण प्रेमातून– मी स्वतःला मुक्त करून घेतलं आहे. "

नानासाहेब गंभीरपणे म्हणाले, " पण मला नाही ना तसं करतां आलं ? मी अजून तुझ्या प्रेमात बद्धच आहें. "

" पण मी तुमच्यायोग्य तरी आहे का ? "

" दमयंती, भवभूतीचं वाक्य तू विसरलीस वाटतं ?

'व्यतिषजति पदार्थानांतरः कोऽपि हेतु. ।

न खलु बहिरुपाधीन्प्रीतयः संश्रयंते ॥ '

अग, प्रीति ही कोणत्याहि बाह्य उपाधींवर अवलंबून नसते. दोन मनं प्रेमाने बद्ध होण्याला आंतर, काही न सांगतां येणारा हेतु असतो. मी तुझ्यावर किती वर्षांपासून प्रेम करीत आहे. तुला आठवतो का तो दिवस, जेव्हा आपणाला बरोबर खेळताना, बरोबर वाचताना, बरोबर फिरायला जाताना पाहून बाबासाहेब म्हणाले होते— ' दमयंती, नानाचं तुझ्यावर खरंच प्रेम आहे हो. ' आठवतं तुला ? किती वर्षं झालीं त्या गोष्टीला ! "

दमयतीची मान खाली गेली.

" कधी कधी मला वाटे की, तुला प्रेम-भावना नसावी— तुला प्रेम करता येतच नाही म्हणून. पण तूंच ना मला सांगितलस की तस नव्हत. थोडा वेळ का होईना, पण माझ्याबद्दल तुला काहीतरी वाटल होत आणि वाटत होत म्हणून ! "

" पण तुमच्या दृष्टीन मी मूर्ख, भलत्याच गोष्टीच्या माग लागणारी, व्यवहारशून्य अशी नाहीं का ? "

" होय, मला तस वाटे. निदान मदयतीच्या बाबतींत तरी मला खास तस वाटल. त्याबद्दल मला तुझा रागहि आला. "

" आणि तरी तुम्ही मदयतीविषयीं मला जे करायच आहे त्यासाठी माझ्याबरोबर येत आहात ? "

" हो. कारण आता तू काय आहेस, हे मला कळल आहे. तुझ्या जागीं मी असतो तरी, मला वाटत, मींहि हेच केल असत. "

" म्हणजे हा माझा मूर्खपणा नव्हे तर ? "

" नाही. हे कर्तव्यकर्म आहे. "

दोघेही मोटारस्टॅंडजवळ आलीं होतीं. जागा राखून ठेविलेल्याच होत्या. सामानहि चढवून ठेविले होते. मोटार यांचीच वाट पाहात होती. हीं बसताच मोटार निघाली व धावू लागली.

नानासाहेब व दमयती जवळ जवळच बसली. नानासाहेबांचा उजवा हात दमयतीच्या डाव्या हातावर होता. दोघांचीहि दृष्टादृष्ट मधून मधून एक होत होती.

सरतेशेवटीं दोघांचे स्वभाव एकरूप होत होते. या बाबतींत तरी दोघांचें पूर्ण ऐकमत्य होतें. दमयतीच्या मऊपणाखाली, वरवर दिसणाऱ्या मूर्खपणाखालीं दडलेला तिचा उदार स्वभाव, आणि अभिमान, ताठरपणा इत्यादिकाखालीं दडलेला नानासाहेबांचा उदारपणा यांची परस्परांना ओळख पटली होती. विलक्षण, वासनात्मक प्रेम जरी दमयतीच्या मनात उरलें नव्हतें तरीपण त्या प्रेमापेक्षाही काही उच्च प्रकारची भावना तिच्या मनात नानासाहेबांविषयीं उत्पन्न झाली. या भावनेंत आदर व कृतज्ञता भरली

होती. तिला वाटले, आता आपण जवळ राहिलो किंवा दूर, या भावनेमुळे आनंदाशिवाय आपणास दुसरे काहीही प्राप्त होण्याची भीतिच नको. वासनात्मक भावनेची व या भावनेची बरोबरी होणे शक्यच नाही.

मध्ये मोटार थांबली. चहा व एकादशीचा फराळ वगैरे झाले. दमयंतीचा चेहरा न्याहाळीत नानासाहेब म्हणाले, "मी मदयंतीला भेटून सारं सांगू का ?"

"नको, नको." दमयंती उतावीळपणे म्हणाली. तिला एक प्रकारची भीति वाटतच होती. पण सगळ्यात मोठी भीति जी तिला वाटत होती ती ही की, ऐन वेळी तर आपले मन कचरणार नाही ना ? भीतिमुळे गांगरणार नाही ना ? तो भित्रेपणा, भेकडपणा जिंकण्याचे तिने ठरविले होते.

गाडी पुन्हा सुरू झाली. तिच्या अंतःकरणाची पुटे एक एक करून उघडी होत होतीं. बाबासाहेब म्हणजे केवढा सज्जन माणूस, पण त्यानाहि मोह पडावा व त्याच्या हातून हे पाप व्हावे. ते इतके दिवस दडून राहावे व अशा रीतीने उघडकीस यावे. त्यानी जन्मभर भोगलेला मनस्ताप, काकानी जन्मभर भोगलेलें दुःख, काकीच्या अंगाचा संताप व तिळपापड, मदयंतीची द्वेषबुद्धि व त्यामुळे तिची झालेली वागणूक, हे सारे प्रवाह मिळून जी एक महानदी झाली तिच्या प्रवाहात आपण वाहात जात आहो असे तिला वाटले. मोटर धावतच होती. पण काळ ? तो तरी किती वेगाने पळत होता ! पेल्यातले पाणी बाहेर उन्हात फेकावे, एक क्षणभर ते चकाकतें व पुन्हा जमिनीवर पडून सुकून जाते. माणसाची कृत्यें तद्वतच. एक क्षणभर काय सुखदुःखें वाटत असतील तेवढींच.

मुंबई जवळ जवळ येऊ लागली. मुंब्र्याजवळ वळसा घेऊन मोटार ठाण्यात शिरली. आता मात्र मोटारच्या धक्क्यानी जागृत झालेले दमयंतीचें मन प्रत्यक्ष व्यावहारिक गोष्टीचा विचार करू लागले. सारे कळल्यावर मदयंती काय म्हणेल ? ती काय मागेल ? ती पुढे काय करील ? चार चौघासमोर आपणास हवें तसें फाडफाड बोलेल. मदयंतीला सारें दिल्यावर आपणास काय उरेल ? तेवढें आपणास पुरेल काय ? हे सारें कळल्यावर

लोक आपणाकडे कोणत्या दृष्टीने पाहातील? आपण हे सारे सहन करू शकू का? एक ना दोन. तिचे डोके भणभणू लागले.

महिला-पथिकाश्रमाशीं गाडी उभी राहिली. गाडींतून उतरताना तिला नवीनच भीति वाटू लागली. मदयंतीच्या माऱ्यापुढे आपला टिकाव लागेल का? आपल्या जिभेवर तरी आपला ताबा राहील का? भलभलते आरोप ती करू लागली तर आपण शांत राहू शकू का? मोठ्या धैर्याने तिने ही भीति दाबली. नानासाहेबास तिने पुढे घरी जाण्यास सांगितले व ती पथिकाश्रमात शिरली.

आत जाऊन शोध करिता मदयंती बाहेर गेली असल्याचें तिला कळले. ती केव्हा घरी येईल हे कोणासच माहित नव्हते. रात्रीं ती नक्की घरीं येईल एवढे मात्र तिला समजले. "रात्रीं ९ वाजता भेटण्याची कृपा करावी-- दमयंती" अशी चिठ्ठी व्यवस्थापकाजवळ ठेवली व ती घरी गेली.

---

# २२

मदयंती पथिकाश्रमात रात्रीं आल्यावर जेव्हा तिला दमयंतीची चिठ्ठी मिळाली तेव्हा एका प्रकारच्या तिरस्कारपूर्ण विजयाचे हास्य तिच्या चेहऱ्यावर झळकले. दमयंतीला— खुळ्या पण लबाड दमयंतीला-- त्या दिवशीच्या वागण्याबद्दल थोडे वाईट वाटले असेल व या लोकाच्या उपरी शिष्टाचाराला अनुसरून मुंबईस आली. असता एकवार क्षमा मागून मोकळे व्हावयाचे असेल, अशी कल्पना करून ती हसली. पण न जाणो, कदाचित् दुसरेहि काही कारण असावयाचे. दमयंतीची येण्याची वेळ होण्यापूर्वीच तिने जेवण उरकून घेतलें व उत्सुक मनःस्थितीत ती दमयंतीची वाट पाहात बसली.

घड्याळात नवाचे ठोके पडत होते. जिन्यावर पावले वाजलीं. दारावर टक्टक् झालें व 'आत या' म्हटल्याबरोबर दार उघडून दमयंती आत शिरली. दोघींची दृष्टादृष्ट झाली. दोघीहि काही वेळ एकमेकींकडे पाहात राहिल्या.

एकमेकींपासून दूर होऊन चार-पाचच दिवस झालेले. पण या थोड्याच-दिवसात दोघींत केवढा बदल झालेला दिसत होता. मदयतीचा ताठरपणा जाऊन तिच्या चेहऱ्यावर त्रास, कटाळा, औदासीन्य, दुःख इत्यादिकामुळे एक प्रकारची छाया पसरली होती. इकडे दमयती विलक्षण दुर्बल झालेली दिसत होती. तिच्या हातापायात काही सामर्थ्य आहे असेच वाटत नव्हतें. ते थोडे थोडे कापतच होते. तिच्या वृक्षःस्थलावरील पदर वरखाली होत होता. मग काय तिची छाती धडधडत होती कीं तिला जिना चढून येण्याचे श्रम झाले होते, कोण जाणे. पण तिच्या चेहऱ्यावर शाति, समाधान, आनद, याचें तेज विलसत होते. मदयतीला वाटले, दमयतीला काहीतरी फार मोठे सुख मिळाले आहे. बोलायला कशी व कोणीं सुरुवात करावी याचा दोघी-हि जणू काही क्षण विचार करीत राहिल्या. शेवटीं दमयतीनेच आरभ केला.

“ मला वाटल आता तरी तुझी गाठ पडते की नाही. ” ती म्हणाली.

“ का ? ” मदयतीने म्हटले. “ आपल्याला आता आणखी काही बोलण्या-सारख उरल आहे, अस मला नव्हत वाटल. ”

दमयतीला ‘ बसा ’ असे न सागताहि ती एका खुर्चीवर बसली. तिला उभे राहवत नव्हते. मदयतीच्या तोंडाकडे न पाहाताच ती म्हणाली—

“ बाबाचे सारे कागद मीं या तीन दिवसात तपासले. ”

“ पण काही सापडल नाही ना ! आणि मोठ्या आनदान हें सागण्या-साठी का तुम्हाला मला भेटायच होत ? ”

“ त्या कागदात त्याबद्दल काहीं विशेष सापडल नाही. ”

मदयतीस वाटले, त्याबद्दल काही विशेष सापडले नाही, म्हणजे आणखी काही सापडलें कीं काय ? आपल्या वडिलाचीं— यमाजीरावाची— आणखी काही कृष्णकृत्यें हिला समजून ती सागण्यासाठी दमयती येथे आली आहे कीं काय ? एरवीं तिच्या चेहऱ्यावर एवढा आनद का दिसावा ? यामुळे ती अत्यत सावधपणे, सामना करण्याच्या तयारीने, दमयंती पुढे काय बोलते ते ऐकण्यासाठी कान टवकारून राहिली.

“ मदयती, आपली पहिली भेट तुला आठवते का ? ”

" हो. न आठवायला काय झालं ? जेव्हा माझ्या पत्रामुळे तुम्ही नागावला मला भेटायला आला होता आणि माझी आई तुम्हाला हव तस टाकून बोलली होती, तेव्हाची ना ? चांगली आठवण आहे मला. आई तुम्हाला काय काय म्हणाली ते सार माझ्या कानात अजून घुमत आहे."

" मदयती, तुझी आई जे जे म्हणाली, ते सार खर होत."

" खर ? " मदयती उतावीळपणे म्हणाली. " काय ? "

" त्या बक्षिसाबद्दलच " दमयती अडखळत अडखळत हळूच म्हणाली. तिचे शब्द स्पष्टपणे मदयतीला ऐकू गेले नाहीत.

मदयंती म्हणाली, " आई म्हणाली होती, तुमच्याजवळची पै न पै माझी आहे."

" हो. ते खर आहे."

" ती म्हणाली होती– तुम्ही चोर म्हणून."

" हो. एका अर्थी तेहि खर होत."

" तिन म्हटल होत– तुमचे वडील चोर आहेत अस."

" हो. तेहि खर."

" म्हणजे मग, तें बक्षिस माझ्या वडलाना मिळाल होत ? "

" हो."

" आणि तुमच्या वडलानी ते चोरून उपटल ? "

" हो."

मदयती दमयतीकडे टक लावून पाहात होती. तिचा आपल्या कानावर विश्वासच बसेना. तिने विचारले—" पण हें सार कशावरून ? "

" बाबानी देवाला लिहिलेल्या एका पत्रावरून."

" देवाला लिहिलेलं पत्र ! " मदयतीचें आश्चर्य वाढत चालले होतें. " म्हणजे ! मी नाहीं समजलें ! "

" बाबाच्या मनात ही गोष्ट सारखी डाचत असावी; पण दहा जणात कबूल करण्याचं त्याना धैर्य झालं नाही. तेव्हा देवापुढे त्यानी कबुलीपत्र लिहिल. ते मला परवा त्याच्या गीतेच्या पोथींत सापडल. ते सापडताच,

तुला कळवावं म्हणून मी इथ धावत आलें. तुला सांगून झालं. हे पाहा तें कबुलीपत्र."

दमयंतीने कापऱ्या हाताने हातपिशवीतून तो कपटा काढून मदयंतीपुढे केला. पण मदयंतीच्या हाती पडण्यापूर्वीच तो तिच्या कापऱ्या हातातून खाली पडला. मदयंतीने तो उचलला. एवढासा कपटा! हे कबुलीपत्र! दमयंती खाली पाहूं लागली.

मदयंती दमयंतीकडे पाहात होती. या आश्चर्यजनक बातमीपेक्षा तिला दमयंतीचेच आश्चर्य वाटत होते. एवढासा कपटा! केव्हा लिहिला हे कुणास माहित नाही तो दमयंतीला सापडतो काय, त्याला दमयंती एवढे महत्त्व देते काय, व तो घेऊन आपल्याच पायावर धोंडा पाडून घेण्यासाठी आपणाकडे येते काय. म्हणजे मग आजपर्यंत हिला माहीतच नव्हते की काय? कीं हें आता कुणाला समजले आहे व त्याने येऊन आपणास सांगावयाचा समय पाहून रिकामा मोठेपणा घेण्यास आपणच पूर्वी जाऊन सांगावे म्हणून दमयंती आपणाकडे आली आहे? असा विचार करून मदयंती म्हणाली—"पण मग हे कबुलीपत्र तुम्हीं माझ्याकडे कशाला आणलं? आणखी कुणाला हें माहित आहे का? कुणी मला येऊन सांगेल असं वाटलं का तुम्हाला?"

"नाही." दमयंतीने उत्तर दिले. "हे कुणालाच माहित नाही. मला स्वतःलाच परवापर्यंत हे ठाऊक नव्हतं. परवा पोथी वाचताना हा कागद मला सापडला. मी तो फाडणार इतक्यात तो वाऱ्याने उडाला आणि घडी उलगडल्यामुळे आत काही लिहिलं आहेसं दिसलं. तें मीं वाचलं— आणि तुला सांगायला आले. हे करायलाहि मला कुणीं सांगितलं नाही. पण मला ते माझं कर्तव्य वाटलं. आईबापाच्या संपत्तीवर जर, मदयंती, मुलांनी सुख भोगायचं तर त्यांच्या पापाचं प्रायश्चित मुलींनं घेणं तिचं कर्तव्य नाही का? ते आहे, असं निदान मला वाटतं."

मदयंतीने ते पत्र खाली ठेवले. आईबापाच्या संपत्तीवर जर सुख भोगायचं तर त्यांच्या पापाचं प्रायश्चित मुलींनं घेणं तिचं कर्तव्य नाही का? हा प्रश्न तिच्या मनात घुमूं लागला. आपण आजपर्यंत दमयंतीचा द्वेष करीत आलो. कारण, आपली कल्पना अशी होती की, बापाची लबाडी हिला माहीत

आहे, व म्हणून ही आपल्याला इतके द्यायला तयार आहे. थोडे तोंडावर टाकावे व बाकीचे आपण भोगावे, अशी या सान्याची कल्पना, योजना असल्याबद्दल आपली खात्रीच होती. पण हे पाहावे तो सारेच उलट. हिने आपल्या वडिलांच्या पापासाठी एवढे दिव्य करण्यास तयार व्हावे, व मीं ? माझ्या वडिलांनी काय काय केले ते सर्वांनाच माहीत आहे. मग त्याचे प्रायश्चित्त कोण घेणार ? स्वतः होऊन ही आपला अपमान करून घ्यायला येथे आली आणि इतके असताना हिच्या चेहऱ्यावर दुःखाची नुसती झाकहि नाही. उलट केवढा आनंद, केवढे समाधान, केवढे सुख हिच्या चेहऱ्यावर झळकत आहे ! सुखासाठी मीं इतकी धडपड केली, हिचा द्वेष केला. हिला लुबाडण्याची इच्छा धरली. पण मला ते करता आले नाही. आता ही होऊन माझ्या हाती सापडण्यासाठी आली आहे. मी हिचा अपमान करावा काय ? छे ! असे विचार तिच्या मनात येत असता तिच्या तोंडून शब्द निघाले—
" दमयंतीबाई, उचला तो कागद. तो तुमचा आहे. इतक्या वर्षांनंतर मला त्याचा काय उपयोग ? "

आपण जागे आहोत की स्वप्नात, हे मदयंती बोलत आहे की आणखी कोणी, हे समजून घेण्यासाठी दमयंतीने वर पाहिले. ती म्हणाली—" खरं आहे मदयंती. आता त्याचा फारसा उपयोग आहे असं मलाहि वाटत नाही. यामुळे आजपर्यंत तू ज्या ज्या गोष्टींना मुकलीस त्या काही तुला परत देता येणार नाहीत. पण यामुळे मिळालेला पैसा, तो मात्र मी साराच्या सारा तुला परत करीन. "

" काय ? तुम्ही सारा पैसा मला देणार ? आणि तुम्ही ? "

" हो अगदी सारा, सव्याज. फक्त बाबांनी तुझ्या आईला जेवढा महिन्यासाठी द्यायचा ठरवला होता तेवढाच मी आपल्यासाठी, तुझी परवानगी असेल तर घेण्याचं ठरवलं आहे. "

मदयंती उठून खोलीच्या खिडकीशीं गेली. बारीक झिरझिरीत मलमलीच्या पडद्यातून बाहेर पडलेलें चांदणे दिसत होते. आकाशात चंद्र चकाकत होता. अंधाऱ्या रात्रीं उगाच काजव्यासारखे चमचम करणारे तारे निस्तेज झाले होते. ठळक ठळक तेवढेच मंद दिसत होते. हे सारे दृश्य पाहात

मदयती स्वस्थ उभी होती. जणू काय आपल्या हृदयाकाशात काय चकाकत आहे हेंच ती पाहात होती.

इकडे या साऱ्याचा ताण दमयतीवर इतका पडला होता की, तिचे हात-पाय अगदी थकून गेले होते. नानासाहेब समोरच्याच उपाहारगृहात वाट पाहात बसले आहेत या कल्पनेचाच तिला धीर होता. आपले काम झाले. आपण मदयतीला तें पत्र दिलें. आता त्याचें जें काय करावयाचें तें तिने खुशाल करावे. टेबलावर ठेवलेल्या पत्राकडे तिला पाहवत नव्हते. ती उठून उभी राहिली व म्हणाली-- " मदयती, तें पत्र घे. वाच ते. "

मदयतीने उत्तर दिले नाही. खिडकीच्या पिवळट चौकोनी कापडावर तिची पाठमोरी निश्चल मूर्ति दिसत होती. दमयती पुन्हा म्हणाली-- " मदयती, समजल का तुला मी काय म्हणतें ते ? मी येते आता. " आणि ती दाराकडे जाण्यास निघाली.

मदयतीने तोंड फिरविलें. तिच्या डोळ्यातून अश्रुप्रवाह चालला होता. " दमयतीबाई, मला तें वाचायच नाही आणि तुम्हाला नागवून काही घ्यायचहि नाही. तुमचा पैसा घेऊन तुम्हाला निर्धन केल्याने दमयतीबाईची मदयती आणि मदयतीच्या दमयतीबाई होणार नाहीत आता. तें पत्र उचला आणि घेऊन चला. तुम्हीं जे काय मला सांगितल, तें मीं ऐकलच नाही, मला ऐकूच आल नाही, अस समजा. "

असें म्हणून तिने झपाट्याने तोंड फिरविले व ओघळत असलेले अश्रू झाडून टाकिले. " दमयतीबाई, तुमच तुमच्या वडलावर प्रेम होत ना ? " तिने एकदम रूक्षपणे प्रश्न केला.

" होय. " दमयती म्हणाली.

" मग त्याच्यासाठी तरी उचला तें पत्र आणि चालूं लागा. " मदयतीने म्हटलें. हिला झालें आहे तरी काय हें दमयतीला कळेना. मदयती तुसडे-पणाने खोलीत येरझारा घालू लागली. असें करता करताच ती म्हणाली— " दमयतीबाई, आज रत्नपूर सोडल्यापासून मी एकटी सारखा विचार करतें आहें. काय होत नि काय झाल ! मीं खरोखर तुमचा द्वेष केला. तुम्हाला हाणून पाडण्याचा माझा सारखा प्रयत्न होता. हें पत्र जर मला शोधून

मिळाल असत तर त्याच्या बळावर मी तुमचा बुरखा उडवून दिला असता. पण आता काय? मला आता काहीच करायच नाही. जा तुम्ही आता मला एकटीलाच इथ बसू द्या."

"मदयती, तू म्हणतेस तरी काय? तू काहीच करणार नाहीस आणि घेणार नाहीस म्हणून? पण मग मी प्रायश्चित्त कशी घेणार, अन् बाबाना आणि मला शुद्ध तरी कशी करणार?"

"तुम्हाला आता प्रायश्चित्त घेता येत नाही आणि काही करताहि येत नाही. जे झाल, ते होऊन गेल. जे गेल त्याची भरपाई आता होण शक्य नाही. त्या साऱ्याची वेळ निघून गेली."

"छे छे असं कस? यातून मुक्त व्हायचा काही तरी मार्ग काढलाच पाहिजे." दमयती म्हणाली.

मदयती आवेशाने म्हणाली, "माझा मुक्त व्हायचा मार्ग हाच. माझ्या दुष्टपणातून सुटायचा हा एवढाच मार्ग उरला आहे. दमयतीबाई, मला काय वाटत ते तुम्हाला स्पष्टपणे ऐकायच आहे काय? ऐका तर मग. तुम्ही आहात साध्वी आणि मी आहे कृत्या."

"मदयती, मी तुला कधीच वाईट म्हटल नाही. त्या दिवशी जर काही माझ्या तोडून निघाल असल तर त्याबद्दल मला वाईट वाटत. मी तुझी क्षमा मागते."

मदयतीला एकदम काही तरी सुचल्यासारखे झाले. ती म्हणाली-- "नानासाहेब आणि तुम्ही लग्न करणार आहात काय?" तिला वाटले, तसे असेल तर कमला हिचा स्वार्थत्याग? त्याच्या सपत्तीची मालकीण व्हावयाचे व हे माझ्या तोडावर फेकावयाचे.

"नाही." दमयती म्हणाली, "तो विचार केव्हाच नष्ट झाला."

"आणि तरी तुम्ही हे मला सागायला आलात?"

आपले व नानासाहेबाचें लग्न मोडण्यात मदयतीचा काही हात होता ही गोष्ट दमयती अजिबात विसरली होती. त्यामुळे, या दोन प्रश्नातला सबंध तिच्या ध्यानात आला नाही.

"तें लग्न मोडायला मी, मी कारण झाले, दमयतीबाई." मदयती

म्हणाली. " तुमची शत्रु बनून मी ते लग्न मोडल. तुमच्या पुढ्यातील पक्वान्नाच्या ताटात मीं विष कालवल. "

" नाही. मदयंती, कुणी कुणाचा शत्रु होऊ शकत नाही. आपलेच आपण शत्रु होतो आणि आपलेच आपण मित्र होतो. नाही का ? माझ्या मनातल ते प्रेम मेल आहे. पण नाना मात्र खरे उदार आहेत. आता देखील ते माझ्या-बरोबर मला पोचवायला इथ आले नी समोरच्याच उपाहारगृहात ते माझी वाट पाहात असतील."

" ते मला सांगायला नको. तुमच्याबद्दल त्याना काय वाटत ते मला चांगल माहीत आहे. पण त्याना कळल आहे का हे सार तुमच्या वडिला-बद्दलच ? "

" होय. "

" आणि तरी त्याना काही वाटल नाही ? आणि माझ्या बाबतीत मात्र त्याना नेहमी माझ्या आईवडलाच्या कृत्याची आठवण यायची ! आणि तुम्ही हे जे काय मांडल आहे हेहि त्याना पसंत आहे म्हणता ? "

" होय. हे माझ कर्तव्य आहे, आणि ते मी केल पाहिजे असच वाटत आहे त्याना. "

" दमयंतीबाई, समजल मला सार. आता जा पाहू तुम्ही कशा ? "

" हो. मी जाते. पण पुढे मग तू काय करणार आहेस ? "

" काही नाही म्हणून सांगितल ना ? " मदयंती रागाने म्हणाली-- " आता मला काही करायच नाही. मीं करायची वेळ गेली. आणि तुमची-हि वेळ गेली. आता तुम्हीं काही केल तरी त्याचा मला उपयोग नाही. झाल ते झाल, गेल. दमयंतीबाई, तुम्ही त्या तुम्ही, अन् मी ती मी. "

" तरी पण मी पत्र ठेवून जाते. तू शांतपणे विचार कर अन् मग ठराव काय करायच ते. " एवढे म्हणून दमयंती जाऊ लागली. मदयंती एकदम तिच्यापुढे जाऊन तिच्याकडे वळून म्हणाली- " दमयंतीबाई, या तुमच्या बलिदानाचा मी स्वीकार करीन अस नानासाहेबाना वाटल का ? "

" यात बलिदान कसच ? एक कर्तव्य आहे हे, एवढ मला वाटत. नानाना माझ करण बरोबर वाटत आहे. तुझ्याबद्दल त्याना काय वाटत हे मला माहीत नाही. पण तू घेणार नाहीस अस मात्र त्याना वाटत नसावस दिसत."

" तर मग त्याना सागा की, तुम्ही मला ओळखल नाही अजून. बर आहे. या आता." एवढे म्हणून तिने नमस्कार केला व दमयती जाताच धाड्दिशी दार लावून ती बिछान्यावर येऊन पडली.

---

# २३

ती सारी रात्र मदयतीने बिछान्यावर तळमळत काढली. तिचे शरीर बिछान्यावर स्वस्थ पडले होते. पण मन ? ते एकसारखे भूतकाळात वावरत होते व ती आपल्या आठवत असलेल्या साऱ्या गतायुष्यातील ठळक ठळक दृश्याचें सिंहावलोकन करीत होती.

दृश्य १ ले—नागाव. आपण आईसह राहात होतो. गरिबीत, पण सुखात होतो. आई सारखी कुरकुर करी पण ते का, हेच आपणास कळत नसे. आईच्याच सागण्यावरून आपणास दमयतीची माहिती लागली. थोड्याफार ऐकीव माहितीवरून आपली जिज्ञासाबुद्धि जागृत झाली आणि आपण पत्र पाठविलें.

दृश्य २ रे— दमयंती पत्रावरून घरी येते. तिच्याकडे पाहाताच तिच्यातला आणि आपल्यातला फरक ध्यानात येतो. आपल्यापेक्षा ती सौन्दर्याने, शरीर-सामर्थ्याने कमी आहे, हे आपल्या नजरेस येते. तिच्याजवळ अधिक काही असेल तर पैसा ही आपली भावना होते. हा जर काढून घेता आला तर दमयंतीची मदयंती व मदयंतीची दमयंती सहज होऊ शकेल असे आपणास वाटते. पण आई बोलून सारी घाण करून टाकते. शेवटी नानासाहेबाचे दर्शन. दमयंतीच्या संपत्तीत पैशापेक्षाहि नानासाहेब अधिक, असें समजते. त्या देखण्या तरुणाबद्दल एक चमत्कारिक भावना आपल्या मनात उत्पन्न होते.

दृश्य ३ रे— आईचा मृत्यु. एक प्रकारची सुटका. दमयंतीला पत्र व तिच्यावर स्वारी. या मूर्ख पोरीला नागवावयास वेळ लागणार नाही व तिची जागा आपणास सहज पटकाविता येईल ही वाटणारी खात्री. मोठ्या धूर्तपणे टाकलेले डाव व पाश. एका गरीब व अजाण पोरीचा साधन म्हणून केलेला उपयोग. नानासाहेबावर पाडलेली छाप व क्षणिक विजय.

दृश्य ४ थे— या क्षणिक विजयाने नष्ट झालेली मनःशांति, उलटे पडत गेलेले डाव, आपल्यात व या लोकात काही आंतरभेदच आहे ही जाणीव, व शेवटी पूर्ण पराजय. पुढे एकाएकी आपल्या हाती प्रतिपक्षानेच आणून दिलेले साधन व देऊ केलेले धन. तिने ते पत्र आता उचलून वाचले आणि घडी करून पुन्हा टेबलावर ठेवले.

ही दृश्ये पाहाण्यात तिची सारी रात्र केव्हाच निघून गेली. सकाळ झाली. नित्याप्रमाणे उठून ती फिरावयास बाहेर पडली. हिंडता हिंडता तिला एका वकिलाची पाटी दिसली. ती आत शिरली व मोठ्या सावधपणाने नाव, गाव न सांगता सारी गोष्ट वकिलाच्या कानावर घालून त्या पत्राच्या आधारावर कायद्याने काय करता येईल याबद्दलचा वकिलाचा सल्ला विचारिला. वकिलाचें स्पष्ट मत असे पडले की कायद्यानें त्या पत्राच्या आधारावर काहीहि करता येणार नाही. कायद्याच्या दृष्टीने त्या पत्रास रद्दीपेक्षा काही अधिक किंमत नाही.

तेव्हा आता ही संपत्ति घ्यावी की न घ्यावी हाच मुख्य प्रश्न मदयंतीपुढे होता. कायद्याचा थोडा जरी आधार मिळाला असता तर गोष्ट

निराळी होती. पण तसे नसताना नुसती दुसऱ्याने– आपल्या प्रतिपक्षाने– दया म्हणून दिलेली भीक घेणें, मदयंतीसारख्या आत्मनिर्भर, स्वाभिमानी, दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी न पिणाऱ्या स्वभावाला ते रुचणें शक्यच नव्हतें. पैशाच्या जोरावर नानासाहेबाना जिंकणें असंभाव्यच होते. उलट पैसे घेतले तर त्याचा ग्रह आपणाविषयीं अधिकच वाईट व्हावयाचा. दमयंतीचा पराभव तर दूरच, पण आपण पैसा घेऊन संपन्न झालों आणि ती निर्धन राहिली, तरी खाली मान आपलीच राहाणार, लोकांची सहानुभूति दमयंती-कडेच राहणार. तेव्हा या मृगजळामागे लागणे व्यर्थ. हे श्रीमंतीचे जग आपले नव्हेच. आपण ब्रह्मदेशात जावयाचा जो विचार केला तोच बरोबर, असे तिने ठरविले. तिने आपलें सामान आवरले व पुढे तें मागवीपर्यंत पथिकाश्रमाच्या व्यवस्थापकाच्या स्वाधीन करून ती पुढील मार्गास लागली.

दोन दिवस दमयंतीने व नानासाहेबानी वाट पाहिली. मदयंतीचा शोध केला. ज्याअर्थी तिने तें पत्र आपणाजवळ ठेविले आहे व सामानहि पथिकाश्रमात ठेवलें आहे, त्याअर्थी ती येथेच कोठे तरी आहे आणि पुढेमागे पैशाची मागणी करावयास येईल, असे नानासाहेबास वाटत होतें. दमयंतीने आपल्या वकिलाच्या व विश्वस्ताच्यामार्फत, तें बक्षीस मिळाल्यानंतर जेवढी संपत्ति बाबासाहेबानी वाढविली होती त्याचे मदयंतीच्या नावचें देणगीपत्र करून घेतले, व ते एका मोहोरबंद पाकिटांत ठेवून, मदयंती आपले सामान घेण्यास येईल तेव्हा ते देण्यासाठीं व्यवस्थापकाजवळ देऊन ठेविलें. नंतर कार्तिकीसाठीं नानासाहेब व दमयंती रत्नपूरला आलीं.

रत्नेश्वराचें देऊळ लहानसेंच पण टुमदार होतें. पाठीमागे डोंगर व पुढे लांबपर्यंत पसरलेली समुद्राची पुळण. भरती पुरी भरली म्हणजे लाटा अगदी देवळाच्या पायऱ्या धुवावयाच्या. सुकती पुरी झाली म्हणजे पाणी चांगलें अर्धा मैल दूर जावयाचें. त्यामुळे भरती भरू लागली की स्नानाची फारच मौज येत असे. आज कार्तिकीची जत्रा. आसपासचे किती तरी लोक दर्शनास येत आणि त्यात यंदा सरदारसाहेब मोठ्या थाटाने त्रिपुरोत्सव करणार आहेत, हें लोकास कळल्यामुळे तर अतोनातच गर्दी लोटली होती.

दुपारीं जेवण झाल्यावर नानासाहेबास चाकराने एक चिठ्ठी आणून दिली. पाहातात तो, ती मदयतीची होती. आज येणार वाटतें ही स्वारी, स्वारी करायला, असें नानासाहेबाच्या मनात आले. चिठ्ठी अवघी दोन ओळींची. 'रत्नेश्वराच्या देवळात भेटावे. देऊळ देवाचें आहे. वाट पाहात आहे—मदयती.' दुसऱ्या वाक्यातील खोच नानासाहेबाच्या लक्ष्यात आल्याशिवाय राहिली नाही. त्याना वाटले—सुंभ जळाला तरी पीळ जळत नाही. कपडे करून ते देवळात गेले.

मदयती समुद्रकाठच्या महाद्वाराशीं त्याची वाटच पाहात होती.

नानासाहेबानी नमस्कार केला व विचारिले, "का? काय ठरल ?"

"ठरायच काय ? जे काय करायच ते ठरलच आहे. पण या साऱ्याबद्दल तुम्ही मला तर दोष देत नाही ना ?"

मनात तर नानासाहेबाना असे वाटले की, दोष-- याहून मोठा दोष—कोणता असू शकेल ? ही सारी परिस्थिति निर्माण करायला हिच्याशिवाय दुसरी कोण जबाबदार ? पण त्यानीं आत्मसंयमन केले व ते म्हणाले, "तुमचा फारसा दोष नाही. आज नाही तरी केव्हा तरी हे होणारच होतें."

"अस काही होईल ही कल्पना मला नव्हती. तुम्ही दमयंतीबाईबरोबर सुखान संसार कराल अस मला वाटल होत."

"हो. पण आता त्याच काय ? दमयंतीचा सारा कारभार संपलाच आहे आणि माझा—"

त्याचे बोलणे पुरे होणाऱ्या आधींच मदयती म्हणाली, "तुमच्या कारभारासाठी मी थोडफार करू शकते." तिने आपल्या पदराआड ठेवलेले एक पाकीट व एक कपटा पुढे केला, आणि ती म्हणाली-- "हे घ्या तुमच्या कारभारासाठी."

नानासाहेबानी ते हातात घेतले. पाहतात तों ते पाकिट म्हणजे दमयंतीने मोहरबंद करून मदयतीस देण्यासाठी तयार केलेलेच व तो कपटा म्हणजे ते गीतेंतलेच पत्र. ते म्हणाले, "हे तर दमयंतीन तुम्हाला दिलेल आहे."

"हो. पण मी आता हें तुम्हाला देते आहे ना !"

"मग मी याच काय करू ?" नानासाहेबानी विचारले. त्याना वाटलें

की, दमयंतीचा व्यवस्थापक म्हणून त्या पाकिटातल्या कागदाप्रमाणे व्यवस्था करण्यासाठीच मदयंतीने ते आपणाजवळ दिले असावे.

" फाडा अन् फेकून द्या. " आपल्या जुन्या बेपर्वाईच्या स्वरात मदयंतीने उत्तर दिले.

बोलता बोलता तीं पायऱ्या उतरत होती. पायऱ्या उतरून तीं ओलसर वाळवटात आलीं. ओहोटी सुरू होऊन थोडा वेळ झाला होता. देवळातली गर्दी वाढत होती. पाणी दूर दूर जात होते व हीं पाण्याच्या जवळ जवळ चालली होती.

" म्हणजे तुम्ही याचा काही उपयोग करणार नाही ? मग दमयंतीच हे सार करण व्यर्थंच म्हणायच ? "

" हू. "

" तुम्ही कुठ याबद्दल बोलणारहि नाही ? "

" नाही, नाही. हे काही झालच नाही अस समजा, समजलात ? मी हें सार साफ विसरून गेले आहे. झाल ते गेल. मला त्याच्याशीं काही कर्तव्य नाही. दमयंतीबाईनी मला दिल तेवढ मला पुरे. मी उद्या ब्रह्मदेशाला जाते आहें. "

तिच्या प्रत्येक शब्दागणिक नानासाहेबाचा चेहरा प्रफुल्लित होत होता. त्यानी पुढे विचारले, " पण हे सार का, अन् कुणासाठी ? "

मदयंतीच्या तोंडून अक्षर फुटत नव्हते. पण तिचे सारें अंतःकरण जणू एकवटून म्हणत होतें, 'तुमच्यासाठी, तुमच्यासाठी, नानासाहेब, हे सार तुमच्यासाठी.' असूया, राग, प्रेम इत्यादि विकाराचें तिच्या दृष्टींत एक विलक्षण मिश्रण झाले होते. तिच्या मुद्रेत आनंद व उत्सुकता भरली होती. या एवढ्या गोष्टीचा तरी तिच्याजवळून नानासाहेब स्वीकार करतील का ? ही उत्सुकता तिच्या मनात नाचत होती.

नानासाहेबाच्या कपाळावर आठ्या पडल्या. त्यानी ते सारे कागद मदयंतीला परत दिले आणि ते म्हणाले, " मदयंतीबाई, हे कागद तुमचे आहेत. तुम्ही याच हव ते करा. मी कोण ? मी काहीहि करणार नाहीं. "

मदयंतीची सारी उत्सुकता मावळली. नानासाहेबाकडून ते कागद हातात

पडताच तिने ते टराटर फाडून टाकले व त्याचीं चिटोरीं समुद्राच्या पाण्यावर भिरकावून दिलीं. ओहोटीच्या लाटानी त्याना दूर दूर नेत अनत सागराच्या विशाल उदरात विलीन केले. हें सारें इतक्या झपाट्याने झाले की, नानासाहेबाना काही बोलायला किंवा करायला सवडच राहिली नाही. आश्चर्यचकित होऊन ते म्हणाले, "तुम्हीं हे काय केल, आणि का?"

हेटाळणीच्या दृष्टीने मदयती नानासाहेबाकडे पाहात म्हणाली, ' मीं, एकदा तुम्हाला काय सांगितल होत ते आठवत आहे का? प्रेमासाठी मी हव तें करीन, हव ते सोसीन, हवा त्याचा त्याग करीन, कश्शाची— अगदी कश्शाचीहि— मी परवा करणार नाहीं, कश्शाचाहि विचार करणार नाही, म्हणून. आणि मग पुढ मीं असहि म्हटलेल आठवत असेल की, तुम्हीं माझ काही केलत तरी मी त्याचीहि पर्वा करणार नाही म्हणून. प्रेम फार भयकर असत, सरदारसाहेब. मी म्हटल ते खर होत, याचा आता तरी कदाचित् तुम्हाला प्रत्यय आला असेल."

नानासाहेब स्तब्ध, निश्चल उभे होते.

ती पुढे म्हणाली, "आता तरी तुमची काळजी दूर झाली ना? दमयंतीबाईना आता कशाची भीति नाही."

"पण मला वाटल होत की, तुम्ही दमयंतीचा द्वेष करीत होता."

"हो पण सरदारसाहेब, द्वेषापेक्षा प्रेम जबरदस्त आहे. त्या प्रेमानच त्या द्वेषाला जिंकल. आणि आईबापाच्या पापाच प्रायश्चित्त घेण मुलीच कर्तव्य आहे अस तुम्हाला वाटत आहे ना?"

एवढे म्हणून मदयंतीने नमस्कार केला व नानासाहेबाकडे पाठ फिरवून ती चालू लागली. तिच्या त्यागाचा क्षण आला व आपलें कार्य करून गेला, समुद्रात गडप झालेल्या त्या कागदाप्रमाणेच. आता आणखी काही त्याग करायला तिच्याजवळ राहिलेच नव्हतें.

"दमयंती याबद्दल तुमची नेहमी कृतज्ञ राहील." नानासाहेब तिच्याबरोबर येऊन म्हणाले. दोघेहि पायऱ्या चढत होतीं.

मदयंतीला कळून आलें की, नानासाहेबाच्या मनात या वेळींहि आपला विचार नसून दमयंतीविषयीचेच विचार आहेत. दमयंतीवरचे संकट टळल्याच

त्याना आनद होत आहे. मदयती म्हणजे नुसती त्या आनदप्राप्तीचें साधन. या साधनाबद्दल कृतज्ञ कसे राहाता येईल, एवढ्यापुरताच त्याचा विचार.

तिने शेवटल्या जिज्ञासेने विचारले— " पण सरदारसाहेब, एकाकाळीं तुम्ही दमयतीबाईना मूर्ख, व्यवहारशून्य समजत होता ना ? "

" हो. पण आता मला समजल की, तो मूर्खपणा नव्हता. तो असामान्य चागुलपणा होता. आम्ही व्यावहारिक माणस त्याला मूर्खपणा म्हणू एवढच."

" होय. आणि हेच मलाहि कळून आल, आणि त्यामुळच माझी द्वेषबुद्धि जागच्या जागींच जिरली. बर आहे. येतें मी. " असे म्हणून मदयती गर्दींत भिसळली व दिसेनाशी झाली. नानासाहेब पाहातच राहिले.

दमयंतीला हे समजल्यावर तिने मदयतीला दिलेली सारी संपत्ति सार्वजनिक कामाला लावायचे ठरविले. तिच्या व्याजातून रत्नपूरला रत्न-बालविद्यालय काढावयाचे व त्यातच आपण जन्मभर काम करावयाचे.

सध्याकाळीं त्रिपुरापूर्वी रत्नेश्वरापुढे प्रथम दीप दमयतीने उजळला. सवयीप्रमाणे तिच्या तोंडून निघालें—

शुभ करोति कल्याण आरोग्य धनसंपदां
शत्रुबुद्धिविनाशाय दीपज्योति नमोऽस्तु ते ।

आज तिच्याविषयीं कुणाचीहि शत्रुबुद्धि राहिली नव्हती. तिची एकमेव शत्रुहि आज मित्र झाली होती.

रत्नेश्वराच्या त्रिपुरोत्सवाने सारें रत्नपूर उजळून निघत होते. जिकडे तिकडे जयघोष होत होता—

" जय रत्नेश्वर, जय रत्नेश्वर– "

## —: आमचीं कांहीं पुस्तकें :—

१ अल्लाहो अकबर
२ लाडकी लक्ष्मी
३ चंद्रा व इतर गोष्टी
४ उल्हासकथा
५ माझ्या साहित्यसेवेतील स्मृती
६ तुटलेले तारे
७ नैनीच्या तुरुंगात
८ असं पाहा—
९ अस्पृश्योद्धार
१० वणवा
११ अनिर्बंध जीवन
१२ आसरा
१३ ताजमहाल
१४ चित्रा
१५ सुरसुरी
१६ काल व आज
१७ ऐतिहासिक पोवाडे
१८ भूतावर भ्रमण
१९ वसईची मोहीम
२० उर्मिला
२१ चित्तरंजन
२२ बदसूर जोडपीं
२३ नरम गरम
२४ हवेतील मनोरे
२५ नरसिंह केळकर
२६ जीवनस्वर
२७ बलिदान
२८ दुसरी सावली
२९ सागराच्या लाटा
३० तृष्णा
३१ छोटी नली
३२ कथा-कदंब
३३ उपहासिनी
३४ जीवन-संग्राम
३५ जीवन-तरंग
३६ रायसोल्हास
३७ निर्माल्यातील देव
३८ हिरकणी
३९ खाचखळगे
४० धूम्रतरंग
४१ मोगरीचा गजरा
४२ प्रकाशातील व्यक्ती

कॉंटिनेंटल बुक-सर्व्हिस, पुणें २.